आंतर भारतीय पुस्तकमाला

# मामाचा वाडा चिरेबंदी

लेखक
एम. टी. वासुदेवन नायर

अनुवादक
शरच्चंद्र वडोवेकर

नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

पहिली आवृत्ती: 1973 (शाके 1895)
दुसरी आवृत्ती: 1989 (शाके 1911)



Original Title: Nalu Kettu (Malayalam)
Marathi Translation: Mamacha Vada Chirebandi

रु० 11.00

निदेशक, नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया, ए-5 ग्रीन पार्क,
नवी दिल्ली-110 016 द्वारा प्रकाशित

# भूमिका

अप्पू नेडुङ्गाडी यांची 'कुंदलता' (१८८७) ही केरळच्या मल्याळम भाषेतील सर्वांत पहिली कादंबरी. एक प्रकारे ही चुकीची सुरुवात झाली, कारण या वाङ्मय-कृतीचे रूप नवीन असूनही तिची कथावस्तू मात्र जुन्या दंतकथा आणि प्रेमलीला यांच्या धाटणीची होती. वर्णनशैलीत चातुर्य आणि सौंदर्य होते, पण कथानक शेक्स्पिअरच्या 'सिंबेलिन' आणि स्कॉटच्या 'आयव्हॅन्हो' यांच्या कथानकांवर आधारलेले होते आणि कथेतील घटनांचे स्थान अनिश्चित आणि काळ अनिर्दिष्ट होता. वातावरण, घटना आणि पात्रे केरळची वाटत नव्हती.

१८८७ मध्ये लिहिलेली 'कुंदलता', दंतकथा आणि प्रेमलीलांच्या नष्ट होत असलेल्या वातावरणाकडे वळते तर तिच्यानंतर फक्त दोनच वर्षांनी लिहिलेली चंदू मेनोनची 'इंदुलेखा' ज्या भावना व विचार व्यक्त करते, ते आजचे वाटतात. त्याचे कारण असे की, या कादंबरीत स्थान आणि घटना यांच्या बाबतीत मुळीच संदिग्धता नाही. वातावरण, पात्रे आणि घटना एकोणिसाव्या शतकाच्या अखेरच्या केरळशी संबंधित आहेत. पिढ्यानपिढ्या चालत आलेली मातृसत्ताक पद्धती मानणाऱ्या एका जुन्या जमीनदारी एकत्र कुटुंबाची प्रस्तुत कादंबरीतील कथा. आधुनिक युगात ही प्रथा चालू शकत नाही हे सूचित करताना एका आगळ्या तेजाने उजळून निघते. नायर समाजातील एकत्र कुटुंबपद्धतीचा ऱ्हास आणि बदलत्या परिस्थितीशी जुळवून घेताना त्या कुटुंबाची होणारी कुचंबणा हे या कादंबरीचे विषय असल्यामुळे नायर जातीच्या सामाजिक पार्श्वभूमीचा परिचय अ-मल्याळी वाचकांना करून देणे आवश्यक आहे.

उत्तरेकडून वैदिक ब्राह्मणत्वाचा जो प्रभाव प्रारंभी हळुहळू इकडे झिरपत होता, त्याला आठव्या-नवव्या शतकांत एका मोठ्या लोंढ्याचे स्वरूप आले. या प्रभावा-पूर्वी सामाजिक विकास फारच कमी झाला होता. तिथ शेतकरी, धनगर, कोळी

इत्यादींच्या रूपात व्यावसायिक पातळीवरील वर्गीकरण झालेले असले, तरी वैदिक ब्राह्मणत्वाने चातुर्वर्ण्य काटेकोरपणे पाळले. संख्येने कमी असूनही ब्राह्मणांनी सुरुवातीपासूनच पौरोहित्य, प्रतिष्ठा आणि अधिकार प्राप्त करून घेतले आणि त्यामुळे त्यांना केरळीय समाजाची चौकट अधिक घट्ट करता आली. ते स्वत: नव्या सामाजिक शिखरावर विराजमान झाले.

दहाव्या शतकात केरळचे चेर आणि तमिष् प्रदेशातील चोल यांमध्ये शतवार्षिक युद्ध सुरू झाले आणि १०१९ मध्ये चेर लोकांची वैभवशाली राजधानी महोदयपुरमचा पाडाव झाला. चोलांच्या आक्रमणाविरुद्ध केरळात झालेल्या या लढाईतून या काळात एका लढाऊ जातीचा जन्म झाला. आत्मबळी देणारी ही प्रसिद्ध जमात (चावेर नायर) म्हणजे इतिहासाच्या करुण हाकेला मिळालेला शौर्यपूर्ण प्रतिसाद होता. याच काळात आपल्याला प्रथम 'नायर' या शब्दाचा उल्लेख आढळतो. अर्थात प्रारंभी ते कोणत्याही जातीचे नाव नव्हते, तर बहुधा आत्मबलिदानाला तत्पर असलेल्या दलातील ते उच्च पद किंवा उपाधी होती. पण लवकरच सैन्यातील उतरंडीच्या आधारावर जातींची वर्गवारी निश्चित झाली. एका राजकीय शक्तीशी जीवनमरणांची झुंज देणाऱ्या त्या समुदायामध्ये आपल्या रणांगणावरील कर्तबगारीमुळे नायर लोकांचा राजवंशाशी खूप निकटचा संपर्क आला. ब्राह्मण आणि क्षत्रिय, युवकांना नायर मुलींशी लग्न करण्याचा अधिकार देण्यात आला.

आरंभीच्या चेर वंशातील राजांच्या यादीवरून वंशावली पितृपरंपरात्मक होती हे स्पष्ट आहे. चेर-चोल युद्धाच्या काळात केरळात मातृवंशपरंपरेचा जन्म झाला असावा. प्रवासाला निघालेल्या लोकांमध्ये साधारणपणे आढळते तसे केरळमध्ये बाहेरून आलेल्या लोकांमध्ये स्त्रियांपेक्षा पुरुष अधिक होते. यामुळे कुटुंबातील फक्त सर्वांत मोठ्या मुलाने स्वजातीत विवाह करण्याची प्रथा ब्राह्मणांमध्ये सुरू झाली. धाकटे भाऊ क्षत्रिय किंवा नायर मुलींशी लग्न करीत, पण संपत्तीवर त्यांच्या संततीचा अधिकार राहत नसे. यामुळे मातृसत्तेकडे आणि मातृपरंपरेनुसार उत्तराधिकार जाण्याकडे आर्थिक आदेश दिला जाऊ लागला. चोल लोकांशी झालेल्या युद्धातील विध्वंसात नायर पुरुष फार मोठ्या संख्येने बळी पडले. ब्राह्मणांमध्ये स्त्रियांची संख्या वाढल्यामुळे अतिविवाह आणि मातृसत्ता या प्रथा अधिक विकृत झाल्या.

पौरोहित्याचा अधिकार, राज्यकर्त्या शाही घराण्यांशी सोयरीक केल्यामुळे अप्रत्यक्षपणे प्राप्त झालेली सैनिकी सत्ता, त्यांची धार्मिक अनुष्ठाने करण्याचा मक्ता, भरपूर जमिनीमुळे प्राप्त झालेली आर्थिक ताकद, या सर्व कारणांमुळे ब्राह्मणांना

ज्यांना नंपूतिरी म्हणतात, केरळीय समाजाची एक पक्की सरंजामशाही उतरंड रचता आली. या उतरंडीमध्ये ते स्वतः आणि नायर लोक म्हणजे अत्यंत रूढिवादी आणि खास विशेषाधिकार भोगणाऱ्या सर्वोच्च जाती झाल्या. केरळातील ख्रिस्ती, मुसलमान इत्यादी प्रमुख जमाती सामाजिक मनोऱ्याच्या या उच्च बिंदूपासून दूर राहिल्या, हे त्यांना एक प्रकारचे वरदानच लाभले, कारण, त्यामुळे त्यांना व्यापार आणि इतर उद्योगधंद्यांमध्ये आपले कौशल्य दाखवायला वाव राहिला. आपापले सुसज्ज सैन्य असलेल्या छोटया छोटया राज्यांमध्ये केरळचे विभाजन झाल्यावरसुद्धा नायर जमात प्रतिष्ठा आणि समृद्धी यांचा उपभोग घेत राहिली. परंतु अठराव्या शतकात राजा मार्तंडवर्म्याने ही राज्ये खालसा करून तिरुवितांकूरमध्ये एक प्रबळ आणि केंद्रीय शासन प्रस्थापित केले. विच्छिन्न सैन्यांतील नायर लोकांपुढे अडचणी उभ्या राहिल्या होत्या आणि भूतकाळाच्या अवास्तव अभिमानामुळे उपजीविकेचे नवे मार्ग शोधणे त्यांना सुचत नव्हते. त्यांच्या या परिस्थितीचे विडंबन तत्कालीन प्रसिद्ध विनोदी कवी कुंजन नंबियार यांनी केले आहे.

आधीचे नंबियार यांचे बोचणारे विडंबन आणि नंतरचे एम. टी. वासुदेवन नायर व इतर लेखकांचे चिंताजनक रहस्योद्घाटन यांच्यापेक्षा ‘ इंदुलेखा ’ प्रसन्न प्रकृतीची आहे. पण उत्पादन वाढविण्यासाठी काबाडकष्ट न करता शेतातल्या पिकावर आपली उपजीविका चालविणाऱ्या विशिष्ट वर्गाचे अप्रत्यक्ष दर्शन आपल्याला घडते. मातृसत्तात्मक कुटुंबावर कडक अंमल चालवणारे प्रमुख (कारणवर) आणि त्यांचे भाचे-भाच्या यांच्या अभिलाषांमध्ये निर्माण होणाऱ्या संघर्षावर अधिक स्पष्ट प्रकाश पडतो. मातृसत्तात्मक एकत्र कुटुंबपद्धती वर्तमानकाळाशी विसंगत होऊ लागली आहे, असे येथे सूचित केले आहे.

मल्याळम कादंबरीच्या यानंतरच्या विकासाची रूपरेषा येथे देता येईल, पण तत्पूर्वी प्रस्तुत वाङ्मयीन कृतीची एक चौकट देणे आवश्यक आहे. बदललेल्या समाजाशी आपली जी विसंगती आहे, तिचा अभ्यास करण्यास उत्सुक असलेल्या प्रत्येक समाजाच्या वर्गीय मनाचा नमुना ‘ इंदुलेखा ’मध्ये सादर केला आहे. पण या प्रवृत्तीचा बोध घेण्यापूर्वी एका नवीन आणि एक प्रकारे प्रतिगामी वर्गाचा हस्तक्षेप झाला. ही होती महाप्रबंध काव्याचे परिमाण असलेली ऐतिहासिक कादंबरी. १८९१ ते १९२० या काळात सी. वी. रामन पिल्ले यांनी तीन अत्यंत महत्त्वपूर्ण ग्रंथ रचले. पण येथेसुद्धा बदलणाऱ्या काळात समुदायाच्या कार्याबरोबर वर्गीय मनाची असलेली तन्मयता पृष्ठभागाच्या खालच्या थरात दिसून येते. नायर समाजाच्या राजकीय शक्तीचा

ऱ्हास होत असताना पिल्ले यांनी आपल्या तीन ग्रथांमध्ये प्रसिद्ध नायर राजा केशवदास याच्या कार्याचे स्मरण लोकांना करून दिले. अठराव्या शतकाच्या अखेरच्या संकटकाळात हैदरअली आणि त्याचा मुलगा टिपू यांच्या कारकीर्दीत म्हैसूरने तिरुवितांकूरचे अस्तित्व संपुष्टात आणण्याची धमकी दिली होती, त्या वेळी केशवदासांनी तिरुवितांकूरचे नेतृत्व केले. जी जात भूतकाळात योग्य आणि राजनिष्ठ असल्याचे सिद्ध झाले होते, त्या जातीवर कृपादृष्टी ठेवायला हवी, या प्रथेचे ते एक सश्रद्ध स्मरण होते.

स्त्रियांना स्वयंपाकघरात बंदिस्त ठेवणे, सज्ञान होण्यापूर्वीच मुलींचे विवाह उरकून टाकणे आणि तेही बहुधा श्रीमंतश्या म्हाताऱ्यांशी लावून देणे; या परंपरेमुळे नंपूतिरी जातीला सामाजिक रोग जडला. पाश्चात्य धर्मप्रचारकांशी संपर्क आल्याने ख्रिस्ती समाज अधिकाधिक परिवर्तने स्वीकारू लागला आणि या अनुकरणातून उद्भवणाऱ्या शीघ्र गतीच्या आधुनिकीकरणाच्या परिणामांच्या प्रश्नाचा विचार ख्रिस्ती समाजाला शांतपणे करावा लागला. बदलणाऱ्या युगात छोटचा स्वयंकेंद्रित कुटुंबाची आवश्यकता असताना एकत्र कुटुंबपद्धती टिकविण्याच्या प्रश्नात नायर समाज गर्क राहिला. परंपरागत धर्मांधपणा आणि रूढींना कवटाळून बसण्याची सवय या मुस्लीम समाजाच्या समस्या होत्या. या सर्व प्रश्नांवर अनेक चांगल्या कादंबऱ्या लिहिल्या गेल्या.

प्रत्येक जातीच्या वर्गीय मनाच्या सामाजिक सामंजस्यांसाठी चाललेल्या खास प्रयत्नांच्या विषयांकडून कादंबरीचा एक प्रवाह आर्थिक आणि राजकीय प्रश्नांकडे वळतो. चेरुकाड आपल्या कादंबरीत जमीनदार आणि खंडकरी यांमधील संघर्षाचे विश्लेपण करतो, ग्रामीणतेविषयीच्या तीव्र मनोवृत्तींचे सजीव चित्र रेखाटतो. तकषि आणि केशवदेव ग्रामीण आणि शहरी मजूरवर्गाच्या (शेतमजूर, भंगी, रिक्षावाले) परिस्थितीकडे अधिक लक्ष देतात.

जीवनाचा परंपरागत मार्ग दिवसेंदिवस असंबद्ध होत आहे आणि केरळातील जीवन अधिकाधिक राजकारणग्रस्त होत आहे, याचा अपरिहार्य परिणाम म्हणजे परिवर्तनशीलता होय. अनेक कादंबऱ्यांमध्ये उच्छृंखलता आणि उद्देशहीनता यांची झलक पाहायला मिळते——व्ही. टी. नंदकुमारच्या कादंबरीत आढळणाऱ्या माणसाच्या लाकडी बाहुल्यांतील रूपांतरापासून ओ. व्ही. विजयनच्या अतिसंवेदनशीलतेपर्यंत. पण या सर्व कादंबऱ्यांमधून दिसते की कोणताही आदर्श किंवा त्या आदर्शापर्यंत पोहोचण्याची क्षमता नसेल, तर माणूस वाहवत जातो.

याच्या उलट मानवाच्या मनात एक प्रकारचा विश्वास उत्पन्न करण्यासाठी अतिशय प्रयत्न करणारे कादंबरीकारही आहेत. जुन्या आणि सरळ राजकीय तत्त्व-

ज्ञानापुढे के. सुरेंद्रनचा वास्तव राजकारणाचा अभ्यास टिकू शकला नाही. केशवदेव सामाजिक तणाव आणि विकृत ध्येये या दोषांवर पांघरूण घालोत नाही. तोही आपल्या गोष्टींच्या शेवटी दाखवतो की सर्व माणसे केवळ एकमेकांचे शेजारी नसून एकमेकांचे रक्षक आहेत.

आता ज्या लेखकाची वाङ्मयीन कृती येथे सादर केली आहे त्या लेखकाचा विचार करू या. एम. टी. वासुदेवन नायर यांच्या कादंबऱ्यांमध्ये रूपक (उपाख्यान) आढळते. ताण आणि संघर्ष निर्माण करणाऱ्या सामाजिक वस्तुस्थितीशी सरळ सामना क्वचित आढळतो. तरीही लेखक सूचित करतो की, त्याच्या निराशवादाची मुळे खोल आणि संतोषमूलक आहेत. १९६७ मध्ये लिहिलेल्या ' शरण ' या त्यांच्या एका आगळ्या कथेमध्ये, अनेक वर्षे आपल्या गावापासून दूर राहिलेला एक माणूस जुने संबंध पुन्हा जोडण्यासाठी आपल्या गावी परततो, जुने मित्र शोधतो. सगळे चेहरे त्याला नवे आणि विसंगत वाटतात. या कथेत बेक्केटच्या ' गोदोची प्रतीक्षा 'सारखे काहीतरी आहे, थोडेसे कफकाच्या ' महल 'सारखे काहीतरी आहे आणि आयनेस्कोप्रमाणे निरर्थकाचा अर्थपूर्ण उपयोग बऱ्याच प्रमाणात केला आहे. उपाख्यानांच्या दुःस्वप्नपूर्ण क्रमात माणसाचे एका विश्वाला आपलेसे करण्याचे उत्कट पण असफल प्रयत्न आपल्याला दिसतात.

मानवी विश्वातील पारस्परिक क्रियांतून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखांपेक्षा अपहरणाच्या भावनेला अधिक महत्त्व आहे त्यांच्या अपहरणाचे समर्थन केल्याने तो जगातला महत्त्वपूर्ण आणि युक्तिमूलक निर्णय होऊ शकत नाही. कारण कथानक कादंबरीकाराचे रूपक आहे आणि ते अखेरीस त्यानेच निवडलेले आहे. अंतर्भावनेच्या व्यक्तिगत शोधातून या लेखकाची ' अंधाराचा आत्मा ' ही आणखी एक कादंबरी जन्म घेते. त्यांनी १९६५ मध्ये लिहिलेल्या ' कोहरा ' या एका लघु-कादंबरीत उपाख्यानात्मक रचना सर्वांत सरळ आहे. ही दोन व्यक्तींच्या निष्फळ प्रतीक्षेची कहाणी आहे. सहलीसाठी नैनितालला आलेल्या व परत येण्याचे ज्याने आश्वासन दिले आहे अशा एका तरुणाच्या प्रेमपाशात अडकलेली विमल आणि एक इंग्रज प्रवासी व एक पहाडी तरुणी यांच्या प्रेममीलनातून जन्मलेला एक मुलगा यांची ही कहाणी आहे. या मुलाकडे आपल्या जन्मदात्याचे छायाचित्र आहे आणि ज्याला आपल्या जन्मदात्याला कमीत कमी एकदा तरी भेटण्याची इच्छा आहे. अपघाताचे समर्थन केले नाही आणि त्यामुळे निष्ठुर जखमही होत असली, तरी निदान या ना त्या प्रकारे त्या विखुरलेल्या तुकड्यांना गोळा करण्याचा प्रयत्न करू शकणाऱ्या

शक्तीला वासुदेवन नायर आपल्या पात्रांपासून दडवून ठेवतात, ही वस्तुस्थिती आहे. फक्त त्यांच्या ' काळ ( समय ) ' या आधुनिक कादंबरीतच जगातील कुटिल मार्गाशी केलेल्या एक प्रकारच्या तडजोडीची छटा आहे आणि इथेसुद्धा सरळ संघर्षापेक्षा निष्क्रिय शरणागतीच आहे.

वासुदेवन नायर यांची ' दैत्यबीज ' ही दुसरी कादंबरी नायर जातीतील एकत्र कुटुंबाच्या विनाशाच्या खास विषयावर लिहिलेली आहे. एक प्रकारे ही कथा जुनी आणि नीरस झालेली आहे, कारण तीमध्ये खलनायक अनेक साहसांच्या भोवऱ्यात सापडूनही त्यातून सहीसलामत बाहेर पडतो, तर नायक सुखदु:खांच्या आवर्तातच गुंतून राहतो.

याच विषयावरची यापूर्वीची एक कादंबरी येथे सादर केली आहे. या कादंबरीच्या ' नालुकेट्टू ' या शीर्षकाला प्रतीकात्मक अर्थ आहे. वास्तुशास्त्रात सामाजिक साच्यातील एकत्र कुटुंबाची खरीखुरी अभिव्यक्ती करणाऱ्या जुन्या पद्धतीच्या घराचे ते नाव आहे. यात मधोमध असलेल्या खुल्या अंगणाच्या चारी बाजूंना खोल्या असत आणि याच आकृतीबंधाची पुनरावृत्ती करता येत असे. अशा प्रकारे एकत्र कुटुंबाची शाखा-उपशाखांनी वाढ झाली की या घराचा त्यानुसार विस्तार करता यायचा.

या कादंबरीतील एक युवती आपल्या वडीलधाऱ्यांच्या इच्छांना न जुमानता आपल्या प्रियकराबरोबर पळून जाते. तिच्या मुलाला त्याच्या मातुल घराण्यात पुन: प्रवेश मिळविण्यासाठी जे प्रयत्न करावे लागतात आणि ज्या संघर्षांना तोंड द्यावे लागते, त्याची ही कथा आहे. कायदेशीर अधिकारामुळे त्याला प्रवेश मिळतो, पण त्या घराण्याचे निष्ठुर कुटुंबप्रमुख असलेल्या थोरल्या मामांच्या हृदयात त्याला स्थान मिळत नाही. आधी हा मुलगा केवळ गैरसमजामुळे आईपासून वेगळा होतो. त्या अनाथ विधवेने आपल्या मुलाच्या शिक्षणासाठी एका दयाळू व्यक्तीकडून मदत घेतलेली असते. पण ती मदत संशयास्पद परिस्थितीत घेतलेली असल्याने शेवटी त्या मुलाला तो व्यवहार अपमानास्पद वाटतो. मुलगा चांगला शिकून मोठा होतो, त्याला नोकरी मिळते, तो घरी परततो. दरम्यान मातुल कुटुंबाचा हळुहळू आर्थिक ऱ्हास होतो. त्या एकत्र कुटुंबात त्याला पुन्हा जाण्याची इच्छा नसते, पण अप्रिय स्मृतींशी निगडित झालेले ते घर पाडून तिथे काही नवे उभारता यावे म्हणून तो ती जुनी इमारतच एकदम विकत घेतो.

दुखावलेल्या आणि दुर्बळ बाळपणाच्या स्मृतींनी भरलेल्या आयुष्याला संवेदनक्षमतेने समजून घेण्याची शक्ती या कादंबरीत प्रत्ययाला येते.

—कृष्ण चैतन्य

# एक

मोठा झालो, मोठा पुरुष झालो की मनगटात ताकद येईल, मग कुणाची भीती वाटणार नाही. ताठ मानेनं छाती पुढं करून उभा ठाकेन. कुणी विचारलं, ' कोण आहेस रे ?' तर निर्भयपणं सांगेन, ' मी आहे, कोंतुण्णी नायरचा मुलगा अप्पुण्णी. '

खूप वर्षांनी कधी ना कधी तरी नक्कीच सैतालिकुट्टीशी गाठ पडेल, तेव्हा बदला घेईन. सैतालिकुट्टीची गर्दन माझ्या हातात तडफडेल, तेव्हा म्हणेन, " तू, तू माझ्या ... "

......... ते आठवले की अप्पुण्णीचे डोळे ओले होतात.

सैतालिकुट्टीशी गाठ पडण्याचे दृश्य तो मनातल्या मनात कितीतरी वेळा पाहत असतो. झोप येण्याची वाट पाहत डोळे मिटून पडल्या पडल्या आणि कुण्डंगल घराच्या फाटकाशी उभ्या असलेल्या झाडाच्या सावलीत दुपारी एकटाच बसला असताना तो ते दृश्य नेहमी पाहत असतो.

हा सैतालिकुट्टी कोण आहे ? अप्पुण्णीने अद्याप त्याला पाहिलेले नाही. एवढ्यात त्याची गाठ पडू नये अशी त्याची इच्छा आहे. ' काही वर्षांनी मोठा झाल्यावर त्याला भेटेन अन मगच त्याचा समाचार घेईन. '

पण संध्याकाळी बाजारात जाताना त्याच्या मनात सैतालिकुट्टीचे विचार मुळीच नव्हते. त्या माणसाशी गाठ पडेल असे वाटलेही नव्हते.

शाळा सुटल्यावर घरी पोचायला त्याला उशीर झाला. षारम[1] च्या काजूच्या बागेत धोंडे मारून फळे पाडण्याच्या मनसुब्यात मग्न होऊन तो अंबलवट्टमच्या मित्रांबरोबर निघाला होता.

परगोटन आणि अच्युत कुरुपच्या बागांमधली फळे तोडण्याचे धैर्य नव्हते. ते फारच क्रूर आहेत. पोरांना पाहताच ते आईबापांवरून शिव्या देतात. षारडी मात्र

१. केरळच्या षारडी जातीच्या लोकांचे घर.

फळे तोडू देतो. त्या म्हाताऱ्याला फक्त काजूच्या बियाच हव्या असतात. त्याच्या घरात मूलबाळ नाही. त्यामुळे तो मुलांवर माया करतो.

त्यानंतर टेकडीवर आल्यावर तो ओल्या गवतातून घाणेरड्या पाण्याचा नाला काढून तिथेच खेळत राहिला. खूप उशीर होतोय याचे भानच राहिले नाही.

अप्पुण्णी शाळेतून घरी येतो तेव्हा आई इल्लम[१]हून घरी परत आलेली नसते. स्वयंपाकघरात शिक्यावर एका भांड्यात पेज झाकून ठेवलेली असते. ते भांडे काढून एकाच घोटात पेज पिऊन तो झोपडीतल्या म्हातारीकडे गप्पागोष्टी करायला निघून जातो. तोपर्यंत आई येते.

त्या दिवशी तो घरी आला तेव्हा आई आधीच आलेली होती. रात्रीचे जेवण शिजवण्यासाठी ती धान्याचे तूस घालून चूल पेटवीत होती.

" काय रे, एवढा उशीर का झाला ?"

" काही नाही ग आई, असाच उशीर झाला. "

" किती वेळा सांगितलं अप्पुण्णी, दिवे लागण्यापूर्वी घरी यायला हवं म्हणून ?"

त्याने काहीच उत्तर दिले नाही. त्याला माहीत आहे, आई याहून जास्त रागावत नाही.

उभ्याउभ्याच तो पेज प्याला. तेवढ्यात आई म्हणाली, " जा बाळा. यसुफच्या दुकानातून दोन आण्यांचं खोबरेल घेऊन ये. "

त्याने बाहेर पाहिले, ऊन पार नाहीसे झाले. अजून अंधार झालेला नाही. पण आकाशालासुद्धा झाकून टाकणारा अंधार एकदा पसरला की मग गल्लीच्या दोन्ही कडांना असलेल्या केवड्याच्या घनदाट वनामधून जाताना त्याला भीती वाटेल. त्या गल्लीच्या कडेशी जादूगार ऐरामचे दफन केलेले होते. अप्पुण्णी जरा घाबरला.

" आई, खोबरेल उद्या आणू या न. "

एक थेंबसुद्धा नाहीय बाळ. जा धावत जाऊन आण पाहू. "

तरी तो घाबरतच होता. भीती वाटण्याचे कारण सांगितले तर आई त्याला जाऊ देणार नाही. पण ते सांगायची लाज वाटत होती. तो आता काही अगदी लहान मुलगा नाही. आठवीत शिकतोय. मास्तरांनी त्याला वर्गाचा मॉनिटर केले होते.

" जा बाळ, लौकर आण. कांदा तळून देईन तुला. "

कांद्याचे नाव ऐकल्यावर मात्र तो थांबला नाही. लाल चड्डीच्या खिशात पैसे

---

१. नम्पूतिरींचे घर.

टाकून बाटली घेतली आणि बाहेर धावला.

गल्लीत केवडयाच्या बनामध्ये तो पोचला आणि क्षणभर थांबला. आता तेवढा अंधार नाही. पण दोन्ही बाजूंना केवडयाचे दाट बन माजले आहे. केवडयाच्या मुळाशी बिळात विषारी साप राहतात. केवडयाच्या फुलांचा वास सापांना खूप आवडतो. सुवास, सुरेल संगीत आणि सुंदर मुली हे सर्व विषारी सापांना फार आवडते. पण या गोष्टी काय फक्त विषारी सापांनाच आवडतात !

गल्लीतला प्रत्येक खड्डा, प्रत्येक दगड, गल्लीतल्या प्रत्येक गोष्टीचा त्याला चांगला परिचय आहे. हळू चालले तरच भीती वाटते. उडी मारून तो धावू लागला. दुसऱ्या टोकाशी शेताजवळ पोचल्यावरच तो थांबला.

शेतापलीकडे बाजार आहे, सर्व दुकाने झावळयांनी शाकारलेली आहेत. फक्त एकच कौलारू दुकान आहे. त्या दुकानात विकण्यासाठी माल ठेवलेला नाही; तिथे कोणीतरी राहते.

दुकानांमध्ये दिवे लागले आहेत. बहुतेक दुकानांत मिणमिणते कंदील आहेत. फक्त यूसुफच्या दुकानात पेट्रोमॅक्स आहे. ते गावातले सर्वांत मोठे दुकान. तिथेच विषू[1]च्या सणाच्या वेळी फटाके मिळतात. पट्टाम्बाहून अलीकडे एक शिपी आला आहे. कूटल्लूरचा हा पहिला शिंपी. तो शिवणाचे यंत्र घेऊन यूसुफच्या दुकानात बसतो

अप्पुण्णीला यूसुफच्या दुकानात जायला आवडते. यंत्राने कपडे शिवणारा शिंपीही तिथे पाहायला मिळतो. कट्-कट्-कट्-कट् आवाज करीत सुई झराझर वर-खाली कशी होते, वेडावाकडा कापलेला कपडा छान आकार घेऊन बाहेर कसा येतो – हे खरेच पाहण्यासारखे असते.

तो बरेच दिवस मनात घोकीत होता. आईला सांगायचे की आता सदरा फेरीवाल्याकडून घ्यायचा नाही. त्याचे तिन्ही सदरे फेरीवाल्याकडून घेतले होते. 'आता कापड घेऊन शिंप्याला देईन. दुकानात सगळया लोकांसमोर माझं माप घेतलं जाईल. टेपनं माप घेऊन सदरा शिवला की तो छातीला एकदम फिट होईल. त्याचं कापणं, शिलाई सगळं अधिकारानं पाहीन.'

अप्पुण्णी यूसुफच्या दुकानात पोहचला तेव्हा तिथे बरीच गर्दी होती. कामावरून परतलेल्या चेरुमी[2] बायका काही जिन्नस खरेदी करीत होत्या.

---

१. केरळचा एक प्रसिद्ध सण.

२. शेतात काम करणाऱ्या एका खालच्या जातीतील स्त्रिया. यांना कमेरा असेही म्हणतात

अप्पुण्णी मुकाटयाने व्हरांड्यात उभा राहिला. अरे देवा, खूप उशीर झालाय. केवड्याच्या बनातले भयंकर साप तर संध्याकाळ होताच बाहेर येतात आणि गल्लीच्या कडेशीच जादूगार ऐरामचे दफन झाले आहे.

" दोन आण्यांचं खोबरेल, " त्याने जोरात सांगितले.

चेरुमी बायकांच्या कोलाहलात मुसलियारने ते ऐकलेच नाही. त्या बायकांच्या मधून पुढे जाण्याचा त्याने प्रयत्न केला. त्यांचा स्पर्श झाला तरी हरकत नाही... एरवी घरी जाऊन आंघोळ करायची आहेच पण त्यांच्याजवळ जाताच त्यांच्या काळ्या शरीरातून घाम, तेल आणि धूळ यांचा असा एक संमिश्र दुर्गन्ध येतो की त्याने ओकारी होईलसे वाटते. तो मागे फिरला आणि पेट्रोमॅक्सभोवती गिरक्या घेणाऱ्या पतंगांकडे पाहत उभा राहिला.

तेवढ्यात तिथे दोन माणसे आली. एक पांढरा सदरा घातलेला, थोड्या पांढऱ्या मिश्या असलेला जाडजूड होता आणि दुसरा होता पद्मनाभन नायर. घाटावर चहाचे दुकान उघडल्यावर त्याचे दिवाळे निघाले होते. त्याचे दोन मुलगे अप्पुण्णीच्याच वर्गात शिकत होते.

अप्पुण्णी बाजूला सरकला आणि भिंतीला लावून ठेवलेल्या फळ्यांना टेकून उभा राहिला.

" दुकान चांगलं चाललंय ना शेठजी ?" पांढऱ्या सदरेवाल्या त्या जाडजूड माणसाने जोरात विचारले.

तो आवाज ऐकून कमेरा बायकांनी मागे वळून पाहिले. टेबलासमोर यूसुफ पैसे मोजीत होता, त्याने पाहिले नाही.

" कोण आहे ?"

सागाच्या पानात धणे बांधीत मुसलियार आपले लाल दात बाहेर काढून हसत म्हणाला, " हाय अल्ला कोण आहे हा ? पाजी अजून मेला नाही ?"

" मी तर तयार आहे. पण त्या खुदाची तशी इच्छा नाही ना ! "

यूसुफ उठून उभा राहिला. पांढऱ्या सदरेवाल्याला पाहून तो म्हणाला, " हाय रे अल्ला, हा कोण आहे ?"

मुसलियारने विचारले, " कधी आलास ?"

" साडेपाचच्या गाडीनं. "

पुडी बांधता बांधता मुसलियारने म्हटले, " हा तर पूर्वीपेक्षा मस्त झालाय. खरं ना पद्मनाभन नायर ?"

तिथे आलेल्या बायकांकडे पाहत आणि विडी ओढीत पद्मनाभन नायर बसला होता. तो म्हणाला, "हो, दुसऱ्या देशातले तांदूळ खातोय ना."

तो वळून थुंकण्यासाठी बाहेर जात होता, इतक्यात त्याने अप्पुण्णीला पाहिले, "काय रे?"

काहीच कारण नसताना अप्पुण्णी उदास झाला. रडू तर कोसळणार नाही ना, अशी भीती त्याला वाटत होती. त्याच्या तोंडाकडे न पाहता तो म्हणाला, "खोबरेल घ्यायचंय."

स्त्रिया आपसांत कुजबूज करू लागल्या.

"कोण आहे रे हा पोरगा?" पांढऱ्या सदरावाल्याने पद्मनाभन नायरला विचारले.

"वटक्केप्पाट्ट[1]च्या कोंतुण्णी नायरचा मुलगा."

अप्पुण्णीने वर पाहिले नाही.

स्त्रिया एकदम गप्प झाल्या. अप्पुण्णीच्या जवळ उभी असलेली दोन माणसे हळू आवाजात काहीतरी बोलू लागली. पुढ्यात उभी असलेली काही माणसे बाजूला झाली. अप्पुण्णी आता कोणालाही स्पर्श न करता पुढे जाऊ शकत होता. मुसलियारने बाटली घेतली, नरसाळे लावले आणि पत्र्याच्या डब्यात मोठी पळी घालून दोनदा तेल काढून त्यात ओतले. वर आणखी दोन थेंब.

पैसे देऊन बाटली बांबूच्या पानामध्ये झाकून बाहेर निघताना त्या पांढऱ्या सदरेवाल्याने त्याला विचारले, "एकटा चाललायस?"

आपल्याला प्रश्न विचारला आहे हे त्याला कळलेच नव्हते.

"बाहेर अंधार आहे पोरा!"

त्यावर तो काहीतरी पुटपुटला. ते कोणालाही ऐकू गेले नाही.

पाटलाच्या घरचे काम करणाऱ्या चेरुमी कोच्चीने हाक मारून म्हटले, "थांबा छोटे मालक, एकटे जाऊ नका. मी पण त्याच बाजूला जातेय."

दुकानातून खरेदी केलेले सर्व जिन्नस केवड्याच्या पानांच्या द्रोणात ठेवून आणि विडा व पैसे कनवटीला बांधून कोच्ची मागोमाग निघाली. जवळच्याच दुकानदाराच्या दिव्याने तिने मशाल[2] पेटवली आणि म्हटले, "चला छोटे मालक."

१. एका प्रसिद्ध घराण्याचे नाव.

२. नारळीच्या झाडाच्या पानांच्या गुच्छाची मशाल. खेड्यागावात अंधारातून जाताना अशी मशाल पेटवून बरोबर घेतात.

अप्पुण्णीची भीती पळाली. गल्ली पार करताना कवड्याचा मंद वास चारी दिशांना पसरल्याचे जाणवले. पायाशीसुद्धा उजेड होता.

रस्त्यात त्याने विचारले, " कोच्ची, तो कोण होता ग ?"

" कोण ?"

" तो यूसुफच्या दुकानात होता ना, तो."

" तो तर सैतालिकुट्टी माप्पिला[1] होता."

" सैतालिकुट्टी कोण ? "

" मुण्डतायचा– कित्येक वर्षांपूर्वी गाव सोडून गेला होता सैतालिकुट्टी. "

त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. अंगाने जाडजूड, बळकट हात, सर्व शरीरावर केस. रक्तासारखे लालभडक गोल गोल डोळे. असा आहे सैतालिकुट्टी. त्यालाच–

सकाळी डोळे चोळीत उठताना मंदिराच्या अंगणात पाहिलेले कथकलीचे दृश्य आठवले. दु:शासनाच्या छातीवर बसलेला भीम त्याचे पोट फाडून आतडी बाहेर काढीत होता. तसेच सैतालिकुट्टीच्या छाताडावर .........

पण आता त्याच्यात तेवढी शक्ती नाही. अजून तो मोठा झालेला नाही.

अप्पुण्णी धापा टाकीत होता.

तरी दगडाच्या खाणीच्या ढिगाजवळून जाताना किंवा खडकावरून खालच्या गल्लीत ढकलून दिले तर ......... एक दगड डोक्यावर आदळला तर...

" छोटे मालक, आता जा तुम्ही. "

तेव्हा त्याला कळले की आपण आपल्या घराच्या दरवाज्याशी येऊन पोचलो आहोत.

आईची हाक ऐकली. आई चिंताग्रस्त होऊन दारात वाट पाहत बसली होती.

तो धापा टाकीत फाटक पार करून आईजवळ आला.

" अरे देवा. काळजीनं नुसता जीव जायची वेळ आली होती. "

तो काहीच बोलला नाही. दगडाच्या खाणीजवळील खड्ड्यात डोकावून पाहताना ताठरलेल्या केसांतून रक्त वाहते..

" का रे अप्पुण्णी, इतका उशीर का झाला ? "

" तिथं खूप गर्दी होती ग आई. "

मळकट टॉवेल बांधून तो विहिरीवर आंघोळ करायला गेला. आईने पाणी

---

१. मुसलमान, मोपला.

ओढून काढले आणि त्याच्या डोक्यावर ओतले. अजून आईच तेल लावून आंघोळ घालते. तो डोके पुसतो, पण आई केसांना हात लावून 'पाणी आहे' असे बघून पुन्हा पुसू लागते.

भाजलेला कांदा घातलेल्या भाताला विशेष चव नव्हती. आईने बाहेरून स्वयंपाकघराचे दार बंद केले. भांडे घासून उपडे ठेवले. खोलीतच आईने बिछाना घातला. जवळच आपली चटईही अंथरली.

दिवा मालवताच अंधार झाला आणि त्याला उगीच भीती वाटू लागली. केस ताठरलेले एक डोके आणि दोन रक्तासारखे लाल डोळे अंधारात दिसू लागले.

"आई, झोपलीस का ग ?"

"नाही. का रे, काय झालं ?"

'आईला सांगू की नको'

डोळे घट्ट मिटून लवकर झोप येवो, अशी त्याने मनातल्या मनात प्रार्थना केली.

"आई ... !"

त्याच्या पाठीवर हात टाकून आणि त्याला छातीशी घेऊन आईने विचारले, "काय बेटा ?"

मनात द्वंद्व चालले होते. 'आईला सांगावं की नाही ?'

"आई, मी आज सैतालिकुट्टीला पाहिलंय."

सैतालीकुट्टी कोण, असे आईने विचारले नाही. त्याला छातीशी आणखी घट्ट कवटाळून त्याच्या पाठीवर डोके ठेवून आई म्हणाली, "झोप बरं बाळ !"

आईने त्याला त्या घटनेविषयी कधीच काही सांगितले नव्हते. झोपडीतल्या म्हातारीकडे तो बऱ्याचदा जायचा. तिथे त्याला बरेच काही कळले होते.

त्या शेतांच्या दक्षिणेकडील भागात म्हातारीची झोपडी आहे. तिथेच ती राहते. रिकामा असला की अप्पुण्णी नेहमी तिथे जाऊन बसतो. पण म्हातारी नेहमी तिथे नसते. कधीकधी ती पिवळ्या रंगाची गरम लोकरीची शाल पांघरून काठी टेकीत टेकीत भल्या पहाटे बाहेर निघते, (लंकेहून ती शाल आणली होती.) आणि मग दोनतीन दिवसांनी परतते. एकदा बाहेर निघाली की बऱ्याच घरी भेटी देऊन येते. तेंतोजीं इल्लम आणि मांकोत इल्लममध्ये जाते. दोनतीन चांगल्या खानदानी कुटुंबांकडेही जाते. तिथे तांदूळ, नारळ वगैरे जिन्नस मिळतात. मग कधीकधी कोणी काही बोलले– विचारले नसताना उगीच स्वतःचेच सांत्वन करण्यासाठी म्हणते, "मी काय मागायला जाते थोडीच ?"

झोपडीतल्या म्हातारीला कूटल्लूरचे सर्व लोक ओळखतात. तरुणपणी तिला तीन नवरे होते. मूल मात्र झाले नाही. पहिल्या नवऱ्याने तिला टाकले. दुसऱ्याला आणि तिसऱ्याला तिनेच टाकले. सत्तरी उलटली तरी म्हातारी अजून लहान मुलांबरोबर तिरुपरक्कल[१], कैकोट्टिक्कली[२] अशा खेळांत भाग घेते. खानदानी कुटुंबांत दोनतीन दिवस राहून येते. येताना त्या कुटुंबांतील स्त्रिया तांदूळ देतात आणि पुरुष पैसा. तांदूळ आणि पैसा मिळाला की त्या कुटुंबांतील माणसांचे औदार्य आणि वैभव यांची स्तुती करीत गावभर हिंडते.

तिला बरे दिवस होते त्या काळात ती, ज्या ज्या घरात जन्म किंवा मृत्यू व्हायचा त्या त्या घरात जायची. बहुसंख्य गावकऱ्यांच्या जन्माच्या वेळी म्हातारी हजर होती. बऱ्याच जणांच्या मृत्यूच्या वेळीही ती जवळ होती. तिच्या मरणाचा कोणी उल्लेख केलेला तिला आवडत नाही.

ती म्हणते, " म्हातारीला दक्षिणेकडच्या शेतात[३] पोचवण्याची घाई झालीय का ? " मग स्वतःच सांत्वन करते, " माझं वरचं तिकीट इतकं सहज नाही काही काढता येणार ! "

यात्रेहून परतल्यावर पाचसहा दिवस ती झोपडीत राहते. त्या वेळी अप्पुण्णी खूष असतो. तिथे जाऊन खाटल्यावर बसायचा अवकाश, यात्रेत मिळालेले आंबे, तेन्तोजीं इल्लममध्ये मिळालेला फणसाचा पापड, वगैरे सगळे चांगले जिन्नस अप्पुण्णीसाठीच असतात. दोन वर्षांचे मूल असले, तरी त्यालाही सांगण्यासारख्या कितीतरी गोष्टी म्हातारीच्या पोतडीत असतात.

त्याला आपल्या बापाविषयी बऱ्याचशा गोष्टी इथेच कळल्या.

" कोंतुण्णी गेला तेव्हा, अप्पू, तू हा एवढासा होतास. " म्हातारी सर्व लहान मुलांना अप्पू आणि मुलींना अम्मू म्हणते.

बापाच्या मृत्यूच्या वेळी तो म्हातारीच्या अर्ध्या बोटाएवढा होता. अप्पुण्णीला हसू आले.

ते मरण साधे नव्हते. कोणीतरी विष घालून मारले होते.

" त्याच्यासारखा प्रेमळ मुलगा या देशात नव्हता. शरीर असं धिप्पाड आणि

---

१. या खेळात चवऱ्यावर उकिडवे बसून चारी बाजूंना फिरायचे असते.

२. या नृत्य-प्रकारात मुली व स्त्रिया भाग घेतात.

३. केरळच्या हिंदूंमध्ये, मृत व्यक्तीला दक्षिणेकडील जमिनीत पुरण्याची प्रथा आहे.

पिळदार होतं की, हत्तीलाही त्याला आपल्या सोंडेत पकडता आलं नसतं. कधीही भेटला की म्हातारीला विडा घेण्यासाठी काहीतरी द्यायचा... " म्हातारी थांबून त्याच्या डोक्यावरून हात फिरवीत म्हणायची, " देवानं तुझ्यावर दया केली नाही."

अप्पुण्णीला आपल्या वडिलांचे फारसे काही आठवत नव्हते. त्याला पाहताच लोक त्याच्या वडिलांविषयी बोलू लागतात. ते सर्वांना आवडायचे. प्रत्येक कामात कोंतुण्णी नायरची गरज भासायची. लग्न असो की मृत्यूनंतर सोळाव्या दिवसाच्या[१] जेवणाची किंवा मांडव घालण्याची व्यवस्था असो. सर्व कामांत त्याची मदत लागायची. पण स्वतःच्या घरातल्या माणसांना मात्र कोंतुण्णी मुळीच आवडत नसे. त्याचे आईबाप म्हणायचे, " हा करंटा पटावरचे फासे खुळखुळवण्यातच आयुष्य घालवणार. " आईवडिलांचा एकुलता एक मुलगा होता. आजी वारल्यानंतर तो एकटाच राहिला होता.

कोंतुण्णी नायर पट खेळण्यात पटाईत होता.

ओणम[२], विषू[३], तिरुवातिरा[४] या सणांच्या दिवसांत पट खेळतात. कूटल्लूर आणि पैरम्बलम या गावांतील लोकांमध्ये स्पर्धा असायची.

पट खेळणारे सर्व मोठमोठे खेळाडू काळाच्या पडद्याआड निघून गेले होते. आता फक्त तरुण राहिले होते. जाणकार म्हणतात की आता या खेळात पूर्वीसारखा रंग भरत नाही. फाश्यांचा खुळखुळाट किंवा जिंकल्याचा आनंद आणि जल्लोष ऐकला की त्याला वडिलांची आठवण येते, पण त्या आठवणीत वेदनेपेक्षा अभिमानाची भावनाच जास्त असते.

आधी बोलून फासे फेकून इच्छित संख्या काढणारा त्या प्रदेशात एकच खेळाडू होता. तो म्हणजे त्याचे वडील – कोंतुण्णी नायर.

" अरे यार, मी स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलंय ! "

" पैरम्बलमच्या लोकांशी अंतिम सामना होता. त्यांच्या बाजूनं मारार[५] खेळत होता. हरला तर अब्रू जाते. मग जिवंत तरी कशाला रहायचं ? हासुद्धा खेळायला बसला अन हरला. विरुद्ध पक्षातल्या लोकांनीच चोप्पन धोब्याकरवी जादू–टोणा केला होता. हे आम्हांला नंतर कळलं. जिंकायला बत्तिसाचा आकडा हवा होता.

१. केरळातील हिंदूंमध्ये मृत्यूचे सुतक पंधराव्या दिवशी संपते. सोळाव्या दिवशी जेवण घालतात.
२, ३ व ४. केरळचे प्रसिद्ध सण.
५. केरळमधील एक जात. या जातींचे लोक मंदिराची कामे करतात.

अच्चू मामा फासे हातात घेऊन आकाशाकडे तोंड करून बसले होते.

" धोका आहे. अच्चूमामांचीदेखील हिंमत होत नव्हती. त्या हातांनी इच्छित आकडा निघाला नाही, तर हार निश्चित होती. माझ्याकडं पाहून मामांनी हळू आवाजात म्हटलं, " काय रे, गावाची अब्रू जातेय. "

" अच्चूमामांनी धीर सोडला नाही. वळून विचारले, " मुलांपैकी कुणी आहे का तयार ?"

" तेवढ्यात कुणीतरी म्हटलं, " द्या ते फासे इकडं, मामा. "

" तिकडं पाहिलं. कोंतुण्णी नायर होता.

" कोंतुण्णी नायरनं चुकीची खेळी खेळावी असा नवस मारार अन त्याचे मित्र सर्व देवांना करीत होते. त्यांचा आरडाओरडा चालला होता. दुरूनच त्यांची गडबड ऐकू येत होती,

" मी कशाला त्याची पर्वा करू ? " कोंतुण्णी नायरनं तीन-चार शिव्या दिल्या. कुणाला ? देवीला ? आठवण आली की माझे केस ताठ होतात. डोळे मिटून तो बराच वेळ देवीचे नाव जपत होता. मग फासे टाकले : बारा.

" डोळे लाल झाले होते. भयानक दिसत होते. भीतीच वाटत होती.

" पुन्हा फासे टाकले : बाराच.

" पुन्हा टाकले : सहा.

" जिंकलो, असे म्हणून आणखी एकदा त्याने फासे फेकले अन तो निघाला. खरोखरच त्याचा विजय झाला होता.

" त्याच्यासारखा खेळाडू आता होणे नाही ! "

सध्या कूटल्लूरचा सर्वांत प्रसिद्ध खेळाडू असलेला कुट्टन नायर हे सांगत होता.

त्याच्यासारख्या प्रसिद्ध खेळाडूने अवघ्या एकवीस वर्षांच्या वयात कुट्टिप्पुरम आणि वालाव्वेरी वगैरे सर्व शहरांत जाऊन तिथल्या प्रसिद्ध खेळाडूंना हरवले होते.

दक्षिणेकडे एक धोबी होता. त्याने कधीच हार खाल्ली नव्हती. तो आपल्या घरासमोरच खेळायचा. कोणीही खेळायला आला की हटकून त्याच्या पुढे हरायचा. एकदा ओणमच्या दिवसांत याचे वडील तिकडे निघाले होते. त्यांच्याबरोबर अप्पू पणिक्कर होता. अप्पू अजूनही त्याविषयी सांगत असतो. सकाळी खेळ सुरू झाला, तो थेट तिसऱ्या दिवशी संपला. याचा बाप जिंकला. धोब्याने तऱ्हेतऱ्हेच्या हात-चलाख्या केल्या. संध्याकाळ झाली. बघ्या लोकांची एवढी गर्दी झाली की, सर्वत्र धुरळा उडाला होता. डाव जिंकून त्याचा बाप उठला तेव्हा धोब्याने हात जोडून

म्हटले, " आता कधीही मी तुमच्याबरोबर खेळणार नाही. मी हे खुषीनं सांगतोय. "

काश्याचा दोन शेर वजनाचा फासा धोब्याने भेट दिला. आजकालच्या तरण्या पोरांना तो फेकण्याची ताकद नाही. त्याच फाश्याने खेळून कोंतुण्णीने कोनोतच्या पण्णिक्करांना हरवले होते. असे कितीतरी प्रसंग.

त्या काळी बरेच तरुण त्याच्या वडिलांच्या मागे-मागे जात असत. सर्वांना त्यांच्याविषयी आदर वाटायचा. लग्नानंतर बहुतेक मित्रांनी वडिलांची संगत सोडली. कारण वडिलांनी आईच्या कुटुंबातील मंडळींचा अपमान केला होता.

वटक्केप्पाट्ट कुटुंबाचा अपमान केल्यामुळेच बहुतेक लोक वडिलांचा तिरस्कार करीत होते.

वडिलांचे घराणे तेवढे उच्च नव्हते. तीन-चार पिढ्यांपूर्वी वडिलांच्या घराण्यातल्या कुणा एका मुलीचे पाऊल वाकडे पडले होते. त्याशिवाय त्याचे वडील सर्व धर्मांच्या लोकांबरोबर मिळूनमिसळून राहायचे. मुसलमानाच्या दुकानात चहा प्यायचे. त्या काळात चहा पिणे वाईट समजायचे. मुसलमानांकडचा चहा तर हिंदूंनी पिणे निषिद्धच होते. वटक्केप्पाट्टच्या पाटलाच्या दृष्टीने तर पट खेळणेसुद्धा वाईटच होते. पण हे तर पट खेळायला जाताना दारूसुद्धा प्यायचे. अशा माणसाला वटक्केप्पाट्ट कुटुंबातील मुलगी सरळपणाने मिळणे कठीणच होते.

आईचा एक भाऊ आणि अप्पुण्णीचा मामा माधव आता हयात नाही. हा माधव मामा आणि कोंतुण्णी नायर मित्र होते.

त्या दिवशी मोठे मामा घरी नव्हते. बैठकीत बाहेरचे लोक ये-जा करीत नसत. बैठकीच्या वरच्या खोलीत माधव मामा आणि वडील गप्पा मारीत बसले होते. वेळेचे भान नव्हते. तिन्हीसांजा उलटून गेल्या होत्या. तेवढ्यात मोठ्या मामांचा आवाज ऐकून दोघे दचकले.

" बैठकीत कोण आहे ! "

दोघे खाली आले. खडावा घालून छातीवर हात फिरवीत ते अंगणात फेऱ्या घालीत होते.

" तिथं कोण आहे, माधव ? "

वडिलांनी उत्तर दिले, " ताषत घरचा कोंतुण्णी. "

" तिन्हीसांजा होऊन गेल्या, या वेळी दुसऱ्या घरातल्या माणसाचं इथं काय काम आहे ? "

वडिलांनी नम्रपणे उत्तर दिले, " मी उत्तरेकडच्या खोलीत होतो. इथल्याच एका माणसाशी गप्पा मारीत होतो."

" घरासमोर उभं राहून गप्पागोष्टी करायला हव्या होत्या अन काम झाल्यावर इथून निघून जायला हवं होतं. वटक्केप्पाट्टच्या बैठकीत बसण्याचा ताषत घरच्या पुरुषांना अधिकार नाही."

राग गिळून वडील म्हणाले, " मी काही लपून छपून आलो नाही. मनात आलं तर कोंतुण्णी इथल्या स्त्रियांनाही घेऊन जाऊ शकतो."

हे ऐकताच मोठे मामा थुंकले.

वडील पण जोरात थुंकून निघून गेले. जाता-जाता म्हणाले, " थू: खानदानी घराणेवाल्यांच्या जिंदगानीवर."

हे सर्व त्याला म्हातारीने सांगितले.

दक्षिणेकडच्या खिडकीतून आई हे सगळे पाहत होती.

त्या वेळी आई वयात आलेली होती.

आई वटक्केप्पाट्टच्या पाटलाची भाची होती. तिचे लग्न मोठ्या थाटामाटात व्हायचे होते. तिचा नियोजित वर बारा मैलांवरील एका बड्या घराण्यातला होता. त्यांची बरीच जंगले, शेती वगैरे होती. चारी बाजूंना मांडव घातला होता. सर्व नायर कुटुंबांना निमंत्रणे गेली होती. स्वयंपाकासाठी प्रसिद्ध ब्राह्मण आचारी येऊन ठेपले होते.

पण ते लग्न झाले नाही.

वरात दाराशी पोचली तेव्हा लक्षात आले की नवरी बेपत्ता झाली.

" पण असं कसं झालं आजी ? " त्याने मोठ्या आश्चर्याने विचारले.

" कोंतुण्णीनं पारुक्कुट्टीला पळवून नेलं होतं."

रावणाने सीतेला पळवल्याची कथा अप्पुण्णीने ऐकली होती. रावण दुष्ट होता. श्रीरामाची पत्नी पळवणे म्हणजे दुष्टपणाच !

मग अर्जुनाने सुभद्रेचे हरण केल्याची गोष्टही आली. अर्जुन खूप शूर वीर होता. त्याला कोणीही धनुर्धारी हरवू शकत नव्हता. मल्याळम पुस्तकात ही कथाही होती. अर्जुन संन्याश्याचा वेष घेऊन श्रीकृष्णाच्या घरी आला आणि सुभद्रेला घेऊन पळून गेला. शाब्बास ! त्याला अडवायला आलेले यादव त्याच्या अंगाला हात लावू शकले नाहीत.

सुभद्रेला रथात घालून नेले, हा भाग वाचताना चांतू नायरच्या तोंडून ऐकलेली

हकीकत आठवत होती. इतके चटकदार वर्णन करण्याची हातोटी फक्त त्यालाच अवगत होती.

" मी स्वत: पाहिलंय ना ! तसा हिंमतवाला आता होणं नाही, " चांतू नायरने सुरू केले.

" पावसाळ्याचे दिवस होते. शेतात छातीपर्यंत पाणी होते. जळवाही भरपूर होत्या. तिथं पोचल्यावर एखादी छडी उचलावी इतकं सहज त्यानं त्या पोरीला उचललं आणि आपल्या हातात तिला घेऊन वेटा ' अस्सा निघाला '. "

चांतू नायर त्यांच्या मागे कंदील घेऊन चालला होता. त्याने विचारले, " त्या लोकांनी पाठलाग केला, तर ... ? "

कोंतुण्णी नायरने वळून पाहिले आणि म्हणाला, " चांतू मी मर्द आहे. जन्माला आल्यानंतर एकदाच मरण येतं. "

म्हातारी ही हकीकत सांगायला लागली की तच्चोली चांतू[१] आणि कोपप्पन[२] यांची आठवण व्हायची. लहानपणी ऐकलेल्या गोष्टी. शर्थीने लढून विजय मिळवण्याच्या गोष्टी.

" पण, त्या पोरीवर देवाची कृपादृष्टी नव्हती. "

" ती दोघं एक दिवस एका गोठ्यात राहिली. वडिलांनी शेताच्या पलीकडच्या बाजूची इल्लमवाल्यांची थोडी जमीन भाडेपट्ट्यानं घेतली. मोकळी जमीन होती. तिथं वडिलांनी एक घर बांधलं. "

" दोन-तीन वर्षांतच ती जमीन बागेसारखी छान दिसू लागली. "

" ज्या घटनेनं कुळाची बेअब्रू झाली होती, त्या घटनेचं श्राद्ध करून आईच्या घरचे लोक ती घटना विसरून गेले. "

" काही दिवस सबंध गावभर त्याच घटनेची चर्चा चालली होती. "

" त्या वेळी अप्पुण्णी तीन वर्षांचा होता. नदीकाठची सर्व शेतं वडिलांनी घेतली. सैतालिकुट्टीनं टॅपियोकाची झाडं लावली. "

म्हातारी बोलत राहिली.

" पिकं दूरदूर पसरली होती. एखाद्या आंधळयानंसुद्धा त्या शेतासाठी हजार रुपये सहज मोजले असते. पल्लिप्पुरमचे सगळे व्यापारी आले अन सगळं पीक खरेदी

---

१, २. मलबारचे वीर पुरुष. गाण्यांमध्ये गुंफलेल्या ' वटक्कनपाटटुकल'मध्ये त्यांच्या शौर्याचे वर्णन केले आहे.

करून गेले. बयाणासुद्धा दिला. त्या रात्री सैतालिकुट्टीनं वडिलांना मेजवानी दिली.

अप्पुण्णीने मध्येच शंका विचारली, " मुसलमानांकडचं अन्न आपल्याला चालत आजी ? "

" तुझा बाप – त्याला कसला विधिनिषेध ! "

रात्री दोघं जेवले. शिजवलेलं मांस होतं. पण चव काही बरी नव्हती. "

सैतालिकुट्टी म्हणाला, " म्हाताऱ्या ! बकऱ्याचं मांस आहे. "

मशिदीजवळच सैतालिकुट्टीचं घर होतं. वडील जेवण झाल्यावर तिथून निघाले. थोडसं अंतर चालतात न चालतात, एवढ्यात पोटात जळजळ होऊ लागली. दोन पावलं पुढं चालले अन उलटी झाली. त्यांची शक्तीच संपली. पोट धरून जेमतेम आणखी दोन पावलं टाकली आणि खाली कोसळले... "

अप्पुण्णीचे डोळे ओले झाले.

" तेवढ्यात तिथं चंतू आला. कुंबिटीच्या बाजारात भाजी विकून परत जात होता. "

" कोण आहे ते ? "

" चंतू, मी आहे रे. "

" अरे देवा ! काय झालं रे तुला ? "

" सैतालिकुट्टीनं दगा दिला चंतू. "

अप्पुण्णीच्या डोळ्यांतून धारा वाहू लागल्या.

" चंतूनं वडिलांना उठवलं अन कसंबसं घरी पोचवलं. आई मिणमिणत्या कंदिलाच्या सोबतीनं वाट पाहत बसली होती. अप्पुण्णी झोपी गेला होता.

" पारुट्टी " अशी हाक मारून वडील खाली कोसळले. लोक जमेपर्यंत... काय सांगू पोरा, हातावरची भाग्यरेषा सरळ नव्हती. दैव अनुकूल नव्हतं... "

अप्पुण्णी स्फुंदून स्फुंदून रडत होता. " आपल्या गावातले लोक त्यांच्या मरणाविषयी काय काय बोलत होते. पोलीस येतील, प्रेताची चीरफाड करून तपास करतील असंही कोणी म्हणत होतं. पण तसं काऽऽही झालं नाही."

" अंतुण्णी शेठनं पैसे देऊन सगळं प्रकरण मिटवून टाकलं."

अप्पुण्णीने मनातल्या मनात वैऱ्यांच्या यादीत आणखी एक नाव घातले.– अंतुण्णी शेठ.

नंतर कळले की अंतुण्णी शेठ कधीच मेला. बरे झाले.

वडिलांवर विषप्रयोग झाला होता. विष भटक्या लमाणांकडे असते. त्यांच्याशी

भिऊनच वागायला हवे. त्यांना जादूटोणा पण करता येतो. ठार मारण्यासाठी त्यांच्याकडे विषही असते.

म्हातारी म्हणायची, " तू मोठ्या घराण्यातला मुलगा आहेस. "

म्हातारीचे हे वाक्य त्याने मनातल्या मनात कितीतरी वेळा घोळवले. पूर्वी त्याच्या कुटुंबाकडे खूप शेते होती. फार पूर्वीच्या गोष्टी आहेत या. म्हातारीच्या लग्नाच्या वेळी यांच्या कुटुंबात वाटण्या झाल्या. त्या वेळी कुटुंबात चौसष्ट माणसे होती.

चौसष्ट माणसांचे कुटुंब !

त्या काळी दोन सोप्यांचे घर होते ते. आता त्याचा अर्ध्याहून अधिक भाग पाडला आहे. अजून सोपा आहे. तिथे देवीची प्रतिष्ठापना केलेली आहे, पुरुषांची वेगळी बैठक, गोठा, खळे[1], घर सर्व काही आहे. महिन्या-दोन महिन्यांनी एकदा म्हातारी तिथे जाते.

" पराक्रम आणि वैभव यांचं केंद्र होतं ते. अजून तिथं गेलं की थरकाप होतो."

सकाळी त्याला पेज देऊन आई इल्लमला जायला निघते. त्या वेळी जवळपास म्हातारी असली की तिला पाहून हटकून म्हणते,

" काय नशीब तरी असतं पहा मेलं. वटक्केप्पाट्टच्या चौसोपी वाड्यामध्ये वाढलेली पोर ही; नोकरी करायला निघालीय. नशीबच चांगलं नाही, त्याला काय करणार ? "

बऱ्याच दिवसांपासून तो वटक्केप्पाट्टच्या वाड्यामध्ये वाढली असल्याच्या गोष्टी ऐकत होता. आई समोर असतानाही म्हातारी या गोष्टींची उजळणी करते. अमीना बीबी आणि कोच्चीदेखील असेच काही बोलतात मग आई हळूच सर्वांच्या नकळत डोळे पुसते.

त्याची आई कुंजिक्काली अम्माची धाकटी मुलगी. खूप लाडाने – कौतुकाने वाढवले होते तिला. ती ऋतुमती झाली तेव्हा भली मोठी मेजवानी दिली होती.

आई अशा वातावरणात वाढली होती आणि आता...

सकाळी तो उठण्यापूर्वीच आई स्नान-सडा आटोपून पेज तयार करून ठेवते. त्याच्यासाठी थाळीत पेज आणि पानावर चटणी वाढून उरलेले संध्याकाळसाठी शिक्यात झाकून ठेवते. त्याची शाळेत जाताना घालण्याची चड्डी आणि शर्ट घडी

---

१. केरळात पिकाची कापणी झाल्यावर खळ्यात धान्य साठवतात. येथेच शेतीची अवजारेही ठेवतात. साधारणपणे ही एक मोठी लांबट खोली असते.

करून ठेवून मग ती कामाला जाते.

त्याला आपल्याबरोबर इल्लमला घेऊन जाणे तिला रुचत नाही. पण तरीही एकदा त्याने हट्टच धरला आणि तो तिच्याबरोबर गेला. सात-आठ वर्षांचा होता तो तेव्हा. आजसुद्धा अप्पुण्णीला ते आठवते. मोठे इल्लम. तिथे धान्य सुकवायचे आणि कुटायचे हे आईचे काम. लांब लांब कानात त्या मोठमोठ्या बाळ्या झुलवत धाकटी मालकीण म्हणायची, " पारो, ही चटई, गुंडाळून ठेव. " किंवा " खळ्यातून थोडा कोंडा इकडं आणून ठेव. "

मागील फाटकाने गेले की इल्लमचे अंगण लागते. आई त्याच वाटेने जाते.

तो ज्या दिवशी गेला त्या दिवशी धाकट्या मालकिणीने विचारले, " पारोचा पोरगा का हा ?"

त्याला हे मुळीच आवडले नाही. त्याच्या आईचे नाव पारो नाही, पारुक्कुट्टी आहे. आणि तिने त्याला ' पोरगा ' म्हटले.

उखळ असलेल्या खोलीच्या आसपास फिरत राहिला. आईला खूप काम होते. घरासमोर मंदार वृक्षाखाली लंगोट बांधलेले, पायात घुंगरांचे वाळे घातलेले आणि गळ्यात साखळी घातलेले एक लहान मूल खेळत होते. त्याचे केस डोक्यावर बांधले होते. थोरल्या नम्पूदिरीचा मुलगा होता. थोरला नम्पूदिरी बाहेर दरवाज्यावर मांडी ठोकून पान चघळत बसला होता. त्याच्या धाकट्या भावालाही अप्पुण्णीने पाहिले. त्याला तोंडाचा चंबू करायची खोड होती. आधी अप्पुण्णीला वाटले की तो आपल्याकडे पाहून हसतोय. पण नंतर गंमत लक्षात आली.

नम्पूदिरींचे दुपारचे जेवण आटोपले. थोरली मालकीण, धाकटी मालकीण, मुले या सर्वांची जेवणे झाल्यावर आतून हाक आली, " ए पोरी. "

त्याच्या आईला बोलावीत होते.

दरवाज्यात उंबरठ्यावर दोन उष्ट्या पत्रावळी ठेवल्या होत्या. आईने त्या उचलून उखळ असलेल्या खोलीच्या व्हरांड्यात आणून ठेवल्या. दोन्हींत उष्टा भात होता, उष्टी भाजी, आंब्याची कोय.

त्याला ओकारी आल्यासारखे झाले.

" मला नको ते. "

" भूक नाही लागली ?"

रडे दाबून तो म्हणाला. " मला नको, नको. " आईने उष्ट्या पत्रावळी फेकून त्याला छातीशी घेतले. " तुझ्या आईचं नशीबच असं करंटं आहे बाळ...! "

त्याच्या डोक्यावर आसवांचे ऊष्ण थेंब ठिबकत होते.

त्यानंतर तो कधीही आईबरोबर गेला नाही. संध्याकाळी आई घरी येते तेव्हा सुपात तांदूळ असतात आणि अंगावर कोंडा व धूळ. मायलेक काळोख पडल्यावर विहिरीवर जाऊन आंघोळ करतात.

इल्लमजवळ देऊळ आणि तलाव आहे. उत्तरेकडे एक खडक आहे. त्यात गुंफा आहेत. गुंफांमध्ये मगरी राहतात. दक्षिणेकडील घाटावर आंघोळीसाठी एक नवीन स्नानगृह बांधले आहे. दगडी पायावर कोरले आहे. केहावन नम्पूदिरीने बांधले. आंघोळीसाठी तलावावर गेले की तिथे त्याच्या वर्गातली इतर मुले भेटतात. त्यांच्या-बरोबर पोहायला मिळते, सूर मारायला मिळते. घरून इल्लम आणि इल्लमपासून घर – हाच आईचा दिनक्रम असतो.

रात्री अंथरुणावर पडताच आईला झोप लागते; पण त्याची थोडीशी हालचाल झाली तरी ती जागी होते आणि विचारते, " काय झालं बाळ ?"

तो इवलासा होता तेव्हा आई त्याला थोपटून आणि कृष्ण व गोपींची गाणी गाऊन जोजवायची.

झोप आली नाही की काळोखात पट आणि फासे डोळ्यांसमोर नाचतात...छाती-एवढ्या पाण्यातून एक दणकट पुरुष एका सुकुमार तरुणीला खांद्यावर टाकून नेतोय. फासे खुळखुळवल्याचा आवाज ... असे वेडेवाकडे विचार करता करता केव्हा तरी तिचे डोळे मिटतात.

मातीत एक फासा उभा राहून गरगरा फिरतोय.

विड्याने ओठ लाल लाल झाले होते...

मृतात्मे रात्री परत येतात ?

स्वर्गातून.

परीक्षा संपून शाळा बंद झाली आणि अप्पुण्णी हैराण झाला. आता तब्बल पंचे-चाळीस दिवस घालवायचे होते. रात्री आणि दिवसा वेळ घालवायचा कसा ?

आई कामाला गेली की एकटा रडतो.

तो इल्लमला जाणार नव्हता.

पंचेचाळीस दिवस. पत्र्याच्या एका थाळीत त्याने पंचेचाळीस खडे ठेवले. रोज सकाळी त्यातला एक खडा काढून फेकायचा त्याचा एक नियमित उद्योग झालाय.

तो कुंडंगलवाल्या घराच्या फाटकाशी कुंकुमच्या झाडाखाली जाऊन उभा राहिला. केशव आला तर चेंडू खेळता येईल.

पण केशव बाहेर दिसला नाही. उन्हात गेले की त्याला दमा होतो. बाहेर जाऊ नको म्हणून त्याच्या आईने त्याला दटावले. इकडच्या तिकडच्या वाटेल त्या पोरांशी खेळायलाही त्याला मनाई आहे. म्हणून त्याने केशवच्या घरात जाऊन त्याला बोलावले नाही.

अप्पुण्णीने खाली पडलेली कुंकम फुले गोळा केली, त्यांचा वास घेतला, पाने तोडली, चुरगाळली आणि आणखी काही वेळ केशवची वाट पाहिली.

पंचेचाळीस दिवसांनी शाळा उघडणार. पास होणार हे तर नक्कीच ! प्रमाण-पत्र घेऊन तृतालाच्या शाळेत जायचे. मोठी शाळा आहे ती.

ती शाळा खूप लांब आहे. टिफिनचे भांडे असते तर जाताना जेवण नेता आले असते. आईने भांड्यांच्या दुकानाल किमत विचारली : साडेपाच रुपये. एवढे पैसे तिच्याकडे नव्हते.

भांडे का घेतले नाही असे त्याने विचारले नाही. साडेपाच रुपये आहेत कुठे ?

शाळा उघडेपर्यंत अमीना बीबीची लॉटरी लागली तर मोठे भाग्य म्हणायचे. वीसजण आणि एकेक रुपया. नऊ जणांची पाळी झाली आहे. आई म्हणत असते, लॉटरी लागली तर जरा आराम राहील.

गल्लीतून बांबूच्या काठीची चाहूल आली. शंका आली आणि ती शंका खरीही ठरली. म्हातारीच होती. काठी टेकीत टेकीत हळूहळू येत आहे.

हळुहळू येत होती. दोन-तीन दिवसांपासून ती घरी नव्हती.

" आजी ! "

हाक ऐकू न आल्यासारखे करून ती जवळ येऊन एकदम थांबली. त्याच्या डोक्यावर काठी मारण्याचे नाटक करून काठी जमिनीवर आपटली. समोरचे दात दाखवीत हसली आणि म्हणाली, " मला वाटलं वासरू आहे. "

हा म्हातारीचा नेहमीचा चाळा आहे.

" आजी, तीनचार दिवस खूप मौज करून आलेली दिसतेस ! "

" कसली रे मौज करतेय बाबा. पण तू असा एवढ्या कडक उन्हात कशाला उभा राहिलास ? "

तो म्हातारीच्या बरोबर चालू लागला. झोपडीचे दार उघडून तिने गाठोडे ठेवले, काठी कोपऱ्यात ठेवली आणि बसून म्हणाली, " थकले बाबा आता...पूर्वीसारखं आता गावोगाव भटकणं जमत नाही. "

" तुझं वय काय आजी ? "

" खूप वय झालंय बाबा. ही आजी आजकालची नाही. सिलोन, सिंगापूर सगळं भटकून आलेय. "

सिलोनबरोबरच सिंगापूरचेही नाव घ्यायची. कधीतरी लंकेला गेली होती. कोणीही भेटले की न चुकता लंकेला जाऊन आल्याचा उल्लेख करते.

कूटल्लूरमध्ये जहाजाने प्रवास केलेल्या फक्त दोनच बायका आहेत. एक म्हणजे टेकडीवर बांधलेल्या नव्या दुमजली घरात राहणारी अम्मालू अम्मा. तिचा नवरा लंकेत नोकरी करीत होता. म्हातारी अम्मालू अम्माला मदत करायला गेली होती. त्या वेळी तिचे एवढे वय झाले नव्हते.

" दोन वर्षं सिलोनमध्ये राहिले. खाण्यापिण्याची चंगळ होती. डोसे खाऊन खाऊन वीट आला की कावळयांना डोसे घालायची. घरात एक तमिष बाई होती, कण्णम्मा नावाची. तिला पण द्यायची. "

या कण्णम्माविषयी अप्पुण्णीने खूप ऐकले होते. तिला विकत घेतले होते.

जहाजात ओकारी कशी झाली, कण्णम्माला मल्याळी भाषा कशी शिकवली, सिंहली भाषा बोलणाऱ्या बाईशी भांडण कसे केले, वगैरे गोष्टी म्हातारी सांग लागली की अप्पुण्णी सारे काही विसरून ऐकत बसायचा.

" आजी, कुठं-कुठं जाऊन आलीस ? " अप्पुण्णीने खाटेवर बसत विचारले.

" कुठं जाणार बाबा. वटक्केप्पाट्टुला गेले होते. परवा तिथं भुवनेश्वरीची पूजा होती. काल मंदिरात त्यांच्यातर्फे ' कलमप्पाट्ट '[१] होता.

पहिल्या दिवशी भुवनेश्वरीची पूजा.

दुसऱ्या दिवशी कलमप्पाट्ट.

तिथल्या मुलांची किती मजा. भास्कर, कृष्णन कुट्टी, तंगम—त्याला फक्त नावेच ठाऊक होती. तीसुद्धा म्हातारीच्या गप्पांतून कळलेली. प्रत्यक्ष कोणालाच पाहिलेले नाही. मोठा मामा, कुट्टन मामा, दोन मोठया मावश्या, आजी, मुलांपैकी कोण मोठं, कोण धाकटं त्याला ठाऊक नाही.

" भुवनेश्वरीच्या पूजेत काय काय असतं, आजी ? "

म्हातारी सांगू लागली, " चिवडा, लाह्या, गूळ, नारळ, गोड धिरडं, पंचामृत. "

---

१. रांगोळीच्या विविध रंगांनी मंदिराच्या फरशीवर देवीची मूर्ती रेखतात. देवीची स्तुति-स्तोत्रे गातात. नंतर ती मूर्ती पुसली जाते. केरळातील देवीच्या मंदिरांतील हा एक प्रमुख उत्सव असतो.

अप्पुण्णीच्या तोंडाला पाणी सुटले.

आणि कोंबडीचे मांससुद्धा. आजी तुझ्यासाठी पण काही आणलंस ? "

तिने गाठोडे सोडले आणि दोन घिरडी काढली.

" खूप दूर आहे का ग आजी ? "

" काय, सिलोन ? "

" नाही ग...वटक्केप्पाट्ट. "

आजीने त्याला रस्ता सांगितला. खूपच सोपा. इल्लमच्या मागच्या गल्लीतून निघून दोन टेकड्या ओलांडल्या की वटक्केप्पाट्टच्या समोरचे फाटक...आजी त्या रस्त्याने नाही जात, तिला टेकड्या चढवत नाहीत. ती शेतांतून जाते. शेतांतली वाट खूप दूरची आहे. बरेच चालल्यावर फाटक दिसते.

" मोठं घर आहे का ग आजी ? "

" नालुक्केट्टू (मोठा वाडा) आहे. जुन्या काळातलं आहे. माझ्या लहानपणी काय शान होती तिथं ! तीन खळी होती, दोन अंगणं आतल्या बाजूला अन दोन बाहेरच्या बाजूला होती. तो काळ गेला आता. ते घर मला कधीच पाहायला मिळणार नाही ?"

" आता पुन्हा कधी तिकडं जाणार आहेस, आजी ? "

" पुढच्या आठवड्यात जायचंय, तुल्लल[1] आहे. "

तुल्लल म्हणजे काय ते त्याला माहीत नाही. " ओट्टनतुल्लुम[2] आहे का ? ते तर शाळेत पाहिलंय. "

" नाही रे वेड्या, सापांचा नाच आहे. गेल्या सतरा वर्षांत तुल्लल झालं नाही. कमीत कमी तीन दिवस लागतील. तीन नाग आहेत ना. सापांचं मंदिर (सर्पक्काव) आहे. तिथं हे नृत्य होतं. सगळीकडं निमंत्रणं जाताहेत. मोठ्या धामधमीनं होणार आहे. "

सगळे येतील. वाटण्या घेऊन वेगळे झालेत, तेसुद्धा येतील. सगळी नात्यागोत्याची माणसं, गावकरी सगळे येतील.

त्याच्या आईला निमंत्रण येणार नाही.

त्याला पण कोणी बोलवणार नाही.

का बोलावतील ? परक्याचे घर असले, तर बोलवायला हवे. आपल्याच घरी

१-२. केरळच्या नृत्यकलेचा एक प्रकार.

जायला निमंत्रण कशाला पाहिजे ? पण आईने तिथे जायला मनाई केली आहे.

" उपाशी मरून जाईन बेटा, पण पुन्हा त्या दारी जाणार नाही. " आईने निश्चयपूर्वक सांगितले आहे.

पण तिथे नागपूजा आहे. तशी पूजा क्वचितच होते. पुन्हा कदाचित बघण्याची संधी मिळणार नाही. त्याने जायला काय हरकत आहे ?

" आजी मी पण तुझ्याबरोबर येणार. "

" काय म्हणतोस पोरा ? "

गुडघ्यावर हात ठेवून म्हातारी उभी राहिली. आश्चर्याने म्हातारीची नजर त्याच्या चेहऱ्यावर स्थिरावली. काही क्षण विचार करून ती म्हणाली, " तुझ्या आईला ते पटायचं नाही, बेटा. "

" मी सांगेन आईला. "

" कुठं जायचं नाही, इथंच बस. " म्हातारी मायेने म्हणाली.

" मी आईला विचारतो. " तो धावत बाहेर आला.

आजीने हाक मारून म्हटले, " अप्पू, इकडं ये बेटा. "

उठता-बसताना, खाता-खेळताना फक्त एवढा एकच विचार डोक्यात असतो. ' पण आईला कसं विचारायचं ? '

डोळे बंद केले, तरी झोप आली नाही. कुशी बदलून पडून राहिला. मग आईच्या कुशीत शिरून म्हणाला, " आई तिकडं नागपूजा आहे. "

" कुठं ? "

" तिथं, आपल्याकडं. "

आईची झोप उडाली.

" तू त्यानं एवढा बेचैन का झालास ? "

तो काहीच बोलला नाही. रडू येऊ लागले.

सकाळी पुन्हा म्हातारीकडे आला. म्हातारीने आपल्या आईला सांगून तिची परवानगी मिळवली पाहिजे. म्हातारीने पुन:पुन्हा समजावून सांगितले. तिला ते त्याच्या आईला सांगायचे नव्हते. तो रडकुंडीला आला तेव्हा ती आईला सांगायला तयार झाली.

म्हातारी आईकडे येताच तो बाहेर निघून गेला. उगीच इकडे-तिकडे फिरत राहिला. अमीना बीबीच्या बागेत लपून बसलेल्या चकोराला खडे मारू लागला.

एव्हाना म्हातारीने आईला सांगितले असेल, असा विचार करून तो परत आला.

म्हातारी निघून गेली होती. आई आत होती. हळूच आत डोकावून पाहिले. आई स्वयंपाकघराच्या दाराला धरून उभी होती. हलक्या पावलांनी येऊन पाहिले तर आईच्या गालांवरून आसवे ओघळत होती.

डोळे मिटून व्याकुळ स्वरात आईने हाक मारली, " अप्पुण्णी ! ".

तो सावकाश तिच्याजवळ गेला.

" बाळ, असा हट्ट करू नकोस. "

म्हणजे ती रागावलेली नाही, दु:खी आहे.

" तुझ्या नशिबात ते लिहिलेलं नाही. ते भाग्य तुला लाभावं एवढं पुण्य तुझ्या आई-वडिलांनी केलं नाही. "

त्यानेही डोळे टिपले.

" कशाला जायचंय तिकडं तुला बाळ ? "

संयमाचा बांध फुटला. तो स्फुंदून स्फुंदून रडू लागला.

" रडू नकोस बेटा. "

आई त्याला पोटाशी धरून कितीतरी वेळ उभी राहिली. त्यानंतर त्याला अगदी अनपेक्षित वाक्य ऐकायला मिळाले.

" तुझी इच्छा आहे तर जा तू. "

वाटले, ' नको, मी जाणार नाही, ' असे सांगावे.

आई म्हणाली, " तू लहान आहेस. इच्छा मनात राहून जाईल. " अप्पुण्णीला आश्चर्य वाटले.

" इतरांप्रमाणं तुझाही तिथं अधिकार आहे. जा तू. "

त्या स्वरात वेगळाच निश्चय जाणवत होता.

डोळे पुसून आईच्या हातातून आपला हात त्याने सोडवून घेतला आणि तो म्हातारीच्या घराकडे धावला.

काम संपवून घरी जायची परवानगी मिळण्याची वाट पाहत पारुक्कुट्टी उभी होती. तेवढ्यात धाकट्या मालकिणीने आणखी एक काम दिले.

" पारो ! जरा ही लाकडं फोडून दे. "

स्वयंपाकघरातून धाकट्या मालकिणीने थोडी लाकडे बाहेर टाकली. कुऱ्हाडीचा घाव बसताच सुक्या लाकडांच्या चिरफळ्या होतात.

ती लाकडे फोडीत असताना मालकिणीला तिच्या घरच्या चौकश्या करण्याचे सुचले.

" रात्री सोबतीला कोण असतं ? "

" मी आणि माझा मुलगा असतो. "

" कोंतूच्या घरचं कुणी नाही ? "

" ते सगळं विकून कधीच निघून गेले. "

" कोंतूच्या मावशीचा एक मुलगा होता ना ? "

" तो लहानपणीच बेपत्ता झाला. "

" तुझ्या घरातून ? "

सुक्या लाकडावर तिनं जोरात कुऱ्हाड मारली. कुऱ्हाड हातातून सुटून जमिनीवर पडली.

धाकट्या मालकिणीने ते पाहिले.

" बाई ग ! तू त्या कुऱ्हाडीचा फाळ बिघडवशील. "

तेवढ्यात कुऱ्हाडीचा फाळ सुटला. पायाच्या अंगठ्याला जखमं झाली.

" आई ग ! " म्हणत ती मटकन खाली बसली. अंगठ्यातून रक्त निघत होते. एकदाच जखमेकडे बघितले.

स्वयंपाकघरातून धाकट्या मालकिणीचा आवाज आला,

" पायाला लागलं का ? संध्याकाळी ...... काय ग पारो ? "

" ना ... ही ... "

हळूहळू उखळ असलेल्या खोलीच्या व्हरांड्यात जाऊन बसली. खूप दमली होती. डोळे मिटत होते.

" काय झालं ? " एक पुरुषी स्वर.

पारुक्कुट्टीने डोके वर करून पाहिले नाही. पायावर थंड पाणी पडले. डोळे उघडून पाहिले तर दोन्ही पाय काळ्या दणकट हातांमध्ये होते. जखमेवर घट्ट पट्टी बांधून तो म्हणाला, " जास्त नाही ना लागलं ? "

" निष्काळजीपणानं काम करायचं ... " आत जाता जाता धाकटी मालकीण म्हणाली.

तिचे बोलणे ऐकून असे वाटावे की, पारुक्कुट्टीने जाणूनबुजून आपल्या पायावर कुऱ्हाड मारून घेतली आहे. शंकरन नायर म्हणाला, " हं. अशा कामांची सवय नसली की असं होतंच. "

कुऱ्हाडीचा फाळ नीट करून मुठीत बसवून तो गुपचूप निघून गेला; जणू काही झालेच नव्हते.

पारुक्कुट्टी उभी राहिली. अंगठा अजून दुखतोय. पण जास्त नाही. आधी मात्र ती खूप घाबरली होती.

जमिनीवर पसरलेली लाकडे हळूहळू गोळा केली आणि स्वयंपाकघरात नेऊन ठेवली. डलप्या उखळ असलेल्या खोलीत ठेवून दिल्या.

भिंतीशी टेकून थोडा वेळ उभी राहिली. अजून घाबरलेली आहे. अंगठ्याऐवजी जरा वर इजा झाली असती, तर पायच तुटला असता.

आपल्याला काम करता येत नाही आणि बेकार बसून राहावे लागेल ही कल्पना-सुद्धा पारुक्कुट्टीला सहन झाली नाही. तिची आता एवढीच प्रार्थना होती की अप्पुण्णी जोपर्यंत कर्तासवर्ता होत नाही तोपर्यंत तिच्या कामात बाधा येऊ नये.

" धाकट्या मालकीणबाई ! "

धाकट्या मालकिणीने ऐकलेच नाही.

काळोख होऊ लागला. तलावाकाठच्या स्नानगृहावरून सुपारीच्या झाडांमधून आकाश हळुहळू काळे होत असलेले दिसत होते. असे वाटले की झाडांमध्ये काळोख दाटीवाटीने गोळा होतोय. इल्लमच्या आवारात दिवसासुद्धा काळोख असतो. सुपारीचे बन आणि केळीच्या बागा घनदाट पसरल्या आहेत.

" धाकट्या मालकीणबाई ! "

" आले, थांब. "

तिला वाटले, इल्लमच्या स्वयंपाकघरासमोर असे उभे राहणेच तिच्या नशिबी आहे.

आपल्या घरी असायची तेव्हा संध्याकाळ होण्यापूर्वी आंघोळ करून, दिवा लावून घरासमोर ठेवायला लागायचा. नागवनात, समोरच्या दीपमाळेवर, अंगणाच्या चारी कोपऱ्यांत आणि तुळशीच्या वृन्दावनाच्या कोनाड्यात दिवे लावून ठेवायला लागायचे. देवघरात देवीपुढे तुपाचा दिवा ठेवायचा. बस. संध्याकाळचे एवढेच काम असायचे.

संध्याकाळी सर्व मुले प्रार्थना म्हणायची आणि ती व्हरांड्यात खांबाला टेकून आकाशाकडे पाहात उभी राहायची.

तो काळ आता खूप खूप दूर गेला आहे.

त्या गेलेल्या दिवसांची आठवण होऊ द्यायची नाही, असा तिने निश्चय केला होता.

" पारो ! " धाकट्या मालकिणीने हाक मारली.

उंबरठ्यावर सुपात दोन शेर तांदूळ ठेवले होते.

टोपली आणून त्यात ते टाकले आणि दरवाजा बंद करता करता " मी जाते. " म्हणून निरोप घेतला.

ती निघाली. मागून शंकरन नायर येतोय हे कळले तेव्हा तिचे मन जणू शांत झाले. त्यालाही त्याच वाटेने जायचे होते. संध्याकाळी थोडे अंतर का होईना तिला एकटीला जावे लागले नाही. ती पुढे चालली होती आणि शंकरन नायर तिच्या मागेमागे. पण त्यांच्यांत काहीच बोलणे झाले नाही.

शंकरन नायरच्या समोर डोके वर करून उभे राहणे जड वाटत होते. घरी होती तेव्हापासून शंकरन नायरला ओळखत होती. घरासमोरच्या विहिरीतून तो पाणी ओढायचा. हरिजन त्या विहिरीला स्पर्श करू शकत नव्हते. दिसायला काळा कुळकुळित माणूस होता आणि त्याचा आवाजही तसाच कर्कश होता. दिसायला अजून तसाच आहे. वयामुळे त्याच्या शरीरात कसलाच बदल झालेला नाही.

बरेच दिवस कुठल्यातरी मोठ्या कुटुंबात काम करीत होता. मग इल्लममध्ये आला. त्याच्या घरी दुसरे कोणी नाही.

" अप्पुण्णी शाळेत जात नाही ?"

" जातो ना."

वळणाशी आल्यावर नायरने विचारले, " कितव्या इयत्तेत आहे ?"

" आठवीत, त्याला..." ती काहीतरी सांगू लागली.

" काय ?"

" उद्या नागपूजेला जायचा हट्ट करतोय. ऐकत नाही. काय करू ? नशिबात काय लिहिलय कुणास ठाऊक ! पोर रडायला लागला तर मी काय करणार ? मनचं बोलायला माझं असं कुणीच नाही !"

आपण एकदम नायरला एवढं सर्व सांगून टाकू असं तिला वाटलं नव्हतं.अप्पुण्णीचा विषय निघाल्याबरोबर तिला रडू आलं.

" जायला काही हरकत नाही. त्या घरात त्याचाही हक्क आहे."

" दोन दिवस पायाला पाणी लागायला नको." एवढं सांगून तो निघून गेला. अंधारात जणू नाहीसा झाला.

पारुक्कुट्टी आता जाऊ लागली, तेवढ्यात कुंडंगलची मोलकरीण चीरूने मागून विचारले, " पारुक्कुट्टीबाई का ?"

" हो. कोण चीरू का ?"

" कुणाशी बोलत होतीस ?"

आता आली का पंचाईत. ह्या बयेला कशाला नसत्या उठाठेवी !

" शंकरन नायर होता."

घरात शिरता शिरता पारुक्कुट्टी विचार करू लागली. सगळीकडे डांगोरा पिटायला चीरूला बातमी मिळाली होती. वाईट बाई आहे.

छोटघा वदंतेपासून ते मोठमोठ्या खटल्यांपर्यंतच्या सर्व बातम्या घरोघर पोहचवण्याची जबाबदारी गावातल्या दोन व्यक्तींकडे होती. एक चीरू आणि दुसरी अम्माल धोबीण. या बाबतीत अम्मालू कोणालाही हार जायची नाही.

अप्पुण्णी चिमणीजवळ बसून जुन्या वर्तमानपत्राचे पान वाचण्यात गुंग झाला होता. त्या पानात त्याने आणलेल्या जिनसा बांधल्या होत्या. नागपूजेला जायचे ठरल्यापासून तो गेले चार-पाच दिवस खुषीत आहे.

जेवण होईपर्यंत बाहेर वादळ आणि पाऊस सुरू झाला. पाऊस विशेष नाही. पण सोसाटघाच्या वाऱ्याने वागेतल्या केळीच्या पानांच्या धांदोटघा होऊ लागल्या. भिंतीवर टांगलेली छोटी चटई भिंतीवर आपटून आवाज होत होता.

झोपण्यासाठी आडवी झाली खरी पण रोजच्यासारखी झोप येईना. अंगठघात आग होतेय.

बाहेर जोरजोरात पाऊस कोसळतोय. छपरावर पडणाऱ्या टपोऱ्या थेंबांचा ' टप् टप् टप् टप् ' आवाज ऐकत ती पडून राहिली.

अप्पुण्णी झोपी गेला. दोन्ही हात छातीशी घेऊन तो कुशीवर पडला.

पारुक्कुट्टीने चिमणी जरा लांब सरकवून ठेवली आणि मालवली.

अप्पुण्णी तीन वर्षांचा असतानाच तो मृत्यू घडला. संध्याकाळी परसात भेंडी आणि वांग्यांचे वाफे केल्यानंतर त्याने कपडे बदलले. थोडी थट्टा करीत, हसत तो बाहेर निघाला आणि नंतर परत आला तो...

या घरात ती आली तेव्हा तिच्या पोटात आठ महिन्यांचा अप्पुण्णी होता. त्या वेळी छपरावर मोजक्याच झावळघा होत्या. चैत्राचा महिना होता. वैशाखापर्यंत छप्पर घालण्याचा विचार होता. रात्री अचानक सोसाटघाचा वारा आणि पाऊस आला. चैत्रात तसा पाऊस पुन्हा कधी झाला नाही. छपरातल्या फटीतून जोरात पाणी येऊ लागले. चटई भिजून गेली. सबंध खोलीत पाणीच पाणी झाले.

त्यातल्या त्यात कोरडघा राहिलेल्या एका कोपऱ्यात ती दोघे एकमेकांजवळ बसली होती. तो तिच्या डोळघात आपली नजर मिसळून पाहत होता.

" पारुट्टी."

तला अशी हाक फक्त तोच मारायचा.

" पारुट्टी ! कसला ग विचार करतेस ?"

" काही नाही."

" आता वाईट वाटतंय का ?"

तिने तोंड वर केले आणि प्रश्नार्थक दृष्टीने पाहिले.

" पारुट्टी, मला ठाऊक आहे, तुला असं आयुष्य जगण्याची गरज नाही."

" मी असा कधीच विचार केला नाही."

आयुष्याच्या वाटेवर अडचणींच्या खाचखळग्यांतून जाण्याचा अनुभव फार जुना नव्हता.

गावकऱ्यांची निर्भर्त्सना तिच्याही कानांपर्यंत आली होती.

घरच्या लोकांनी घटश्राद्ध केले होते. श्राद्ध तर मेल्यानंतर करतात. एक मुलगी मेली, भाची मेली. दोन्ही वहिणींनी श्राद्ध केले की नाही माहीत नाही. नंतर एक धाकटी वहीणसुद्धा वारली.

तो हात धरला तेव्हा ती सोळा वर्षांची होती. ते आठवले की अजून आश्चर्य वाटते.

चौसष्ट माणसांच्या त्या कुटुंबात उत्तरेकडच्या एका खोलीत तिचा जन्म झाला. नालुक्केट्टूतच तिचें पालनपोषण झाले. मोठी झाली. बैठकीच्या खोलीखालच्या एका खोलीत इतर मुलांबरोबर तिचे शिक्षण झाले. आवारातल्या चिंचेच्या झाडाखाली उभे राहून सभोवार पाहिल्यावर जे काही दिसायचे तेवढेच तिचे जग होते. त्या पलीकडचें जग तिने पाहिले नव्हते.

उन्हाळ्यात तलावातले पाणी आटायचे. फक्त दलदल राहायची. मग आंघोळी-साठी नदीवर जाता यायचे. अर्थात एकटी जात नसे. धाकटी आजी किंवा मोठी आजी बरोबर यायची किंवा शेजारची तिच्यापेक्षा चार महिन्यांनी मोठी असलेली मुलगी यायची.

गुपचूप पायऱ्या उतराव्या लागत. फाटकातून निघून तीन शेते पार करून गेले की मैदान होते. उतरण्यासाठी पायऱ्या होत्या. वटक्केप्पाट्टच्या स्त्रिया आंघोळीला आल्या की लोक तो घाट मोकळा करून देत. थोरल्या मामाचा मृत्यू होऊन गेल्या-नंतरही घराण्याचा आब आणि दरारा कमी झाला नव्हता.

आंघोळ करून समोरूनच आत जायला लागायचे. कधीकधी समोर मामा फिरत असायचे. मग पायाशी नजर खिळवून हलक्या पावलांनी आत जायला लागायचे. आई सांगायची, चालताना मुळीच आवाज करायचा नाही.

एके दिवशी संध्याकाळी आंघोळीला गेली, तेव्हा त्याला प्रथम पाहिले. रस्त्यात

वळणाशी पारावर डोक्याला पगडी बांधलेला माणूस बसला होता. आणखी दोघे जण उभे राहून बोलत होते. जरा मान उंचावून त्याने एकदा पाहिले. विड्याने लाल-लाल झालेले ओठ, लाल खडा बसवलेले कर्णफूल. थोरल्या आजोच्या खोलीत टांगलेली राजाची तसबीर आठवली. काहीतरी बोलून तो हसला तेव्हा वाटले की त्याचे ते हसणे जणू चारी दिशांमध्ये घुमत आहे. ती आणि शेजारची मुलगी पारापाशी पोचल्या तेव्हा त्यांचे बोलणे थांबले. दोन डोळे शरीरावर रोखले आहेत असे वाटले. भराभरा चालायला हवे. पण पावले जड झाली. घाटाच्या पायऱ्या उतरताना हळूच मागे पाहिले. तो खाली उभा होता. त्या मोठ्या माणसाचे डोळे आपल्याकडे...

आंघोळ करताना मंत्रिणीला सहज विचारले,

"कोण ग तो?"

"कोण?"

"......"

"मग, तो तर कोंतुण्णी नायर. पट खेळणारा कोंतुण्णी नायर."

त्यानंतर किती तरी वेळा आंघोळीला गेली आणि पारावरच्या राजाला पाहिले.

एके दिवशी एकटी होती. आईने सांगितले होते, "एकटी नदीकडे जाऊ नकोस. तलावातच आंघोळ करून घे."

"सगळ्या कपड्यांना माती लागेल आई." असे म्हणून ती निघाली.

शेत पार करून पारापाशी आली आणि शरीरच जणू आकसून गेले. पायांना कंप सुटला? सडकेवर आल्यावर एकदा पाराकडे पाहिले. तिथे कोणी नव्हते. भराभरा चालत पुढे मैदानात आली. मग दिसले, तो वडाच्या झाडाखाली बसला होता. भराभरा चालू लागली.

"एकटीच आहेस?"

"हो" म्हटले असावे, पण स्वर ओठांबाहेर आला की नाही, नक्की सांगता येत नाही.

दुसऱ्या दिवशीही त्याला पाहिले. तेव्हा त्याने हाक मारली, "पारुट्टी".

तिचे गाल लाल झाले. हृदयाची धडधड होऊ लागली.

त्याने हसून म्हटले, "मी याच गावचा. कोंतुण्णी माझं नाव."

परिचय ऐकून तिला हसू आले आणि मनात म्हटले, 'हे साहस!' ती क्षणभर तिथे थबकली.

"ठाऊक आहे."

" ठाऊक आहे ? मग अशी का निघून जातेस – जण कधी पाहिलंसुद्धा नसावं. "

" रस्त्यात बोलता येत नाही. "

अशी ओळख झाली.

आजी वारली तेव्हा अंत्यविधीची आणि श्राद्धाच्या जेवणाची तयारी करण्यासाठी आलेल्या गावकऱ्यांमध्ये कोंतुण्णी नायरसुद्धा होता. वरच्या मजल्यावरच्या खिडकीतून त्याला खळ्यात काम करताना आणि काम करून घेताना पाहिले होते.

भगवती मंदिरातल्या बलि-उत्सवाच्या वेळी आरतीची थाळी घेऊन जातानाही तो दिसला होता. थाळीत जळता दिवा घेऊन दुरून मिरवणुकीबरोबर मंदिरापर्यंत जायचे होते. महामारीच्या दिवसांत झालेल्या बलि-उत्सवानंतरचा हा पहिला बलि-उत्सव होता. सर्व नायर कुटुंबांतल्या मुली थाळी घेऊन या उत्सवाला जायच्या. सर्वांत प्रथम कलम[1]ची थाळी, त्यानंतर थोरल्या घराची[2] आणि तिसरी थाळी वटक्केप्पाट्टची[3] असते.

त्या वर्षी दंगा होणार असे म्हणत होते. शिवरात्रीच्या दिवशी ' पूतम '[4] आणि ' तरां '[5]ची सवाद्य मिरवणूक मशिदीसमोरून गेली म्हणून मुसलमानांनी रस्ता अडवला होता. मारामारीत बरेच जण जखमी झाले होते.

" मुसलमान लोक दंगा करतील का ? "

कुटुंबप्रमुखांनी शंका व्यक्त केली. सर्व नायर कुटुंबांतल्या सज्ञान मुली आरती घेऊन मिरवणुकीत सामील होणार होत्या. कुठे गडबड झाली तर ?

गावातले तरुण बलीची तयारी करीत होते. कोंतुण्णी नायर त्यांचा प्रमुख होता. ज्या ज्या घरातल्या लोकांना भीती वाटत होती त्या त्या घरी जाऊन धीर दिला की काही गडबड होणार नाही. कोंतुण्णी नायरच्या जिवात जीव आहे तोपर्यंत काही होणार नाही !

दुपारी मोठ्या धामधुमीने उत्सव झाला. पंचवाद्यम झाल्यानंतर लोक बलीच्या

---

१, २, ३, प्रसिद्ध नायर घराण्यांची नावे.

४. ५, केरळात देवीच्या मंदिराशी संबंधित उत्सवांमध्ये आणि इतर सणांच्या प्रसंगी ' पालन ' नावाच्या खालच्या जातीचे लोक चित्रविचित्र वेष धारण करून मिरवणुकीबरोबर जातात. असे वेष करतात त्यांना ' पुतम ' आणि ' तरा ' म्हणतात. हे लोक देवीचे भूतगण आहेत अशी श्रद्धा आहे. पूर्वीच्या काळी उत्सव, सण अशा निमित्तांनीच लोक परस्परांना भेटत. अशा प्रसंगी आपल्या कलेचे प्रदर्शन करण्यासाठी लोक विचित्र वेष धारण करून शारीरिक हावभाव करीत. काही ठिकाणी हे लोक घरात जाऊन देवीच्या नावाने भेटवस्तूही घेतात.

नआवारातू मंदिराकडे निघाले. सुसज्ज थाळ्या घेऊन मुली दोन रांगांमध्ये उभ्या राहिल्या. त्यांच्या मागे त्यांच्या संरक्षणासाठी तरुणांनी एक भिंतच उभी केली. तरीही त्यांच्या मनात भीती होतीच.

पारुक्कुट्टीला थाळी घेणे मुळीच आवडत नव्हते. आईचे म्हणणे होते की, ' ते एक व्रत आहे. देवीच्या उपासनेत कुठं हयगय करून चालणार नाही ! ती कुलस्वामिनी आहे. घरात वास असतो तिचा. '

थाळीत निरांजने उजळली. चालायला लागल्याबरोबर तिने वळून पाहिले. धाकटे दादा मागे असतील असे तिला सांगितले होते. पण दिसला कोंतुण्णी नायर. त्याचे डोळे जणू आश्वासन देत होते, ' मी आहे तुझ्या पाठीशी '. गर्दी उसळली तेव्हा ते एकमेकांच्या खूपच जवळ आले. त्याचा श्वासोच्छ्वास तिच्या मानेला जाणवत होता. तिला कळेना, बलीच्या स्थानाशी केव्हा पोचणार.

त्यानंतर कितीतरी वेळा भेटण्याची, बोलण्याची संधी मिळाली. खरं म्हणजे, संधी घेतली. तो दादाचा मित्र झाला. कधीकधी तो घरीही येऊ लागला. थोरल्या मावशीला ते आवडले नाही. तिथेच अरिष्ट सुरू झाले.

एके दिवशी अचानक कळले की तिचे लग्न ठरले. वर माणियुर गावचा होता.

वर आणि दोनतीन पुरुष एके दिवशी घरी आले. थोरल्या मामाशी बोलणी झाली. घराच्या दक्षिण भागात त्यांचे जेवण झाले. गावातली इतर दोन-तीन प्रमुख मंडळीही होती. खाताना धाकट्या अक्काने खूण करून वर दाखवला. मुलगी दाखवण्यासाठी तांब्यात पाणी देऊन तो बाहेर व्हरांड्यात ठेवण्यासाठी तिला पाठवले.

वराने तारुण्य कधीच ओलांडलेले दिसत होते. ओठांवर आणि पंजांवर पांढरे डाग होते. त्या डागांनी त्याच्याविषयी घृणा वाटत होती. एकदाच त्याला पाहिले.

ती रात्रभर रडत होती. कुणालाही काही सांगितले नाही. सांगून तरी काय फायदा होता ? आईला ठाऊक होते. पण...

" कुंजिकृष्णननी ठरवून टाकलं, त्याला मी काय करू ? "

" त्याच्याकडं जंगलं, वनं, शेतं, तलाव वगैरे आहेत असं ऐकलं. त्याची वैयक्तिक संपत्तीसुद्धा म्हणे खूप आहे. त्याची पहिली बायको मेली आहे. दुसरीला त्यानं काडी-मोड दिलाय. तरी चांगला माणूस आहे. दुसऱ्या बायकोच्या मुलांचं पालनपोषण करतोय. ' त्या दिवसापासून असेच बोलणे चालले होते.

एकदा कोंतुण्णीला भेटावे अशी तिची इच्छा होती. शेवटी लग्नाच्या आदल्या

दिवशी थोरल्या आजीचा आशीर्वाद घेऊन परतताना तो भेटला. तिच्याबरोबर मोलकरणीची मुलगी होती.

झाडाची एक फांदी धरून, पारावर पाय टेकून तो वाटेत उभा होता. विड्याने रंगलेल्या ओठांवर निर्भय स्मित होते. त्याला बघताच तिला रडू कोसळले.

" पारुट्टी ! "

" ...... "

" बोल, पारुट्टी ! "

आधी तोंडातून एक शब्दही निघना, काय बोलायचे ते आठवेना. मग बरेच काही सांगितले, बरेच काही ऐकले. मन पुनर्विचार करायला धजेना.

" पारुट्टी, माझ्यावर विश्वास आहे ? "

तिला बोलता येत नव्हते, हृदय जड झाले होते.

" माझ्यापाशी नालुक्केट्टू नाही किंवा खळेही नाही. पण मी पुरुष आहे. धैर्य असेल तर माझ्याबरोबर चल. मनगटात ताकद आहे तोवर तुला काहीही कमी पडू देणार नाही. "

त्याच्या शरीरापेक्षा त्याचे बोलणे दणकट होते. डोळे मिटून सावकाश म्हणाली, " येईन मी. "

त्याने त्याचा शब्द पाळला. जिवंत असेतो त्याने तिचे सगळे व्यवस्थित केले होते. गावातले लोक सांगायचे, लग्नानंतर (ते लग्न होतं का ? ) तो एकदम बदलून गेला. त्यानंतर तो कधी पट खेळला नाही. दारूही जास्त पीत नसे. रात्रंदिवस बागेत खपायचा.

बाहेर पाऊस थांबलाय. अजून वारा मात्र आहेच. अजून पाऊस यणार आहे. खिडकीवर टांगलेल्या चटईतून वीज चमकताना दिसत आहे. हवेत गारठा आहे. अप्पुण्णीच्या अंगावर पंचा घातला आणि त्याला छातीशी घेऊन झोपली.

# दोन

दुपारपर्यंत घर भरून गले. दक्षिण आणि उत्तर भागांत स्त्रियांची झुंबड. मुले रडत आहेत. ही सगळी घरातली किंवा नात्यागोत्यातली माणसे आहेत. बाहेर आणि म्हरांड्यात जरा मोठी मुले आहेत. मांडवात आणि अंगणात पुरुषांची गर्दी आहे.

मांडवाच्या जवळच नारळाच्या झावळ्यांनी आकारलेला एक मोठा तंबू आहे. त्यात नागपूजेची गाणी गाणारे पुल्लुवर[1] बसले आहेत. त्यांना मधूनमधून विडे, पाणी वगैरे पोचवण्याचे काम मालूकडे आहे. मालू धाकट्या मामाची मुलगी. पुल्लुवरांचा म्होरक्या राम आहे. त्याची बायकोसुद्धा गाते.

खोल्या, मांडव आणि तंबू या सगळ्याच ठिकाणी झुंबड उडाली आहे. मालूला मुळीच फुरसत नाही. मध्येच एखादी बाई आपले रडणारे मूल तिच्याकडे देते आणि म्हणते, " घे, याला जरा बाहेर नेऊन गप कर बघू. "

रडणाऱ्या मुलाला गप्प करण्याचे काम प्रथम बरे वाटले. पण मग आणखी पाहुणे आले आणि गप्प करावयाच्या मुलांची संख्या वाढत गेली. तिला कोणाला ' नाही '-सुद्धा म्हणता येईना.

घरून निघताना वडिलांनी समजावून सांगितले होते की, ' कोणी काहीही काम सांगितलं तरी करायचं. सांगितलेलं ऐकायचं.

सर्वच नातेवाईक आहेत, पण त्यांपैकी बहुतेकांना मालू ओळखत नाही.

नागपूजेसंबंधी तिलाही खूप उत्सुकता होती. तुळ्ळलचे फक्त नावच ऐकले होते.

वर आणि खाली अशी दोन नागवने आहेत. दोहोंत मिळून तीन नाग आहेत. मालूला त्यांची नावे ठाऊक आहेत– काळा नाग, मणी नाग आणि अंजनमणी नाग.

काळा नाग वाईट आहे. नीच जातीचा आहे. मालूला वाटले, चात्तन[2]सारखा

---

१. एका खालच्या जातीचे लोक.

२. एक खालच्या दर्जाचा देव.

असेल. म्हणूनच शिवरात्रीच्या दिवशी आधी काळ्या नागाला दूध-फळे दिली जातात. वरच्या वनात आधी नैवेद्य दाखवला तर काळा नाग तो अपवित्र करून टाकतो.

मालूने हे नाग कधी पाहिले नाहीत. सर्पवनात चित्रकूट[1] दगडाखाली त्यांचा वास असतो. प्रत्येक दगडाखाली बरेच साप असतात. एके दिवशी यांपैकी एक नाग घरासमोर शिडीजवळ पाहिला होता. तंकम ताई तिथे निरांजन ठेवायला गेली आणि ओरडली, " आई, मावशी, साप. "

निरांजन न लावताच ती पळत आली.

" तिन्हीसांजेच्या वेळी कशाला ग ओरडतेस ? " आपल्या मुलीवर रागावत तंकम ताईची आई– आत्या आली. तंकम ताईसुद्धा आली.

" तिथं साप आहे, आई. "

आत्याने ओरडून सर्वांना बोलावले, " कुट्टन, मीनाक्षी, भास्कर साप आहे. अंगणात साप आहे. "

मालूचे वडील आत्यापेक्षा वयाने लहान आहेत, म्हणून आत्या त्यांना नावानेच हाक मारते. वडील आले, भास्कर दादा आणि कृष्णन कुट्टीसुद्धा आले. आतून आजी-सुद्धा हळुहळू चालत बाहेर आली.

" कुठंय साप ? "

साप नाहीसा झाला होता. सगळीकडे शोधले, पण सापडला नाही.

आजीने सर्वांना सांगितले, " हे पाहा पोरांनो, त्याला मारायचं नाही. थट्टेवारी नेऊ नका, वनातला साप असणार तो. "

थोड्या वेळाने थोरले मामा आले. सर्वजण उठून आत निघून गेले. मालूचे वडील बाजूला जाऊन उभे राहिले. आजी सापाची हकीकत सांगायला थांबली होती.

हकीकत ऐकून थोरले मामा म्हणाले, " दूध-फळं सर्व दिलं होतं, तरी पुन्हा का दिसला ? "

थोडे थांबून येरझारा घालीत ते म्हणाले, " काय सांगू ? स्पृश्य-अस्पृश्य, शुद्ध-अशुद्ध काही राहिलं नाही हल्ली. "

मग मालूच्या वडिलांना म्हणाले, " कुट्टन उद्या शेतावर जाताना भटजींना शुद्धी करण्यासाठी इथं यायला सांग. "

---

१. सर्पवनात सापांच्या नावाचे दगड ठेवतात. त्यांना चित्रकूटदगड म्हणतात. संध्याकाळी याच दगडांवर नागांसाठी दिवे लावून ठेवतात.

त्यानंतर बऱ्याच ठिकाणी साप दिसला. गोठयाच्या मागे, फणसाच्या झाडाखाली. ज्योतिष्याचा सल्ला घेतला.

"सर्पांना तहान लागलीय, फक्त दूध देऊन भागणार नाही. तुल्लल नागपूजा करावी लागेल." आणि मग नागपूजेची तयारी झाली.

समोर मुलांमध्ये बसल्यामुळे मांडवात काय चालले आहे ते सर्व मालूला दिसते. पण मध्येच तंकमताईने किंवा मीनाक्षी आत्याने बोलावले की जावे लागते.

आज पूजेला तंकमताई आणि अम्मिणीताई बसणार आहेत. अम्मिणीताई थोरल्या मामाची धाकटी मुलगी. मामी आणि मुले कालच आली होती.

समोर लुंगी गुंडाळून आणि खडावा घालून थोरले मामा फिरताहेत. त्यांच्या छातीचे केस पांढरे झाले आहेत. मांडवाच्या आत आणि बाहेर उभ्या असलेल्या लोकांशी मामा 'गेले ते दिवस' अशा थाटाच्या गप्पा करीत आहेत.

या बैठकीत अच्चूमामाचे नुसते आगमन पुरेसे होते. या घरचे कोणी त्रही काढीत नव्हते.

काही म्हातारी मंडळी आदराने ऐकत होती.

कलतिक्कम्मल[1] नवीन धोतर नेसून, कपाळावर चंदनाचा टिळा लावून कानात तुळशीची पाने खोचून शिवाशिव होणार नाही अशा रीतीने जरा दूर, वेगळा उभा होता. नारायण नायर कलतिक्कम्मल आहे. तो म्हणाला, "मला आठवतात ते. वाघ होते, वाघ ! "

गावातील म्हातारी मंडळी घरी आली की थोरले मामा अशाच जुन्या जमान्याच्या गोष्टी करू लागतात. दोन नालुक्केट्ट्, खळे, चौसष्ट माणसे, वाघासारखे अच्चूमामा, त्यांच्या जमान्यातल्या गोष्टी ... वाटण्या झाल्या, तो प्रसंग.

"आज गावात खूप लोक श्रीमंत झाले आहेत. या कुटुंबापेक्षा श्रीमंत कुटुंब नायर समाजात आहेत. पण या घराण्याची बरोबरी कोणतं घराणं करू शकेल ? "

एक म्हातारा मान डोलवीत म्हणाला, "खरंय, खरंय ते. या सगळ्या गेल्या पावसाळ्यात उगवलेल्या कुत्र्यांच्या छत्र्या आहेत."

"माझ्या खळ्यातून धान्य न्यायचे, ते आज दुमजली घर बांधून राहताहेत."

म्हाताऱ्याने पुन्हा मान डोलवली.

"हे फालतू घराणं नाही. इथं देवीचा वावर आहे."

---

१. नागपूजेच्या पुजाऱ्यांना कलतिक्कम्मल म्हणतात.

" ते तर या कुटुंबाचं भाग्य आहे. ऐश्वर्य आहे. याच देवीनं अन्न आणून भरवलं होतं. "

मालू खिडकीजवळून दूर झाली आणि हळूच स्वयंपाकघराकडे गेली.

तंकमताई आणि अम्मिण्णी ताई या दोघीही स्नान वगैरे आटोपून नवे कपडे घालून कोणाची शिवाशिव होऊ नये म्हणून लांब वेगळ्या बसल्या आहेत. तंकमताई एरवीच स्वतःला मोठे समजायची. आज तर काय, विचारायलाच नको. अम्मिण्णी ताईनं स्नान करून चंदनाचा टिळा लावून त्याच्या मधोमध कुंकू रेखले आहे. खूप सुंदर दिसत आहे ती. मालू अम्मिण्णीताईकडे टकमक पाहत राहिली. तिला तिचा हेवा वाटत होता. सोन्यासारखा वर्ण, गळ्यातल्या निळ्यानिळ्या शिरा दिसताहेत, डाव्या खांद्यावरून पुढे टाकलेले केस काळ्या नागांसारखे भासताहेत.

थोरल्या मामांच्या मुलांपैकी फक्त कल्याणीताई आली नाही. तिला मुलगा झालाय. तिचा मोठा मुलगा मामीबरोबर आला आहे.

थोरल्या मामीच्या घरी जायला चार मैलांचा रस्ता पायी तुडवावा लागतो. नदी ओलांडल्यानंतर आणखी एक ओढा आहे. थोरली मामी आपल्या घरात राहत नाही, त्यांचे एक नवे घर आहे. तिथे नारळीची बाग आहे. गुदस्ता थोरल्या मावशी-बरोबर मालूही तिथे गेली होती.

थोरल्या मामीच्या गळ्यातले चमकणारे नेकलेस फारच छान आहे. मालूच्या गळ्यात फक्त दोऱ्यात ओवलेला ताईत आहे. तिच्या आईच्या गळ्यात असायचा तो. ती वारली, तेव्हा कुणीतरी दोरा कापून तो तिच्या गळ्यातून काढला. तेव्हापासून मालू तो गळ्यात घालू लागली.

अम्मिण्णीताई बराच वेळ तिच्याकडे पहात राहिली.

" मालू कधी आलीस ? "

तंकमताईने उत्तर दिले, " ही पोरगी मागच्या वर्षापासून इथंच आहे. तिला इथं येऊन एक वर्ष होऊन गेलंय. "

आई वारल्यानंतर तिला घरी करमेना. वडिलांकडे काहीही नव्हते. आजी म्हणाली होती, " मालू इथं येऊन राहिली, तर मीनाक्षीला थोडी मदत होईल. "

अंगणात जेवणावळीसाठी पत्रावळी घातल्या जात होत्या. पहिल्या पंगतीला मुले आणि बायका बसणार होत्या. अंगणात मुलांसाठी आणि दक्षिण–उत्तरेकडल्या खोल्यांत बायकांसाठी पत्रावळी घातल्या होत्या.

थोरले मामा गरजले,

" कुट्टन, पहा, एखादं मूल राहून जायला नको. संध्याकाळपूर्वी सुरुवात व्हायला हवी. "

मालूला मुलांबरोबर बसावेंस वाटले नाही. बायकांमध्ये तिला बसायचे होते. लवकर जेवून घेतले की चांगल्या ठिकाणी बसता येईल. दाराशी एक पत्रावळ रिकामी होती.. तिथे ती बसली. दोन पंगतींमध्ये वीस ते तीस मुले बसली होती.

मांडवासमोरच्या खांबाशी बसलेले बरे. अगदी खालीच फरशीवर नागमूर्ती केल्या आहेत. त्या तिथून चांगल्या दिसत होत्या.

भराभर खाऊन तिने जेवण चटकन आटोपले, हात धुवून पूर्वेकडील व्हरांडयात जाताना तिला फाटक्या पत्रावळीशेजारी भिंतीशी एक मुलगा बसलेला दिसला. त्याने तांबडी चड्डी आणि मळकट हिरवा शर्ट घातला होता. मालू थोडा वेळ गप्प उभी राहिली. मग जवळ जाऊन तिने विचारले, " तू जेवलास का ? "

तो डोके वर करून तिच्याकडे आश्चर्यचकित नजरेने पाहत राहिला.

" तू जेवलास की नाही ?"

" अंहं. "

" बाकी सर्व मुलांची जेवणं झाली. "

" म्हणून काय झालं ?"

काहीशा निश्चयाने त्याने उत्तर दिले. मालू ओशाळली.

" जेवणार नाहीस का ?"

" खूप जेवणावळी पाहिल्यात. "

त्याचा उपहास आणि रूक्षपणा पाहून मालू जाऊ लागली. पण त्याला मान खाली घालून बसलेले पाहून तिने हळूच विचारले, " तू कुठला आहेस ?"

न ऐकल्यासारखे करून तो भिंतीकडे पाहत राहिला.

" नाव काय तुझं ?"

" अप्पुण्णी "

" तू कुठला आहेस ?"

त्याचा चेहरा लाल झाला. तिच्याकडे रागावून पाहत म्हणाला, " मी इथलाच आहे ? तुला काय करायचंय ?"

त्याच्या त्या रागावण्याचे मालूला वाईट वाटले नाही, गंमतीचे वाटले. तो याच घरातला मुलगा आहे म्हणे. मालूची थट्टा तर तो करीत नाही ना ?

" इथल्या मुलांना तर मी ओळखते ! "

मालू आणखी काही म्हणणार होती, एवढ्यात त्याचे डोळे भरून आलेले दिसले.

" मी कोंतुण्णी नायरचा मुलगा मी नि माझी आई इथले आहोत. "

मालूचा प्रश्न तिच्या ओठांतच विरला. तंकमताईने तिला हळू आवाजात जी घटना सांगितली होती, ती आठवली. ज्या आत्याची गोष्ट तिने सांगितली होती ती आत्या कधी पाहिलीही नव्हती. हाच तो अप्पुण्णीदादा.

मोलकरणी खरकट्या पत्रावळी बाहेर घेऊन जात होत्या. हरिजनांची मुले त्या पत्रावळींसाठी भांडत होती. मालूही व्हरांड्यात बसली.

" रडतोस कशाला ?"

तो काहीच बोलला नाही.

" एकटा आला आहेस ?"

" झोपडीतली आजी पण आलीय. "

" तिला तर मीच पान वाढून दिलं. पण ती काही बोलली नाही ! "

म्हातारीविषयी तिने आपले मत सांगितले, " आजीला फक्त पान आणि कढीचीच चिंता आहे. "

अप्पुण्णीला हसू आले.

" आपण सर्व मुलांच्या आधी चांगली जागा पकडून बसू या. "

त्याला ती सूचना पटली.

पश्चिमेच्या व्हरांड्याच्या खांबाशी बसून छान दिसेल.

ती पुढे आणि अप्पुण्णी तिच्या मागोमाग निघाला.

तंबूत अचानक ढोल वाजू लागले. मालूने उत्साहाने त्याच्याकडे पाहत म्हटले, " आता सुरू होणार. "

मांडव चारी बाजूंनी तोरणे आणि आंब्याची पाने यांनी सुशोभित झाला आहे. नागांच्या मूर्ती तयार आहेत. तांदूळ व हळद तसेच चुना व हळद यांच्या मिश्रणाने बनलेले तांबडे चूर्ण यांनी दोन भयानक सापांच्या मूर्ती बनवल्या आहेत. दोन्ही सापांनी एकमेकांना वेटोळी घातली आहेत आणि फणे उभारले आहेत.

मांडवाच्या मधोमध केळीचे खांब उभारून व त्यांवर लाल रेशमी चादर टाकून एक छोटासा मंडप बनवला आहे. खाली सबंध लाद्यांवर नागांच्या मूर्ती तयार केल्या आहेत.

रामाने मांडवाच्या दाराशी उभे राहून म्हटले,

" दिवा लावा. "

बाहेर संध्याकाळचा अंधार थोडथोडा पसरू लागला. केळीच्या खांबाजवळच चारही कोनांत समयदिवे लावून टांगले होते.

" पूजेचं साहित्य आणून ठेवा. " राम परत म्हणाला.

केळीच्या लांबट पानांवर पोहे, लाह्या, तांदूळ, तुळशीची पाने, फुले वगैरे साहित्य ठेवले गेले.

" पुजारी "

" जी "

कोरे कापड गुंडाळलेला एक माणूस मांडवात आला. मालूने अप्पुण्णीला सांगितले, " तोच पुजारी. "

राम सांगू लागला, " हात-तोंड धुवून नाग देवतांचं स्मरण करून प्रथम डावं पाऊल टाकून या खांबाला प्रदक्षिणा घाला. नंतर पूर्वेकडे तोंड करून पाटावर बसा.

पुजाऱ्याने त्याप्रमाणे केले.

" खांबाखाली तांदूळ आणि नारळ ठेवा. "

रामाच्या आदेशाप्रमाणे पूजेला सुरुवात झाली. पूजा झाल्यावर साष्टांग नमस्कार केला. तांब्याचे तोंड झाकून ' कलम '[१]च्या चारी बाजूंना फिरून पाणी शिंपडले. तो एका बाजूला उभा राहिला. एकदम एका स्वरात ढोल वाजू लागले. भाद्रपदात अचानक जमणाऱ्या ढगांच्या गर्जनांसारखे.

मांडवाच्या दुसऱ्या बाजूला ' पुल्लुवर '[२] आणि त्यांच्या बायका बसल्या आहेत, तीन ढोल, तीन घडे, दोन वीणा घेऊन -- ढोलांच्या आवाजात घडे आणि वीणा यांचा आवाज लुप्त होतो.

रामच्या बायकोने गायला सुरुवात केली.

" श्री महादेवाच्या... "

गाण्यात अप्पुण्णीला रस वाटेना. तिथे जमलेल्या लोकांकडे तो बघू लागला. ज्या चबुतऱ्यावर तो बसला होता त्याखाली चटईवर काही लोक बसले होते. बैठकीच्या खोलीच्या भिंतीशी टेकून काही तरुण उभे होते. त्यांच्या थोडे मागे गवताच्या चटईवर स्त्रियांची गर्दी आहे. त्याच्यासमोर ही गर्दी उसळली आहे.

---

१. ज्यांवर नागमूर्ती बनविल्या आहेत, त्या फरश्या.

२. कलम्प्पाट्टच्या (नागपूजेच्या) प्रसंगी गाणी म्हणणारे एका खालच्या जातीचे लोक.

अंगणात एक उंच, जाडजूड गोरा माणूस छाती काढून येरझारा घालीत होता. कुठूनही कसलाही आवाज आला की त्याची नजर तिकडे वळे. भीती वाटावी असे काहीतरी त्याच्या तांबूस चेहऱ्यात आहे.

अप्पुण्णीने मालूला हळूच विचारले, "ते फिरताहेत, ते कोण ?"

ती अगदी हलक्या आवाजात म्हणाली, "थोरले मामा."

थोरले मामा. अप्पुण्णीचं हृदय धडधडलं. त्यांच्या तांबूस चेहऱ्याकडे पुन्हा पाहायचा धीर त्याला झाला नाही. हेच ते थोरले मामा, हेच ...

उत्तरेकडच्या खांबाजवळ ठेवलेली मोठी दिव्याची वत्ती कोणीतरी ठीक केली. तो एक काळा, फाटक्या अंगाचा माणूस होता. त्याच्याकडे खूण करून मालू म्हणाली, "तेच माझे बाबा."

"अप्पुण्णिदादा त्यांना कुट्टनमामा म्हणणार ना ?"

थोरले मामा !

कुट्टन मामा !

इतर माणसेही आहेत. त्या मुलांमध्ये भास्कर आणि कृष्णन कुट्टी असतील, स्त्रियांमध्ये थोरली मावशी असेल आणि ...

मालूला सर्वजण माहीत आहेत. तिला विचारले तर कळेल. 'आजी, मामा, मुलं. आईची आणखी एक मोठी बहीण आहे. काय बरं तिचं नाव, तिला हाक कशी मारायची ?'

'आता काहीही जाणून घ्यायची इच्छा नाही. येताना असं काही वाटलं नव्हतं. आल्याबरोबर मुलांशी खेळायला मिळेल. आत, वर बैठकीच्या खोलीत, मांडवात, बागेत सगळीकडे मनसोक्त भटकायला मिळेल, असे मनसुबे रचले होते. येताना मनात केवढा उत्साह होता !'

समोरच्या फाटकातून तो आला नव्हता. टेकडी उतरून गल्लीत येऊन तो थबकला होता. म्हातारी मागे होती. समोर घर दिसत होते.

अंगणात आल्यावर म्हातारीने सांगितले, "खाली मुलांमध्ये जाऊन बस."

तो आ वासून उभा राहिला. मोठ्ठं आंगण. उंच,उंच लाकडी खांबांवर रचलेल्या गवताच्या राशी. मोठा गोठा. त्यात बांधलेले सात-आठ बैल.

वळून पाहिले तर म्हातारी स्वयंपाकघरात पोचली होती. तो एकटा राहिला. अंगणात खूप माणसे होती. त्याच्याकडे कोणीच लक्ष दिले नाही. पूर्वेकडच्या व्हरांड्यात एका बाजूला तो बसला. तिथे कोणी नव्हते. आतून बायकांचा कलकलाट

आणि मुलांच्या रडण्यांचे आवाज तेवढे ऐकू येत होते. तो गुपचूप बसला.

कोणी आले आणि काही बोलले, विचारले, तर ?

कोण येईल, काय विचारील, याची त्याला काही कल्पना नाही. तरी पण भीती वाटतेच.

कोणीही त्याला काहीही विचारले नाही. कोणी त्याच्याकडे लक्षसुद्धा दिले नाही. त्याच वेळी त्याला वाटले, 'आपण इथं यायला नको होतं.'

त्याला वाटले, 'जोरात ओरडून सांगावं की मी इथलाच आहे.' असे नुसते बसून राहणे त्याला असह्य झाले.

मी वटक्केप्पाट्टचा आहे.

माझं नाव व्ही. अप्पुण्णी आहे.

वर्गात हजेरीपटावर नाव असेच लिहिले होते. व्ही. म्हणजे वटक्केप्पाट्टचा.

असा विचारात बुडून गेला होता, एवढ्यात आवाज आला, "सर्व मुलांनी आता बसून घ्यायचं बरं का." मुलांना जेवायला बोलावीत होते.

"अप्पू, वासू, प्रभा – साऱ्यांनी बसून घ्यावं."

"शंकरनकुट्टी कुठं गेला ?"

"नाणू, कुट्टनला तुझ्याजवळ बसव बरं का."

बरीच माणसे बऱ्याच मुलांना हाका मारीत होती. पण त्याला कुणीच बोलावले नाही.

त्याला आता ते जेवण नकोच असे वाटू लागले.

जेवणाच्या आशेने तो आलाच नव्हता.

तो मनातल्या मनात सर्वांवर चिडला होता. त्याच्या दृष्टीने जेवणाचे काही महत्त्व नव्हते.

अगोदर बोलून त्याप्रमाणे फाश्यांचा आकडा काढणारा एकच खेळाडू होता. तो म्हणजे त्याचे वडील – कोंतुण्णी नायर...

आज वडील असते, तर...

वडिलांचा विचार मनात येताच सतालिकुट्टी आठवला. लाल, लाल डोळे. त्यानेच...

हे देवी, मी याचा सूड घेणारच. तेवढ्यात मालू तिथे आली.

ती जवळच बसून गाणे ऐकत होती. आता ढोलाचा आवाज मंदावला होता. वीणेचे स्वर अस्पष्ट ऐकू येत होते.

मालू म्हणाली, " काळ्या नागाचं गाणं आहे. रामचा भाऊ गातोय. "

त्यानंतर रामच्या बायकोने गाणे म्हटले. तिने गाणे सुरू केले तेव्हा रामने पुजाऱ्याला काहीतरी सांगितले. पुजाऱ्याने मांडवाच्या बाहेर येऊन पुकारा केला, " कलममध्ये बसलेल्या सर्वांनी इकडं यावं. "

सर्वांच्या नजरा आत वळल्या.

चमचमणाऱ्या थाळीत तांदूळ, निरांजन आणि सुपारीचे फूल ठेवून खास पद्धतीचे धोतर नेसून दोन मुली मांडवात आल्या.

" पूर्वेकडच्या दारात उभ्या राहून नमस्कार करा. "

रामच्या आदेशानुसार दोन्ही मुलींनी नमस्कार केला.

" पुजारी पाणी देईल. त्या पाण्यानं आचमन करा. "

" तीन वेळा प्रदक्षिणा घालून सापांच्या डोक्याच्या बाजूला तोंड करून मांडी घालून बसा. "

प्रदक्षिणा घालून दोन्ही मुली सापांच्या शेपटीच्या बाजूला बसल्या.

" तांदूळ अन फुलं वाहून मनात नागांचं चिंतन करून नमस्कार करा. "

" सुपारीचं फूल हातात घ्या. "

थाळीतून सुपारीचं फूल हातात घेऊन त्या दोघी नागांच्या फण्यांवर दृष्टी स्थिर करून बसल्या.

अप्पुण्णी आश्चर्यचकित होऊन त्या मुलींकडे पाहत राहिला. डावीकडे काळी, किडकिडित, लांबट चेहऱ्याची मुलगी बसली आहे. खांब आड येत असल्याने ती नीट दिसत नाही. दुसरी मुलगी गोरी, शिडशिडित आणि दिसायला सुंदर आहे. कमरेच्या वरचे सुपारीच्या फुलाच्या वर्णाचे शरीर उघडे आहे. प्रथम वाटले, या मुलींना लाज कशी वाटत नाही ! पाहता पाहता असे वाटले की छातीवर दिव्याच्या वत्त्या फिरताहेत. डोळे अर्धवट मिटलेले आहेत. लक्ष देऊन पाहिले, तरच कळत होते की, त्या झोपलेल्या नाहीत त्यांना पाहत राहण्यात कसला तरी आनंद होत आहे.

त्याने मालूला विचारले, " ही कोण ग ? "

" ती तर अम्मिणीताई. थोरल्या मामांची सर्वांत धाकटी मुलगी. ती दुसरी तंकमताई. "

" दुसरी कुणीका असेना. "

गाण्याची लय आणि ढोलांचा आवाज हळूहळू वाढत होता.

आता नागवनातले नाग फणा उभारून डोलत असतील.

त्याने प्रथम फरशीवरच्या नागांकडे आणि नंतर त्या नागांवर दृष्टी खिळवून बसलेल्या आणि दिव्याप्रमाणे उजळून निघालेल्या त्या मुलीला पाहिले. तिच्या गळ्यात मौल्यवान खडा जडवलेले नेकलेस चकाकत आहे, उघड्या छातीवर वस्त्रांचा प्रकाश. हळुहळू मांडव, लोकांची गर्दी हे सगळे त्याला दिसेनासे झाले. एक वनवाट, भयाण जंगल. आभाळाएवढ्या उंच वृक्षावर राजकुमार बसला आहे. अंगात रेशमी सदरा, डोक्यावर जिरेटोप, सदऱ्यावर जडवलेली रत्ने चमकताहेत. खाली घोडा चरतोय. आपला देश पाहण्यासाठी भ्रमंती करण्याची अनुज्ञा घेऊन राजकुमार राजमहालातून निघाला होता. राज्याच्या सीमेजवळील जंगलात आल्यावर वाट चुकला. सोबतीला आलेल्या प्रधानाच्या मुलाचा पत्ता नाही......

आजची रात्र संपली की...

तेवढ्यात त्याने पाहिले की जंगलातून सरपटत, फूत्कार टाकीत एक सर्प येत आहे. सापाच्या फण्याच्या मागे एक मुलगी बसली आहे. तिच्या गळ्यात हिरा जडवलेले नेकलेस चमकत आहे. तिने जरीकाठी धोतर परिधान केले आहे...मागे लांबसडक, काळे, कुरळे, केस पसरले आहेत... डोळे अर्धवट मिटले आहेत...

ढोल एकदम बंद झाले.

अप्पुण्णी दचकून भानावर आला.

तिथे बसलेल्या दोन्ही मुलींची शरीरे डोलू लागली. त्यांच्या हातांतली सुपारीची फुले थरथरू लागली.

ढोल, घडे एकदम वाजू लागले. त्यांचा आवाज घुमू लागला. गाण्याचा तालही बदलला.

नागहो, नाचा, नाचा.

वाद्ये आणि गाणी यांच्याबरोबर मुलीसुद्धा वाढत्या गतीने डोलू लागल्या, फरशीवर त्यांचे केस काळ्या नागांप्रमाणे सरपटत होते. ते शिडशिडित गोरे शरीरही डोलत होते.

मालू काहीतरी म्हणत होती. त्याने तिकडे लक्ष दिले नाही.

गाणी चालू आहेत, ढोलांचा आवाज कानठळ्या बसवीत आहे. शरीरावर रोमांच उभे राहिले. आपणही डोलावे असे अप्पुण्णीला वाटले.

सुपारीचे फूल हातात घेऊन, जिथे सापाच्या मूर्ती होत्या तिथेच त्या मुली सापांप्रमाणे डोलत, नागमोडी वेढे घेत, बसल्याबसल्याच फरशीवर सरपटू लागल्या. सापांच्या मूर्ती अदृश्य झाल्या. त्या डोलणाऱ्या वेढे घेणाऱ्या मुलीला बघून अप्पुण्णीला

वाटले की तिचेही रूप बदलत आहे. सापाचे शरीर आणि मुलीचे डोके आहे असे वाटले. मुलीचे डोके असलेला साप फणा उभारून डोलतोय.

मालू पुन्हा काहीतरी म्हणाली. अप्पुण्णीने ऐकले नाही. त्याच्या अर्धवट मिटलेल्या डोळ्यांना पुन्हा मांडव आणि लोक दिसेनासे झाले.

मुलीचे डोके असलेला साप फणा उभारून डोलतोय. नाही, सापाच्या फण्यावर जीन घालून त्यावर स्वार झालेली मुलगी...

डोळे न उघडताच तो सगळे पाहत आहे. तो स्वतः अप्पुण्णी नसून राजकुमार आहे. आपला देश पाहायला निघालेला, वाट चुकलेला राजकुमार...

शरीराला गार वाऱ्याचा स्पर्श झाला, तेव्हा डोळे उघडले. जंगल, नाग, नागकन्या, काहीच नव्हते, वृक्षही नव्हते. तो व्हरांड्यात पडला आहे. बाहेर ओल्या कपड्यांसारखे ढगाळलेले आकाश पसरले आहे. दूर केळ्यांच्या पानांवरून दवाचे थेंब टपटपत आहेत. खाली मांडवात काही माणसे इकडेतिकडे पडली आहेत.

दारातून कोणीतरी दिवा घेऊन आले आणि परत निघून गेले. आतून जप ऐकू येत होता.

" नारायणाय नमः, नारायणाय नमः "

आपल्या स्थितीचे भान यायला त्याला थोडा वेळ लागला.

गार वारा वाहतोय. डोळे जड झाले आहेत.

आत मंद स्वरात कुणीतरी भजन म्हणत आहे.

पुन्हा डोळे मिटले.

त्याच्या अंगावर एक गार हात पडला, तेव्हा त्याचे डोळे उघडले. आश्चर्याने डोळे विस्फारून पाहिले. एक म्हातारी जवळ बसली होती. डोक्यावरचे सगळे केस पांढरे झाले आहेत. त्वचा सुरकुतलेली. लाल किनार असलेला पंचा पांघरला आहे. शरीर जर्जर पण डोळ्यांत स्मितहास्य आहे. त्याच्या मनातली भीती नाहीशी झाली.

तो काही म्हणणार होता, एवढ्यात ती म्हातारी म्हणाली, " बाळ, घाबरू नकोस. मी आजी आहे तुझी. "

आजी ! आईची आई !

" ऊठ आत ये. "

अप्पुण्णी उठून तिच्यामागे निघाला. व्हरांड्यात झोपलेल्या बऱ्याच लोकांना ओलांडून दाराशी आला. दरवाज्यावर चित्रे चितारली आहेत. दक्षिण भागात अंगण आहे. पश्चिम भागात एक दिवा जळतोय.

दक्षिण भागात बहुतेक बायका झोपल्या आहेत. त्याची नजर त्या बायकांमध्ये कालच्या नागकन्येला शोधू लागली. मोठमोठाले खांब खूप सुंदर आहेत.

पुढे उत्तर भाग आहे. खिडक्या बंद आहेत. काळोख आहे. फरशीवर काही लोक झोपले आहेत.

गल्लीतून निघून तो बिनछताच्या हॉलमध्ये आला. कालची ती मालू काहीतरी काम करीत होती.

एका खिडकीशी पाट टाकून आजी बसली. त्याला जवळ बसवून म्हणाली, " आजीला माहीत नव्हतं बाळा ! झोपडीवाल्या आजीनंसुद्धा मला सांगितलं नाही. आत्ता मालूनं सांगितलं. "

आजी त्याच्या डोक्यावर हात ठेवून म्हणाली,

"तुझं नशीब. "

थोडा विचार करून पुन्हा ती म्हणाली, "तुझं नशीब, आणखी काय म्हणणार!"

त्याला काहीच म्हणायचे नाही. त्याचे मन जड झाले होते.

" शाळेत नाही का रे जात?"

" जातो ना. "

" मोठ्ठा हो. तू तिला...तिला..." आजीचा गळा जणू दाटून आला. " तिला आता फक्त तुझाच आधार राहिलाय. "

एक बाई दारातून आत डोकावून निघून गेली. नंतर दारात बऱ्याच बायकांचे चेहरे दिसले. सर्व जणींची नजर त्याच्यावर होती. त्या आपापसांत कुजबुजत होत्या. नवेनवे चेहरे दिसू लागले

चोळी घातलेली एक प्रौढ स्त्री आजीजवळ आली. घसा खाकरून हळू पण कर्कश स्वरात म्हणाली,

" आई, तू निष्कारण संकट ओढवून घेत आहेस. "

" संकट कसलं ग ?"

" मामाला कळलं, तर पुन्हा आफत होईल. "

आजीला राग आला.

" का ? तो काय मला मारून टाकणार आहे ?"

" मला अन माझ्या पोरांना शांतता हावीय, म्हणून म्हणतेय. "

" हे बघ, ह्याच्या आईलाही मीच जन्म दिलाय."

" आई, हे सगळं तू मामाला सांग, मला सांगू नकोस. "

आजी गप्प झाली. तिने पदराने डोळे टिपले, ती प्रौढा जोरजोरात पाय आपटीत निघून गेली.

दारात आता बायका नाहीत, काही मुले आहेत. तीसुद्धा त्याच्याकडे आश्चर्याने पाहत आहेत.

काल दुपारनंतर झोपडीवाली आजी त्याला आता दिसली. स्वयंपाकघरातून येऊन ती म्हणाली, " अप्पू आपण निघायचं आता. तुला पोचवून मला..."

आजी म्हणाली, " म्हातारे, हा आत्ता येणार नाही. "

बायका एकमेकींकडे पाहू लागल्या आणि कुजबूज करू लागल्या. चोळीवाली प्रौढा घसा खाकरून तिथून तरातरा निघाली. वाटेत एक मुलगा नख चावीत उभा होता, त्याला तिने धक्का दिला.

" मालू, इकडं ये. "

मालू आल्यावर आजीने सांगितले, " अप्पुण्णीला मंजन आणि पाणी दे. "

झोपडीवाली म्हातारी पेचात पडली होती.

" म्हातारे, तू जा मी याला कुणाची तरी सोबत देऊन घरी पोचवीन. "

म्हातारी निघून गेली.

अप्पुण्णी मालूबरोबर बाहेर गेला. दात घासून, तोंड धुवून आजीजवळ येऊन बसला. आजी गुडघ्यावर हनुवटी टेकवून काही विचार करीत बसली होती. अप्पुण्णीसुद्धा मान खाली घालून गुपचूप बसला.

कांजी तयार झाली म्हणून आजीला निरोप आला. आजीने त्याच्यासाठीसुद्धा कांजी द्यायला सांगितले. स्वयंपाकघरातून वडबड ऐकू आली.

कांजी आणि पानावर भाजलेला पापड आणि चटणी आणून ठेवली आहे. अप्पुण्णीच्या तोंडाला पाणी सुटले.

आजी तीन-चार चमचे कांजी प्याली असेल.

तेवढ्यात बायका स्वयंपाकघराकडे धावताना आणि मुले तिथून निघून जाताना दिसली. ढगासारखा गडगडाट झाला, " ताई ! "

आजीनं चमचा खाली ठेवला आणि म्हणाली, " नारायण, नारायण... सबंध दार अडवून कोण उभं आहे ते. "

थोरले मामा !

" ताई, कोण आहे हा पोरगा ? "

आजी हालली नाही.

" तुलाच विचारतोय. कोण आहे हा पोरगा ?"

" हा... पारुक्कुट्टीचा...मुलगा. "

वाटले, आता आजीला रडू कोसळणार. पण तिने शांत स्वरात सांगितले, " मी तिलाही जन्म दिलाय. "

मामा थुंकले आणि म्हणाले, " माझं हे घर वाटेल त्या फालतू इसमानं येऊन बसण्यासाठी नाही. काय ग, या पोरासाठी कुणी कांजी केली ? "

आजी उठून उभी राहिली. तोही थरथरत उभा राहिला. वाटले ' आता आपल्याला मारून टाकणार...आता मी मरणार ... मजबूत बोटे माझ्या मानेवर रुतली आहेत आणि मी तडफडतोय...' समोरच्या दरवाजाकडे बोट दाखवून थोरले मामा गरजले ;

" चल नीघ इथून. या दारात पुन्हा पाऊल टाकलंस, तर पाय तोडून टाकीन..."

आणि त्याला जोरात ढकलून दिले.

तो चालत नव्हता, पळत होता.

अचानक धावावे लागल्यामुळे खड्डे असलेल्या अंगणात तो गुडघ्यावर पडला. त्याच वेळी आजीचे शब्द ऐकू आले, " फळं भोगाल... याची फळं भोगाल..."

जणू कोणी मागे लागले आहे असा तो धूम पळत सुटला.

घराकडचा रस्ता थोडाबहुत माहीत आहे. गल्ली पार करून टेकडीच्या पायथ्याशी पोचला तरी त्याचे हुंदके थांबले नव्हते.

हुंदक्यांचे रूपांतर स्फुंदण्यात झाले. शर्टाच्या टोकाने त्याने डोळे पुसले. रताळ्याचे शेत ओलांडून टेकडीवर पोचला. कोवळे ऊन आहे. झाडीत एका दगडावर बसला.

त्याला मारून पिटाळले होते,... पिसाळलेल्या कुत्र्याला पिटाळावे तसे.

आतापर्यंत रोखून ठेवलेले अश्रू आता वाहू लागले. ' आईनं आधीच जायचं नाही म्हणून सांगितलं होतं. आता आईला कळलं की ... '

स्वप्नातसुद्धा अशी कल्पना केली नव्हती.

पिटाळणे. पिसाळलेल्या कुत्र्यासारखे पिटाळणे.

त्या सगळ्या बायकांनी पाहिले, मुलेपण बघत होती, मानगूट पकडून बाहेर काढले. अपमान ... पैसेवाले नसतील कदाचित, पण त्याचे वडील एक वीर पुरुष होते. त्यांच्याशी सामना करण्याची कोणाची हिंमत नव्हती. त्या वीर कोंतुण्णी नायरचा तो मुलगा होता. तरीही पिटाळल्यावर कुत्र्यासारखा पळत सुटला होता.

पळण्याशिवाय दुसरा उपायच नव्हता. त्याला सबंध दार अडवून उभ्या राहिलेल्या त्या माणसाची आठवण आली. त्याला वाटले ' एखाद्या गुहेत लपून बसावं म्हणजे

कुणी आपल्याला पाहणार नाही किंवा गाडीत बसून दूर कुठंतरी पळून जावं.' त्याला सर्वांचाच तिरस्कार वाटायला लागला.

पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणे !

'मेलो म्हणजे बेअब्रू होणार नाही. कुणी थुंकणार नाही, शिव्या देणार नाही आभाळाच्या पलीकडं स्वर्गात देवाकडं जाऊ ... स्वर्गात जुने नालुक्केट्टू असणार नाही किंवा थोरले मामाही असणार नाहीत.'

तेवढ्यात मागून आवाज आला. चमकून पाहिले. हे देवा ! सगळे अवयव शिथिल पडले. कोण उभं आहे मागं ! लाल लाल डोळे आणि विस्कटलेले केस ...'

सैतालिकुट्टी.

त्याच्या वडिलांना मांसात विष कालवून यानंच मारलंय !

आतासुद्धा विषाच्याच शोधात आहे की काय !

'मला कसं मारील कुणास ठाऊक ? '

त्याच्या जाडजाड बोटांकडे त्याने घृणेने आणि भिऊन पाहिले.

"का रडतोयस ? "

"इथं का बसलायस ? "

अप्पुण्णीने उत्तर दिले नाही.

" रडू नकोस बाळ. "

हे शब्द, हा आवाज मारणाऱ्याचा नाही. डबडबलेले डोळे वर करून त्याने त्याच्याकडे पाहिले. ते डोळे भयानक नव्हते. आईच्या चेहऱ्यावर आढळतो तसा विषाद त्याच्या लाल डोळ्यांत दिसत होता.

" घरी जातोयस ? "

त्याने मान डोलवली.

" चल. मीसुद्धा त्याच वाटेनं जातोय. "

तो पुढे आणि अप्पुण्णी मागे-मागे चालला. टेकडी उतरता उतरता त्याचे हुंदके थांबले.

" आज सकाळीच टेकडीवर काय करीत होतास ? "

" काही नाही. असंच. "

" आलास कुठून ? "

" तिथून ... वटक्केप्पाट्टहून. "

" रडत कशाला होतास ? "

त्याने उत्तर दिले नाही.

" वाट माहीत नव्हती का ? "

" नाही, नाही. "

" मग का रडत होतास ?"

" तिथं... तिथं... थोरले मामा... "

पुढें बोलता येईना.

सैतालिकुट्टीनेही पुढे काही विचारले नाही. थोडे अंतर दोघेही गुपचूप चालले. मग सैतालिकुट्टी म्हणाला,

" तिथं तुझासुद्धा अधिकार आहे. "

सैतालिकुट्टी त्याच्या खांद्यावर हात ठेवून चालला होता. दगडाच्या खाणीजवळच्या ढिगाशी आल्यावर तो अस्वस्थ झाला. वाटेत तीनचार दुकानेही होती.

" चहा पिणार का ?"

" नको. "

त्याचे घर जवळ आले तेव्हा सैतालिकुट्टी थांबला आणि म्हणाला, "आता जा तू. "

तो झरकन दार ओलांडून आत गेला.

आपल्या डोक्यावरून हात फिरवीत अल्लाच्या नावाने काहीतरी पुटपुटत सैतालिकुट्टी पुढे निघाला.

दोन दिवस इल्लममध्ये कामाला जायचे नाही. सगळेजण कुठल्या तरी लग्नासाठी कुठं दूर गेले आहेत. मालकिणीबरोबर इक्कावम्मा गेली आहे. इल्लममध्ये फक्त आया आहे.

पारुक्कुट्टी त्या दिवशी उशिरा उठली. शंकरन नायरला काही सांगायचे होते. उठताच प्रथम त्याची आठवण आली. तो कुठे भेटेल ? या गल्लीतून गेला असता तर सहजपणे काम झाले असते, नाहीतर अप्पुण्णीला त्याच्याकडे धाडून त्याला बोलवायला लागणार होते. त्याला त्याचे घरही ठाऊक नाही, विचारीत विचारीत शोधावे लागणार. इल्लमचे काम आटोपून स्नानाला जाताना वाटेवर त्याचे घर लागते. आज घरी असेल का ? तो उगीच इकडेतिकडे भटकत नाही असे ऐकले आहे. म्हणजे तो घरीच असणार.

पहिल्याच दिवशी सांगता आले असते. पण उद्या सांगू, असा विचार केला. दुसऱ्या दिवशी काम नसेल याची कल्पना नव्हती. खरे म्हणजे तिला शंकरन नायरपुढे मान

वर करून पाहणे जमत नव्हते. यापूर्वी तिने त्याला पाहिले होते तेव्हा ती वटक्केप्पाट्ट घराण्याची मुलगी होती.

अगदी प्रथम जेव्हा इल्लममध्ये काम करायला गेली, त्या दिवसाची आठवण आली की अजून तिला वाईट वाटते. धान्य कांडताना, व्हरांड्यात बसून उष्ट्या पत्रावळीतला भात खाताना, छोट्या मालकिणीने हाक मारली म्हणजे आणि बाहेर मजुरांवर देखरेख ठेवताना तिला असह्य क्लेश व्हायचे. असे वाटायचे, अंगावरची वस्त्रे निघून जाताहेत. काय अनुभव होता तो !

एके दिवशी जेवण आटोपून उखळ असलेल्या खोलीत बसली होती. तेवढ्यात छोट्या मालकिणीने हाक मारली – –

" पारो ! इकडे ये. हे धान्य मापून घे पाहू. "

घरासमोर अंगणात कुळाने शेतसाऱ्याचे दोन गाड्या भरून धान्य आणले होते. सारा देऊन पावती घ्यायला आला होता. मोठे माप ठेवले होते. इल्लममध्ये दोन मापे आहेत. सारा घेण्यासाठी मोठे माप आणि धान्य उधार देण्यासाठी छोटे.

दरवाजावर फक्त टॉवेल गुंडाळून बसलेल्या थोरल्या नम्पूदिरीने फर्मावले, " धान्य मापून घे ग. " जवळ उभा असला तरी तो अशा आवाजात बोलतो की आख्ख्या गावाला ऐकू जावे.

मोठ्या सुपात धान्य घेऊन ती ते मापात टाकणार, तेवढ्यात तिचा चेहरा फिका पडला. माप हातात घेऊन वाकली आणि तो माणूस दिसला – – शंकरन नायर, जो नालुकेट्टूमध्ये बागेला पाणी घालणे, जनावरांना चारा घालणे, वगैरे कामे करायचा. ती जमिनीला खिळल्यासारखी झाली. मग स्वतःला मावरले आणि धान्य मापात टाकले.

नंतर कळले की गेल्या तीन दिवसांपासून तो इल्लममश्ये कामाला येत होता. त्या दिवशी घरी परतताना शंकरन नायर वाटेत भेटला. डोळे भरून आले. तो घोगऱ्या आवाजात म्हणाला, " सगळा ईश्वरी खेळ आहे. "

कुटुंबातून निघाल्यानंतरसुद्धा तिने त्याला पाहिले होते, पण तेव्हा ती ताठ मानेने चालू शकत होती. अप्पुण्णीचे वडील तेव्हा हयात होते. शंकरन नायर कधीमधी त्यांच्या घरी यायचा. तो अप्पुण्णीच्या वडिलांबरोबर मासे पकडायला जायचा. त्या कामात तो पटाईत होता. ज्येष्ठात पाऊस सुरू झाला की नदीत माशांच्या झुंडीच्या झुंडी यायच्या. डोक्यावर टोपी आणि खांद्यावर जाळे टाकून तो अप्पुण्णीच्या वडिलांना बोलवायला यायचा. कोंतुण्णी नायरलाही माशांची फार आवड होती. त्याच्या-

कडे एक छोटे जाळे होते, पण नदीतले मासे पकडायला त्याचा उपयोग नव्हता.

एका उच्च घराण्यातली मुलगी आणि एक गृहिणी म्हणून तिला शंकरन नायरने पाहिले होते. त्याच शंकरन नायरच्या समोर धान्य कांडावे लागले.

सारा नशिबाचा खेळ आहे.

अप्पुण्णी प्रमाणपत्र घ्यायला शाळेत गेला आहे.

विहिरीजवळ अप्पुण्णीने भोपळ्याचे जे वाफे केले आहेत त्यांना तिने पाणी दिले. काठी खुपसून कारल्याच्या रोपट्यांना सरळ केले. केळीखाली केस विंचरीत थोडा वेळ उभी राहिली. अप्पुण्णीच्या हातून पडलेल्या आरशाचे तुकडे तिथे विखुरले, होते. तो सांभाळून चालत नाही, एकदम बागेकडे धावताना पायात लागतील, असा विचार करून तिने ते तुकडे एका बाजूला गोळा केले.

एक मोठा तुकडा हातात घेतला आणि त्यात आपला चेहरा पाहिला. कपाळावर आलेल्या कुरळ्या बटा मागे सारल्या. चेहरा सुकला आहे. तिच्या रूपाचे वर्णन करताना आजी म्हणायची, 'जसा काही दिवा उजळलाय.' त्या वेळी ती पंधरा वर्षांची होती. त्याला आता पंधरा वर्षे होऊन गेली.

तेल लावून स्नान करण्याची संधी कधीतरी मिळते. सगळे केस कोरडे रूक्ष झाले आहेत. लहानपणी दोन्ही आज्या तक्रार करायच्या, "पोरीचे केस एवढे आहेत, की संभाळणं कठीण आहे." मोकळे सोडले तर आजसुद्धा पाठ झाकली जाते.

काचेचा तुकडा लांब टाकून परत येत होती. तेवढ्यात शंकरन नायर दुरून येताना दिसला. वाटले, 'बरं झालं, तो इथूनच चाललाय.'

बांधाशी आला, तेव्हा तिने त्याला हाक मारली.

त्याने पारुक्कुट्टीकडे पाहत विचारले, "मला बोलावलं?"

"घाईत नसलात तर जरा इकडं या. काही सांगायचंय?"

तो फाटक ओलांडून आत आला. व्हरांड्यात चटई अंथरून ती दारात उभी राहिली. शंकरन नायर बावळटपणे खाली नजर करून बसून राहिला.

"कोंतुण्णी नायरच्या मृत्यूनंतर प्रथमच मी इथं येतोय." डोके वर न करता तो म्हणाला.

पारुक्कुट्टीचा चेहरा म्लान झाला. दुःखी स्वरात ती म्हणाली, "त्यानतर कुणीच इकडं फिरकलं नाही."

स्तब्धता पसरली.

चारी दिशांना एकवार बघून तो म्हणाला, "सगळं नाहीसं झालेलं दिसतंय."

" कुंपण वगैरे काही नाही. शेजारपाजारच्यांच्या गायी घसल्या आन सगळं खाऊन टाकलं."

त्या मोकळ्या जागेत अप्पुण्णीच्या वडिलांनी केळी लावल्या होत्या. त्यांच्या मृत्यूनंतर कोणीही काहीही केले नाही. माती इकडची तिकडे केली नाही की रोपे वेगळी केली नाहीत. अर्ध्या केळी सुकून गेल्या. उरलेल्यांचा गायींनी फडशा पाडला.

" कुंपण घालायला हवं. दोन घड पदरात पडले तर ते विकून काही खरेदी करता येईल."

पारुक्कुट्टी काही बोलली नाही.

" अप्पुण्णी कुठंय ?"

" शाळेत गेलाय."

" शाळा उघडली ?"

" आज उघडणार आहे. आठवी पास झालाय. प्रमाणपत्र घ्यायला गेलाय. त्याच्याविषयी काही सांगायचं होतं."

" काय झालं त्याला ?"

" तृताला शाळेत जायचंय त्याला."

" ठीक आहे. शिकून सवरून पास झाला की मार्गाला लागेल."

पारुकुक्टीने नखाने दारावर खरडले. विषादाने म्हटले, " माझ्या आवाक्याबाहेरचं आहे. तरी त्याची इच्छा आहे तर..."

" ठीक आहे. शिकू द्या. देव मार्ग दाखवीलच."

" फी हवीय. दर महिन्याला चार रुपये तेरा आणे. दाखल करताना आणखी जास्त हवेत. अमीना बीबीच्या लॉटरीचे आठ रुपये ठेवलेत."

पारुक्कुट्टी अम्माने उधार पैसे मागण्यासाठी बोलावले असावे असे त्याला वाटले. 'हातात तर काही नाही. मागितले तर काय द्यायचं ? अंतुण्णीकडचे पैसे मिळाले तर बरं होईल.'

" उद्या त्याचं नाव दाखल करायला जायचंय. त्याच्या सोबत जायला कुणी नाही."

" मी जाईन पारुक्कुट्टी अम्मा. काळजी करू नका."

टॉवेलाने तोंड पुशीत तो म्हणाला, " पैशाचीच कमतरता आहे. बाकी दुसरं काही काम सांगितलंत तर करायला तयार आहे."

कोरडे रूक्ष केस आणि विषादपूर्ण डोळे असलेल्या त्या स्त्रीला खाली मान घालून

उभे राहिलेली पाहून शंकरन नायरला एक जुनी तसबीर आठवली. स्मशानात उभ्या असलेल्या पार्वतीची.

दोघे गप्प होते. ती गत काळाची आठवण करीत होती आणि तो मनातल्या मनात पूर्वी घडलेल्या घटनांची जुळवणी करीत होता.

काहीतरी आठवून ती एकदम म्हणाली, " अप्पुण्णी गेला होता."

" मला माहीत आहे."

" जायला नको होतं."

" गेला त्यात काही बिघडलं नाही. तो लहान आहे म्हणून पिटाळल्याबरोबर पळून गेला." त्याचे काळीज क्रोधाने जळत होते. " तिथं इतरांप्रमाणं त्याचाही अधिकार आहे. त्यांचा एक..."

" देव पाहतोय, फळं भोगावं लागतील याची."

तो उभा राहिला. पायऱ्या उतरून काही क्षण विचार करीत थांबला.

" मी सकाळी येईन. अप्पुण्णीला तयार ठेवा."

" बरं."

तो निघाला. मग डोक्यावर हात फिरवीत पुरुषी स्वरात म्हणाला, " कधी काही लागलं सवरलं तर मला सांगायला संकोच वाटू देऊ नका."

टॉवेल झटकून खांद्यावर टाकला आणि शंकरन नायर भराभरा चालू लागला.

अंतुण्णी कोळ्याकडून दोन रुपये येणे आहे. उधार घेतले होते. मागून मागून कंटाळा आला. काल गल्लीत भेटला होता. गेले काही दिवस तो रस्त्यात भेटणे टाळतोय. आज द्यायचे कबूल केले होते. शंकरन नायर त्याच्या शोधात निघाला होता.

पारुक्कुट्टी अम्माच्या घरून निघताना शंकरन नायर अंतुण्णीकडच्या पैशाचे विसरून गेला. वाटेत तो त्या असहाय्य स्त्रीचा विचार करू लागला.

तिने चांगले दिवस पाहिलेत...त्याचबरोबर त्याच्या मनात आले की, माणसावर असाही प्रसंग येतो.

तो पुढे चालत होता..." तिला काही झालं तर त्या पोराचं काय ? चार दिवस आजारी पडली तर चूल पेटवायलाही कुणी नाही. अन्नधान्य जिथं मुबलक आहे अशा कुटुंबातली ही मुलगी. कधीकधी त्याला आठवते, रात्री मायलेक एकटे आहेत. पडक्या घरात एक युवती एकटी... "

तरी त्याला घराण्याचा अभिमान आहे. भीक मागतानासुद्धा तो जात नाही. हे त्याच्या चेहऱ्यावर लिहिलेले आहे असे वाटते.

इल्लमच्या नोकरीविषयी शंकरन नायरला माहीत आहे. "पाजी ! वयाची चाळीस वर्षे उलटून गेली तरी ती मुरडत चालते."

'शंकरन नायर' म्हणून तिनं हाक मारली की तिला लाथ हाणावी असे वाटते. "अशी वागते की जणू सोळावं वरीस लागलंय. नेहमी अंगणात केर काढीत किंवा काहीतरी गोळा करीत उभी असते. दुष्ट धाकटे सरकारसुद्धा तिथं बसून डोळे फाडफाडून तिच्याकडे पाहत असतात."

'दुष्ट ! ब्राह्मण आहे न ! थोडातरी सारासार विचार असायला पाहिजे. सकाळीच पानाचा डबा उघडून दात काढून व्हरांड्यात बसून राहतो. नजर नेहमी अंगणात काम करणाऱ्या बायकांकडे; वाईट चालीचा आहे.'

प्रथम कोणी सांगितले की, पारुक्कुट्टी अम्मा इल्लममध्ये काम करायला जाते ? पाच-सहा वर्षांपूर्वीची गोष्ट होती. त्या वेळी त्या स्त्रीचा तिरस्कार वाटला. वंशाचा अपमान केला, आता त्या नंपूदिरींची बदनामी करील; पण इल्लमची देखरेख करण्यासाठी त्याला नेमले तेव्हा त्याने पाहिले की परिस्थिती अगदी विपरीत आहे. ती सकाळी येते. मालकिणीने सांगितलेली कामे करते आणि निघून जाते. पारुक्कुट्टी अम्माला नकळत तो तिचे काम पाहत होता. अगदी सरळ समोर कधीच येत नाही. कुणी अंगणात बसले असेल तर तिकडे जात नाही. पुरुषांच्या समोर उभे राहून बोलतसुद्धा नाही. तिची अशी अवस्था व्हायला नको होती.

भाग्यात नाही. नशीबच फुटलंय.

"माझं कुणी नाही.."

आई, मोठ्या बहिणी, मामा सगळे आहेत. वटक्केप्पाट्ट इथून फक्त दोन मलावर आहे. पण त्या दोन मैलांनी त्यांच्यांत केवढा दुरावा निर्माण केलाय. तिने आपल्या घराण्याला बदनाम केले.

अप्पुणीला बदनाम करून हाकलले... त्याची काय चूक होती ? उच्च घराणेवाले ! नुसता घराण्याचा गर्व असून भागत नाही, थोडीफार माणुसकीसुद्धा असायला हवी– आले मोठे उच्च घराणेवाले !

शंकरन नायर रागाच्या भरात जोरात थुंकला.

रस्त्यात उण्णीरी भेटली. शंकरन नायरला काहीतरी आठवले.

"तुझ्याकडे बांबू आहेत का उण्णीरी ?"

"माझ्याकडचे बांबू चोरीला गेले. त्यांतूनही कदाचित थोडेफार उरले असतील. हवे असले तर घेऊन जा."

" मला चार पाच मोळ्या हव्यात. उद्या मी इल्लममध्ये काम करणाऱ्या चाप्पनला पाठवीन."

" तुमचं कुंपण तर तयार झालं ना ?"

" हो माझं कुंपण तर झालं. दुसऱ्या कामासाठी हवे होते."

" उद्या संध्याकाळी चाप्पन येईल. "

चला तर, हे एक नक्की ठरले. उण्णीरीला बांबूचे पैसे द्यावे लागणार नाहीत. एका दिवसात कुंपण तयार होईल. दोन रुपये मजुरी द्यावी लागेल. आता अत्तुण्णीच्या पैशांची आठवण झाली.

यूसुफच्या दुकानात गला. तिथे सदरे विकणाऱ्या शिंप्याशी दोन माणसे सदऱ्याच्या किमतीवरून हुज्जत घालात होती.

" अत्तुण्णीला पाहिलं का ?"

" सकाळी इकडून जाताना पाहिलं होतं. "

मुसलियार म्हणाला, " ऐबुद्दीनच्या दुकानात असेल. चोर आहे. चार आण्यांचा माल उधार घेतलाय. मी ते पैसे मागेन म्हणून तो पाजी या दुकानात येतच नाही."

ऐबुद्दीनच्या दुकानात अत्तुण्णी नव्हता. जाऊ दे, बदमाश आहे ! असा विचार करीत शंकरन नायर भाजीच्या मळ्याकडे वळला. नदीच्या काठची काही जमीन लिलावात विकत घेतली होती. भोपळा, कोहळा वगैरे लावले होते. दोन वेळा फळे आली. पाऊस येऊन गेल्यानंतर पाणी दिले नव्हते. आता पाणी दिले.

पाणी दिल्यानंतर नदीत उतरून आंघोळ केली. तेवढ्यात बाप्पूच्या दुकानातून आवाज आला, " मासळी आली आहे. " शंकरन नायरने दोन आण्यांची मासळी घेतली.

घराकडे वळणार एवढ्यात गल्लीच्या दुसऱ्या टोकावरून अच्चूमामाने बोलावले. गेला नाही तर म्हातारा रागावणार, गेला तर अडकणार.

तो आळ्या गावाचा अच्चूमामा आहे. जवळच घर आहे. पण सडकेजवळील दुकानाच्या वरच्या खोलीत राहतो. रामायणाचे पठन, लग्ने जुळवणे आणि कोणी भेटले, तर वेदांताची चर्चा करणे एवढेच म्हातारपणचे उद्योग आहेत.

शंकरन नायर घरी पोचला तेव्हा तिन्हीसांजा होऊन गेल्या होत्या. टेकडीच्या मागे असल्याने उन्हे ढळल्याबरोबर नारळीच्या झाडांमध्ये काळोख पसरतो. कुंकुमाच्या चबुतऱ्यावर दिवा उजळून ठेवला आणि तो जेवणाच्या तयारीला लागला. त्याला स्वयंपाक येतो. वर्षानुवर्षे एकटा राहतो. पण अजून भाताचे पाणी काढताना

घाबरतो. म्हणून बहुतेक वेळा पाणी काढीतच नाही. भात शिजला की त्यात नारळ खवून घालतो.

गेली चौदा-पंधरा वर्षे तो एकटाच राहतोय. पूर्वी मामा आणि मोठी बहीण होती. दोघेही कॉलऱ्याला बळी पडले. तो चुलीतला अग्नी पाहत बसला. पाणी उकळू लागले.

इल्लमच्या कामावर भागते. लोक विचारतात, " इतका कशाला, कुणासाठी खपतो ? भाजी आ केळीची लागवड करून पैसे कमावून काय करणार ?" लोक नेहमी विचारतात, " लग्न का करीत नाहीस ? "

मग तो म्हणतो, " बेचाळीस वर्षांचा झालो आता. आता बायको-पोरांशिवाय चालू शकते. "

पण आजारी पडला तर शुश्रूषा करायलाही कुणी नाही. काम होईनासे झाले की काय स्थिती होईल ? मग झोपडीतल्या म्हातारीची आठवण येते. लोकांच्या घरोघर जाऊन उंबरठे झिजवण्याची कल्पनाही त्याला सहन होत नाही. पण ज . ा त तो हिंडूफिरू शकतो तोपर्यंत...मग रात्रीत पडलेल्या कुत्र्यासारखे.

कल्पनाही करवत नाही.

एके काळी लग्नाचा विचार केला होता. एका मुलीचे रूप मनात भरले होते. त्या वेळी आई आणि बहीण हयात होती. मामानेच हे स्थळ सुचवले होते. त्याने संमतीही दिली होती.

पण देवाची इच्छा, ते लग्न झाले नाही.

देवाची काय चूक, दैवच चांगले नव्हते.

मुलगी सुंदर व भरल्या अंगाची होती. संध्याकाळी पाहून आला होता. सकाळी कळले की ती वारली. चार उलट्या झाल्या तिला. कॉलऱ्याला तिचा पहिला बळी पडला.

नात्यागोत्याच्या कितीकांचा मृत्यू झाला. कुटुंबात एकटा उरला. काम करतो आणि दिवस घालवतो. एकमुरी आयुष्य चालले आहे. हळुहळू तो दुःख विसरला. भांड्याच्या चारी बाजूंनी उठलेल्या ज्वाळा पाहत बसून राहिला. भाताचे पाणी उकळून बाहेर पडू लागले, तेव्हा तो भानावर आला.

जेवण झाल्यावर बाहेरच्या व्हरांड्यात चटई अंथरून बसला. मग सकाळच्या कामाची आठवण आली. शाळेपर्यंत जायचे आहे अप्पुण्णीचे नाव दाखल करायचे आहे. वेळच्या वेळी लग्न केले असते, तर अप्पूण्णीएवढा मुलगा त्याला असता. शेतात किंवा भाजीच्या मळ्यात काम करायला तो तयार झाला नसता. तोही

शिकून मोठा झाला असता...झाले गेले त्याचा आता पश्चात्ताप करण्यात काय हंशील?

अप्पुण्णी मोठा होईल...शिकून चांगला निघेल. त्याच्या चेहऱ्यावर ऐश्वर्य आणि श्रीची चिन्हे आहेत.

" देवी भगवती त्याचे रक्षण करो. "

डोळे उघडे ठेवून मनातली अव्यक्त चित्रे तो पाहत राहिला.

अप्पुण्णी ज्या दिवशी शाळेत दाखल व्हायला निघाला, तो दिवस त्याला जणू सणासारखी होता. शंकरन नायर ठरलेल्या वेळेपूर्वीच आला. आईने फीचे पैसे दिले. तो जायला निघाला तेव्हा तो गल्लीतून दिसेनासा होईपर्यंत ती त्याला डबडबलेल्या डोळ्यांनी पाहत होती. शाळा फक्त पाच मैलांवर आहे पण तरी तो जाताना आईला केवढे वाईट वाटते आहे!

वटक्केप्पाट्टच्या फाटकावरून जायचे आहे. त्या फाटकासमोरच्या सडकेवर आल्यावर फाटकाकडे पाहावेसे वाटले, पण पाहिले नाही.

शाळा मोठी आहे. पूर्वी ज्या शाळेत शिकत होता त्या शाळेच्या कचेरीलाच फक्त कौलारू छप्पर होते. इथे तर चार कौलारू इमारती आहेत. फाटकावर लावलेल्या एका भल्या मोठ्या पाटीवर चकाकणाऱ्या अक्षरात शाळेचे नाव लिहिले आहे.

समोर फुलबाग आहे. पूर्वीच्या शाळेतही बाग होती, पण तिथे फुलझाडे नव्हती. भेंडी, वांगी वगैरे भाज्या लावल्या होत्या. विद्यार्थ्यांना त्या झाडांना पाणी घालायला लागायचे. भाज्या लागल्या की शिक्षक त्या तोडून घरी नेत. बागेत काम करण्याचा एक वेगळा तासच होता.

अजून घंटा झालेली नाही. रस्त्यावर, फाटकात आणि व्हरांड्यात सगळीकडे मुलांची गर्दी झाली आहे. त्यांत नाव दाखल करायला आलेली मुलेही आहेत. ती ओळखणे सोपे आहे. त्याच्यासारखीच ती मुले बावरलेली आहेत. त्यांच्याबरोबर बहुधा त्यांचे पालक आहेत.

त्याच्या पूर्वीच्या शाळेतली काही मुलेही त्याला दिसली. इतर नवी मुले आणि त्यांचे पालक यांच्याबरोबर तोसुद्धा कचेरीच्या बाहेर वाट पाहत राहिला. खिडकीतल्या कारकुनाकडे आधीच नाव नोंदविले आहे. पाळीपाळीने बोलावताहेत.

मुख्याध्यापकांच्या दालनात पाऊल टाकताच तो आश्चर्यचकित झाला. भले मोठे मेज. त्यावर निळा टेबलक्लॉथ. काचेची कपाटे. भिंतीवर तसबिरी, टेबलावर दाबताच वाजणारी घंटी, कागदांवर ठेवलेले काचेचे वजनदार गोळे, मेजामागे

मोठ्या खुर्चीत जाडजूड गर्दन असलेली एक व्यक्ती बसली आहे – मुख्याध्यापक. अप्पुण्णीचे प्रमाणपत्र तपासले गेले.

नाव, वय, परीक्षेतले गुण वगैरे सगळे त्यात आहे.

मुख्याध्यापकांनी विचारले, " वडिलांचे नाव ?"

" टि. कोंतुण्णी नायर." आणि काही गैरसमज नको म्हणून तावडतोब सांगितले, " वडील ह्यात नाहीत."

" पालकांचे नाव ?"

मुख्याध्यापकांनी शंकरन नायरकडे पाहिले.

शंकरन नायर विचार करू लागला, अप्पुण्णीचा पालक कोण ? स्त्री पालक होऊ शकते ? पुरुषच पालक असायला हवा. नतर कटकटी नकोत म्हणून त्याने सांगून टाकले, " शंकरन नायर " आणि पत्ताही दिला.

अप्पुण्णीने त्याच्याकडे पाहिले. त्याने तोंड वळवले. खिडकीजवळ जाऊन कार कुनाला फी दिली, पावती घेतली. अभ्यास उद्यापासून सुरू होणार हाता हे गन दोघेही घराकडे निघाले.

दोघे न बोलता परतले. पण अप्पुणीच्या मनात एक शंका आहे... शंकरन नायर माझा पालक कसा होऊ शकतो ?

नव्या शाळेत नवे सोबती मिळाले, मौज येऊ लागली.

रोज सकाळ-संध्याकाळ वटक्केप्पाट्टच्या समोरून जावे लागते. मोठा रस्ता आला की एकदा तिकडे पाहतो. शेताच्या कडेला सुपारीच्या झाडांची घनदाट बाग आहे. त्या झाडांमधून घर नीट दिसत नाही. फाटकात कुणी नसते. संध्याकाळी परतताना टक्कल असलेले डोके वर करून, खडावा घालून फिरत असलेले थोरले मामा दिसतात. आकाश जणू त्यांच्याच मस्तकावर टेकले आहे. नकळत अप्पुण्णीची गती वाढते. मामा त्याच्याकडे पाहतसुद्धा नाहीत, कितीतरी पोरे जातात तिथून.

शेतात धान्याची कापणी होऊन गेली आहे. वटक्केप्पाट्टच्या जमिनीजवळून एक रस्ता आहे. त्या रस्त्याने गेले तर सडक लवकर लागते, पण तो त्या रस्त्याने जात नाही.

वटक्केप्पाट्टहून दोन मुले त्याच्या शाळेत येतात. भास्कर ' ब ' तुकडीत आहे आणि कृष्णन कुट्टी सहावीत. शारीरिक शिक्षणाचा तास ' अ ' आणि ' ब ' दोन्ही तुकड्यांचा एकत्र घेतला जातो. त्याच तासाला त्याने प्रथम भास्करला पाहिले.

कुट्टिशंकरने सांगितले होते, भास्करशी बोलायला हवे. पण कवायतीसाठी एकमेकां-जवळ उभे असताना किंवा पाण्याच्या टाकीजवळ उभे असताना भास्कर त्याच्याशी काही बोलला नाही. भास्कर त्याला ओळखतो. भास्करनेच कुट्टिशंकरला सांगितले. भास्करची आठवीत दुसरी वारी आहे.

भास्कर आणि कृष्णन कुट्टी बैलगाडीतून शाळेला येतात. शिंगांना रंग, शिंगांच्या टोकांना निळ्या धाग्याचा गोंडा, गळ्यात घुंगरू, अशा तऱ्हेने सजलेला एक पांढरा बैल गाडीला जुंपलेला असतो. आत बसायला चटई अंथरलेली असते. दुरूनच त्या बैलगाडीचा आवाज ऐकू येतो.

गाडी कुणा मुसलमानाची आहे. महिन्याच्या हिशेबाने भाड्याने ठरवता येते. ते दोघे अशा बैलगाडीतून येतात याचा अप्पुण्णीला हेवा वाटतो.

थोड्या दिवसांनी कळले की वर्गातली बहुतेक मुले त्यांचा हेवा करतात. पायी न येणारी सबंध शाळेत फक्त तीच दोन मुले आहेत.

भास्कर अंगाने जाडजूड आहे. त्याच्या बोलण्याचालण्यात ' मी कुणीतरी मोठा आहे ' हा भाव आपोआप प्रकट होतो. चार वाजता शाळा सुटते तेव्हा फाटकाशी गाडी तयार असते. गाडीवान ठेंगणा, ठुसका आणि काळा आहे. त्याच्या डोक्याला नेहमी एक हिरवा रुमाल बांधलेला असतो. फाटक ओलांडताच भास्कर पुस्तके गाडीत फेकून देतो आणि कृष्णन कुट्टीला म्हणतो, " चल रे."

कृष्णन कुट्टी आत बसला की तो कडेला पाय बाहेर टाकून बसतो. त्याला ठाऊक आहे की सर्व मुले आपला हेवा करतात.

अप्पुण्णीचा दोस्त आहे मुहम्मद. त्याचे घर फारसे लांब नाही. तो रोज जवळच्या घाटेने येऊन यज्ञेश्वर मंदिरापाशी त्याची वाट पाहतो. मुहम्मद तर नेहमी त्या एक बैलवाल्या गाडीचे कौतुक करीत असतो. शिक्षण झाल्यावर पैसा कमावला की तो एक तशी गाडी विकत घेणार आहे.

मुहम्मदने कुणाला तरी सांगितले की गाडीतून येणारा भास्कर आणि अप्पुण्णी एकाच घरातले आहेत.

आता वर्गातल्या बहुतेक सगळ्या मुलांना ही गोष्ट कळली आहे. भास्करलाही कळले. तेव्हापासूनच कटकटीला सुरवात झाली.

भास्करचेसुद्धा एक मित्रमंडळ आहे, करुणाकर, रंगनाथ, वगैरे. कधीतरी आपल्याला गाडीत बसायला मिळेल याच आशेने त्यांनी त्याच्याशी दोस्ती केली होती.

करुणाकरने भास्करला ते सांगितले. भास्कर तिरस्काराने म्हणाला, " हुं:,

आमच्या घरातला म्हणे ! त्याला विचार, मागच्या वर्षी आमच्याकडं तो नागपूजेला आला तेव्हा काय झालं ते. "

काय झाले होते ते मुलांना जाणून घ्यायचे होते. पुन:पुन्हा विचारले तेव्हा अप्पुण्णीला रडू कोसळले. मग भास्करनेच मित्रांना सांगितले," तो आमच्या वाड्याच्या फाटकात पाऊल टाकू शकत नाही. मामांनी त्याला मारून पिटाळलं होतं. असा धूम पळत सुटला होता म्हणून सांग. "

अप्पुण्णीने ते मुकाट्याने ऐकून घेतलं. भास्कर नाही, भास्करदादा म्हटले पाहिजे. त्याला दादा म्हटले पाहिजे. पण या जन्मी मी त्याला दादा म्हणणार नाही !

भास्कर मोठ्या मावशीचा मुलगा आहे. अप्पुण्णीचे वडील नम्पूदिरी होते आणि तो इल्लममध्ये नोकरी करणाऱ्या बाईचा मुलगा आहे. मोठे घर नाही, धन नाही, कपड्यांचे फक्त दोन जोड आहेत. तेच आलटून पालटून घालतो. अभ्यासासाठी हवीत ती पुस्तकेही नाहीत. गणितासाठी जाडजूड वही नाही.

दुपारी भास्कर मारार[1]च्या हॉटेलात जेवतो. अप्पुण्णी सकाळी पेज पिऊन शाळेला जातो आणि संध्याकाळी घरी परतल्यावरच जेवतो.

तिसरी घंटा होईपर्यंत पोटात कावळे काव काव करू लागतात. त्याच वेळी माराच्या हॉटेलातून फोडणीचा सुवास येतो. एकच्या सुमाराला हॉटेलच्या मागच्या बाजूने पाणी प्यायला जातो. तेव्हा भटारखान्याच्या पलीकडे पानांच्या दोन रांगा मांडलेल्या दिसतात, त्या पाहत राहतो.

अमीना बीबीची लॉटरी मिळाली तेव्हा आई जेवणाचा डबा विकत घ्यायचा विचार करू लागली. पण डब्यापेक्षा एक लुंगी आणि सदऱ्याची जास्त गरज होती. आईलाही पटले. दोन सदऱ्यांपैकी एक धुवून धुवून फाटला होता.

एके दिवशी संध्याकाळी शाळेच्या पटांगणात 'ओट्टनतुल्ल '[2]चा कार्यक्रम होता. आदल्या दिवशीच सर्व मुलांना दोन-दोन आणे आणायला सांगितले होते. पण त्याच्याकडे पैसे नव्हते. आईने शेजारीपाजारी पैसे मिळतात का पाहिले, पण मिळाले नाहीत. अमीना बीबीकडे असते, तर मिळाले असते.

सकाळी पहिल्या तासाला मुख्याध्यापकांनी वर्गातल्या सर्वांकडून पैसे घेतले. वर्गात चार मुलांनी पैसे दिले नाहीत. त्यांत अप्पुण्णीही होता.

---

१. एक विशिष्ट जात.

२. केरळचा नृत्य प्रकार.

मास्तरांनी कर्कश स्वरात दुपारी पैसे आणायला बजावून सांगितले तेव्हा तो दप्तर घेऊन सरळ घरी निघाला. कुणीतरी विचारलेसुद्धा –

" कायरे, पुस्तकं घेऊन निघालास ? "

" हो. "

" का ? "

" बरं वाटत नाही. डोकं दुखतंय. "

मुहम्मदसुद्धा न सांगता निघून गेला.

दुपारी मास्तर पैसे मागतील तेव्हा उभे राहावे लागेल. वर्गातल्या सर्व मुलांच्या चेष्टेचा विषय व्हावे लागेल, हे त्याला असह्य वाटत होते.

कडक ऊन पडले होते. सडक तव्यासारखी तापली होती. शेताच्या कडेकडेला थोडी सावली होती. तो शेतात उतरून तिथून चालू लागला.

वटक्केप्पाट्टच्या कुंपणापाशी आल्यावर त्याला बागेत कुणीतरी असावे असे भासले. त्याने मान वर करून पाहिले नाही.

तेवढ्यात हाक ऐकू आली, " अप्पुणी दादा. "

तो एकदम थांबला. मालू होती. ती सुपारीच्या झाडाला लपेटलेल्या नागवेलीची पाने तोडीत होती.

" शाळा लवकर सुटली ? "

" हं. बोलायला आलीया. " राग आला. अप्पुणीने फक्त मान हलवली.

" विहिरीजवळून अप्पुण्णीदादाला पाहत असते. भास्करदादाने आत्याला सांगताना ऐकले, तेव्हा कळले. "

त्याने तरीही काही उत्तर दिले नाही.

" आजी रोज म्हणते, इथून जाताना अप्पुण्णीला पाहायचंय. "

" एकदा पाहून घेतलं न ? मारून पिटाळलं तेव्हा पाहत राहिलात ना ? "

पोरी, मला आता जास्त बोलायला लावू नकोस. "

" थोरली मामी आणि वडिलांमध्ये... "

ती एकदम गप्प झाली.

" कुणाशी बोलते आहेस मालू ? "

सुपारीच्या झाडांच्या मधून एक मुलगी येत होती. तो आश्चर्याने थबकून उभा राहिला : अम्मिणी ताई !

सापावर स्वार होणारी उघड्या छातीची राजकन्या...

त्याने आश्चर्याने पाहिले. ती विशिष्ट पद्धतीने धोतर नेसली आहे, कमरेवर उघडी आहे, केस मोकळे सोडले आहेत. फणा उभारून नाचणाऱ्या सापासारखे डोलणाऱ्या एका मुलीचे रूप एखाद्या जुन्या स्वप्नासारखे त्याच्या मनात प्रकटले. बारीक रेषांची लुंगी नेसली आहे, कपाळावर चंदनाचा टिळा, काजळ घातलेले अर्धवट मिटलेले डोळे,

" हा कोण ? अप्पुण्णी ? "

" वा, नाव ठाऊक आहे तर ! "

तिच्या आताच्या रूपाची त्याला कल्पनाही येऊ शकत नव्हती. सुंदर स्त्रीच्या चेहऱ्याचा चकचकित नाग ! हसताना आणि बोलतानाही तिचे डोळे अर्धवट मिटतात.

आपल्याकडे तो आश्चर्यचकित नजरेने बघतोय, हे पाहून अम्मिणीने विचारले, " असा डोळे मोठे करून काय बघतोयस ? ओळखलं नाहीस मला ? "

तेव्हा आठवले. ' ओळखतो, चांगलंच ओळखतो. मला कुत्र्यासारखं मारून पिटाळणाऱ्या थोरल्या मामाची मुलगी. त्याच्यापेक्षा तीन वर्षांनी मोठी असल्यामुळे अम्मिणीताई झाली आहे. '

एका मोठ्या दगडावर पाय ठेवून हसत अम्मिणीने म्हटले, " अप्पुण्णी ओळखत नसेल, पण मी ओळखते. "

हातातून सांडलेले सुपारीचे तुकडे गोळा करायला ती खाली वाकली. खाली बांधलेले तिचे केस खांद्यावरून खाली लोंबकळले.

" मालू मुलायम पान असलं तर दे. सुपारी घालून खाईन. "

" मी निघतो " असं म्हणून अप्पुण्णी निघाला.

अम्मिणी ताईने हाक मारली, " हे बघ, अप्पुण्णी."

त्याने वळून पाहिले नाही. घरी पोचला तेव्हा आई घरीच होती. त्याला वाटले होते, इल्लमला गेली असेल. आई एकटी नाहीय. शंकरन नायर बसला आहे. तो जोरात आवाज करीत पायऱ्या चढला. घरात आला तेव्हा आईने विचारले, " काय रे अप्पुण्णी ! इतक्या लवकर कसा आलास ? "

तो रागावला होता; पण खास कुणावरच त्याचा राग नव्हता. तो फक्त एवढेच म्हणाला, " ठाऊक नाही. "

" काय झालं रे ? "

" काही नाही. "

त्याने दप्तर एका कोपऱ्यात भिरकावले आणि थोडा आवाज चढवून विचारले, " पेज आहे ? "

त्याचा रुद्रावतार पाहून आई घाबरून गेली. यापूर्वी त्याने आईला असे रूक्ष उत्तर कधी दिले नव्हते. पारुक्कुट्टीने त्याला पेज करून दिली. पाटासाठी न थांबता तो तसाच बसला.

" कपडे मीळतील, ऊठ, पाटावर बैस. "

थोडी पेज प्याल्यानंतर विनाकारण आलेला राग थोडा शांत झाला. तो सावकाश म्हणाला, " पाट नको आई. "

आई बाहेरच्या खोलीत गेली.

ताबडतोब शंकरन नायरचा आवाज आला, " अप्पुण्णीला काय झालंय ? "

" कुणास ठाउक ! मीसुद्धा तोच विचार करतेय. खूप भूक लागली असेल कदाचित. "

" दुसरं काम मी बरोबर करीन. दंड भरावा लागणार नाही. "

दंड. फीच्या गोष्टी चालल्यात. फी भरण्याची वेळ आली. आई त्याविषयीच शंकरन नायरशी बोलत असावी.

" मोठी कृपा होईल शंकरन नायर. "

" मला शक्य असेल तेवढी मदत करायला मी नेहमी तयार आहे, पारुक्कुट्टी अम्मा ! "

शंकरन नायर गेला आणि आई आत आली. अप्पुण्णी हात धूत होता.

" काय रे अप्पुण्णी, आज लवकर कसा आलास ? "

" असंच. अग आई ! ज्याला वाटेल तो लवकर येऊ शकतो. "

तो घराच्या पुढच्या भागात गेला. वाटत होते, आईला विचारावे, ' इल्लमला कामाला का गेली नाहीस?' पण विचारले नाही, कारण त्याला इल्लम, तिथली ती धाकटी मालकीण, धाकटा नम्पूदिरी या सर्वांच्या आठवणी त्याला नको होत्या. तिथे उखळ असलेल्या खोलीत आईचे काम करणे त्याला विसरायचे होते. इल्लमच्या मोल-करणीचा मुलगा ! कल्पनाही करवत नाही. अप्पुण्णी कोंतुण्णी नायरचा मुलगा आहे. जादूगार धोब्याच्या घरासमोर देशभर आव्हान देऊन जिंकणारा पटाचा प्रसिद्ध खेळाडू कोंतुण्णी नायर. मारामारीच्या वेळी अनेक माणसांना एकट्याने तोंड देणारा कोंतुण्णी नायर.

म्हातारीच्या झोपडीचे दार उघडे आहे. तिला भेटून खूप दिवस झाले. म्हातारी

उबरठ्यावर बसून सुपात तांदूळ घेऊन निवडून खडे बाहेर टाकीत आहे.

" कोण आहे ? "

" मी, आजी. "

" बाळा, यातून जरा खडे काढून दे. म्हातारीला दिसत नाही. "

त्याने लादीवर तांदूळ ओतले आणि तो त्यातले खडे वेचून बाहेर टाकू लागला.

हल्ली म्हातारीच्या गप्पा ऐकायला फुरसत मिळत नाही. सकाळी लवकर निघावे लागते. संध्याकाळी परत येतायेताच काळोख होतो. शनिवारी, रविवारी सुट्टी असते पण त्या वेळी म्हातारी बहुधा घरात नसते.

" तुमच्याकडे कोण आलं होतं रे अप्पू ? "

" शंकरन नायर. "

" का ? "

" माहीत नाही, मी आत्ताच आलो. "

" शंकरन नायर चांगला माणूस आहे. " म्हातारी म्हणाली, " तरी पण..."

" तरी पण...काय आजी ? "

" काही नाही. "

खडे वेचून काढल्यावर तो जाऊ लागला तेव्हा म्हातारी म्हणाली, " लोकांना वावड्या उठवायला एवढंसंसुद्धा पुरेसं असतं. "

ते ऐकून अप्पुण्णीने एक खडा उचलला आत फेकला आणि कुंडंगलच्या कुंकुम-वृक्षाच्या दिशेने तो निघाला.

# तीन

वटक्केप्पाट्ट्च्या स्वयंपाकाच्या सगळचा कामाची जबाबदारी मीनाक्षीकडे आहे. मीनाक्षी आत्याला मदत करणं हे मालूचे काम आहे. आजीची दुसरी मुलगी म्हणजे मीनाक्षी आत्या.

ती मोठ्या आत्यासारखी नाही. मालूकडून जास्त काम करून घेत नाही. म्हणून मालूला तिच्याविषयी जास्त प्रेम वाटते. तिला मुले नाहीत, आणि होण्याचा संभवही नाही ! तिचा नवरा आहे अच्युतन नायर, मालूचे आतोबा.

मीनाक्षी नावाची एक व्यक्ती त्या घरात आहे, हेसुद्धा कित्येकांना ठाऊक नाही. पहाट फुटण्यापूर्वीच एकदा ती स्वयंपाकघरात शिरली की रात्री सगळ्यांची जेवणे झाली, झाडझूड करणाऱ्या निलीला पेज करून दिली आणि चुलीवर पोतेरे फिरवले की मगच आडवी होते. थोरले मामा संध्याकाळी फिरायला जातात. शेतावर किंवा लांबच्या बागेत फेरफटका मारून येतात. यांना ज्या दिवशी परतायला उशीर होईल त्या दिवशी मीनाक्षी आत्यालाही निजायला खूप उशीर होतो. डाळ, भात, भाजी वगैरे सगळे तयार करून ती स्वयंपाकघरातच पाट मांडून बसून राहते. कितीही उशीर झाला तरी थोरल्या मामांचे जेवण झाल्यानतरच मुलांना जेवायला मिळते. फिरून परत आल्यानंतर अंगाला तेल लावण्यात केवढा वेळ जातो. फक्त टॉवेल गुंडाळून सबंध अंगाला भरपूर तेल चोळून ते अंगणात खूप वेळ येरझारा घालतात. विहिरीजवळ पाण्याचे दोन टव भरून ठेवलेले असतात. त्यांशिवाय आणखी एक मोठे गरम पाण्याचे भांडे मालू आणि मीनाक्षी आत्या मिळून विहिरीजवळ आणून ठेवतात. आंघोळ होईपर्यंत पूजेच्या खोलीत देवीसमोर दिवा लावून ठेवला जातो आणि चटई पसरून भस्म आणून ठेवले जाते. हे काम अम्मिणीताईचे. पूजा झाल्यानंतर वरच्या खोलीत जाऊन कपडे वदलण्यात आणखी वेळ जातो. भस्म लावून वरती जाताच स्वयंपाकघरातून तळलेला मामा किंवा उकडलेले अंडे अंगणातल्या

वाटेने वर पोहचवले जाते. मासा आणि अंडे हे पदार्थ फक्त थोरल्या मामांसाठीच असतात. ते जेवायला खाली आले की मुले उत्तरेकडच्या अंधाऱ्या भागात लपतात. थोरल्या मामांच्या जवळून गेले की एक प्रकारचा दर्प येतो.

धान्याच्या कोठारात बाटल्या लपवून ठेवल्या आहेत.

थोरल्या मामांचे जेवण झाले की मालूचे वडील, आतोबा आणि मुले जेवतात. नंतर बायकांची पंगत. मीनाक्षी आत्या सर्वांना वाढते. शेवटी ती जेवायला बसते तेव्हा सर्वजण झोपलेले असतात. हे सगळे बघून मालूला फार वाईट वाटते.

" तू जाऊन झोप पाहू. अर्धी रात्र उलटली बघ. मला मेलीला आता सवय झालीय. "

मीनाक्षी आत्याचा आवाज विशेष ऐकू येत नाही. मोठ्या आत्याचा आवाजच जास्त ऐकू येतो. ती मीनाक्षी आत्याशी भांडण उकरून काढते. पण मीनाक्षी ब्रसुद्धा काढीत नाही. मोठी बहीण खूप बोलली की ही म्हणते, " माझं नशीबच खोटं आहे. "

मीनाक्षी आत्याविषयी बोलताना आजीला भरून येते.

" बिचारीचं नशीबच फुटकं आहे. "

तरीही स्वयंपाक घरातल्या एखाद्या कामात जरा कुठे उशीर झाला की आजी रागावते.

" तुला माहीत नाही, मी चौसष्ट माणसांना खाऊ-पिऊ घातलंय. " मधूनमधून हे वाक्य बोलल्याशिवाय आजीला चैन पडत नाही.

आतोबा म्हातारे झाले आहेत. कुणाशी बोलत नाहीत. जेवणाच्या वेळी येतात. जेवण झाले की निघून जातात. रात्री आजीच्या खोलीच्या जवळच्या खोलीत येऊन झोपतात. मालूला वाटले, आपले वडील आणि आतोबा सारखेच आहेत. दोघांना चालताना आणि जेवताना पाहिले की वाटते, हे दोघे या गोष्टी भीतभीत करताहेत.

मोठी आत्या आणि तिची मुले यांच्याकडे सगळे काही आहे. तंकम ताईचे वडील एक नम्पूदिरी होते. मरण्याआधीच बायको आणि मुलांच्या नावांवर भरपूर संपत्ती करून ठेवली होती. लांब कुठेतरी जमीनजुमला आहे. तिथली व्यवस्था पाहणारा कुंजन नायर मधूनमधून आत्याला भेटायला येतो. कुळांकडून जो हिस्सा मिळतो, तो विकून आलेले पैसे तो आणून देतो. आजी म्हणत असते, " तिच्याकडे रगड पैसा आहे. माझी लेक झाली म्हणून काय झालं. एक नंबरची चिक्कू आहे. "

आजी आणि आत्या यांच्यांत भांडणे होत असतात. मग आत्या म्हणते, " मी अन माझी मुले वाटेवरचे भिकारी होऊन जाऊ. "

एकदा खूप गडबड झाली. भितीवर लुंगी वाळत घातली होती. लुंगीचा अर्धा भाग गायीने खाऊन टाकला. ती गाय धोतर, सदरा दिसला की खाऊन टाकते.

ते बघून आत्या धावत धावत आली. गायीच्या तोंडातून उरलेला कपडा ओढून घेतला आणि तिला शिव्या घातल्या. ते न ऐकल्यासारखे करून गाय निघून गेली. तेव्हा आत्या घरात येऊन ओरडू लागली.

" कपड्यांकडे लक्ष द्यायला एक पोर जागेवर नव्हतं. "

" गायीला कपडा खाताना कुणी बघितलं का ?"

" बघितलं तरी कुणी धावत नाही. माझंच नुकसान होतं. तुम्हा लोकांचं काय जातं ? गायीला हाकलायला कुणी नाही, खायला सगळे आहेत. "

आजीला हे बोलणे आवडले नाही.

" इथं कुणी परकं नाहीय. "

" आई ! तुला माहीत नाही. इथली संपत्ती लुटली जातेय. "

" संपत्तीचं जतन कुंजीकृष्णन करील. "

" नुकसान माझं होतंय, मला आणि माझ्या मुलांनाच कठीण दिवस येणार आहेत. "

" इथं इतर माणसंही आहेत. "

शब्दाने शब्द वाढत गेला. शेवटी आत्या म्हणाली –

" आई, तू माझा आणि माझ्या मुलांचा तिरस्कार करतेस. लकाच्या मुलीवर तू केवढं प्रेम करतेस. माझ्या मुलांकडं तू पाहतसुद्धा नाहीस. "

आजी मुकाट्यानं जप करू लागली. मालू तिथे राहते हे आत्याला आवडत नाही. आतोबा तिथे असल्याचेही तिला बघवत नाही. आत्या नेहमी आडून बोलत असते की हा या गरीब कुटुंबाचा नाश करायला आलाय

दक्षिण आणि उत्तर भागातल्या वरच्या तीन खोल्या आत्या आणि तिच्या तीन मुलांसाठी आहेत. मालू कधीकधी तिथे जाते. पहिल्या खोलीत एक पलंग आहे. त्यावर रेशमी चादर अंथरलेली आहे. त्या पलंगावर आत्या आणि तंकमताई झोपतात. मधल्या खोलीत भास्कर आणि कृष्णन कुट्टी. तिसरी खोली नेहमी बंद असते. ती खोली मालूने एकदाच पाहिलेली आहे. त्या खोलीत दोन पलंग आहेत. त्यांवर जरी-काठी चादर अंथरलेली आहे. भिंतीवर तसबिरी, एक मोठा आरसा आणि मातीची हरणांची डोकी टांगली आहेत. पलंगाखाली काचेची आणि चांदीची भांडी ठेवली आहेत. मधोमध एक वाटोळे मेज आहे आणि छताला लामणदिवे टांगले आहेत.

ती खोली तंकम ताईसाठी आहे.

" मला एक मुलगी आहे. तिचा नवरा आला की त्याच्यासाठी एक खोली हवीय ना ?"

तंकम ताईच्या भावी पतीसाठी ती खोली सजवून तयार ठेवली आहे.

तंकम ताई पाचवीपर्यंत शिकली आहे. पंधरा वर्षांची झाली आहे. मालू येत्या फाल्गुनात बारा वर्षांची होईल.

मालू आजीच्या खोलीत झोपते. पूजेच्या खोलीच्या जवळ एक खोली आहे. तिथे मालूचे वडील झोपतात. त्या खोलीत फक्त एक तार बांधली आहे आणि कोपऱ्यात एक चटई गुंडाळून ठेवली आहे.

आजीचा पलंग जास्त उंच नाही. खाली चटईवर कपडा अथरून मालू झोपते पावसाळ्यात आजी तिला आपल्याजवळ झोपवते. हल्ली थंडी आणि थोडा पाऊस असतो, कांबळीखाली बरे वाटते.

मालूच्या वडिलांना मालूची मुळीच चिंता नाही. ते तिला कधी बोलवत नाहीत, तिच्याशी बोलत नाही किंवा तिच्यासाठी कधी काही खरेदी करून आणीत नाही.

" त्यांच्याकडे काही असलं तर काही करणार ना ? "

शेते विकण्यापूर्वी मशागत-निगराणी करण्यासाठी व्यवस्थापक होता. आता मालूचे वडीलच सगळे बघतात. सकाळी लवकर उठून पश्चिमेकडच्या व्हरांड्यात जाऊन जोरात साद घालतात. मग टेकडीकडून उत्तर मिळते... टेकडीवर हरिजनांच्या झोपड्या आहेत. अध्ययन, चान्तन, तामि सगळे येतात. ते गोठ्यातून बैलांना सोड-वून पाणी पाजून बाहेर काढतात तेव्हा मालूचे वडीलसुद्धा त्यांच्याबरोबर जातात. मग एकदम दुपारीच घरी येतात.

गोठ्यात बैलांच्या चार जोड्या आहेत. तीन जोड्यांचा शेतात जुंपायला उपयोग होतो. एक जोडी बैलांच्या शर्यतीत भाग घेण्यासाठी आहे. बैलांच्या शर्यतीसाठी थोरले मामा जीव टाकतात. फाटकासमोरच्या शेतात मागील वर्षी शर्यत झाली होती. कुठून कुठून बैल आले होते. आनक्करा किंवा कुमरनेल्लूर या ठिकाणी शर्यत असली की थोरले मामा रात्री झोपण्यापूर्वी कंदील घेऊन गोठ्यात जातात आणि बैलांपुढे गवत, वैरण आहे की नाही, त्यांच्या गळ्याला दोर नीट बांधला आहे की नाही वगैरे जातीने पाहतात. महिन्यातून एकदा तृतालाच्या बाजारात जाऊन बक-ऱ्याचे डोके आणतात आणि शिजवल्यावर ते कुटून या बैलांना देतात.

आठवड्यातून एकदा बांबूच्या नळीतून बैलांना तेल पाजतात. बैलांसाठी तीळ

देऊन घाण्यातून चांगले तेल काढून घेतात. तिळाचे पीक कापल्यानंतर प्रथम हा उद्योग. मग जेवढा तीळ उरतो तेवढा पोत्यांमध्ये भरून मामींच्या घरी पूतोट्टमला पोचवला जातो. उरलेला घरात वापरायला देऊन टाकतात. ताळ भाजून आणि मग कांडून खायला आजीला खूप आवडते.

घरात वापरायला महिन्याला पावशेर तेल पुरते. मंगळवार आणि शुक्रवार हे बायकांचे तेल लावून स्नान करण्याचे दिवस, त्याच दिवशी त्यांच्या केसांना तेलाचे थेंब लागतात. मोठी आत्या आणि तिची मुले त्यातले तेल घेत नाहीत. आत्या वरच्या खोलीत मोठ्या बरणीत वेगळे तेल भरून ठेवते.

वडिलांना काहीही सांगायला मालूला लाज वाटते. ताइताची साखळी तुटली, ती तिला जोडून हवी होती. आजीला वडिलांना सांगायला सांगितले. त्या कामाला चार आणे मजुरी द्यावी लागते

" त्याच्याकडं कुठले पैसे असणार ? सोनार इकडून जाताना दिसला की माझ्या-कडं पाठव. मी ठीक करून घेईन. "

वडिलांकडे पैसे नाहीत हे तिला ठाऊक आहे. आजीलासुद्धा ठाऊक आहे. आणि तरीही रात्री जेवणे झाल्यावर आजी म्हणाली,

" कुट्टन, ओणमजवळ येतोय. या पोरीला खाली नेसायला छोटया का होईना पण दोन लुंग्या आण. ओणमच्या शुभ दिवशी नेसायला लागतात. "[१]

तक्रारीच्या सुरात वडील म्हणाले,

" माझ्याकडं पैसे नाहीत. "

" ती आता वाढत आहे. या वयात मुली जाणत्या होतात. लंगोटी नेसून वावरली तर लोक तिची चेष्टा करतील.

वडील काहीच बोलले नाहीत.

" तू बोलत का नाहीस ? "

" आई, तुला ठाऊक आहे की मला या कुटुंबाकडून वर्षाला दोन लुंग्या, दोन टॉवेल, दोन लंगोट फक्त मिळतात. "

" मला सगळं माहीत आहे. "

---

१. केरळमध्ये अशी प्रथा आहे की, मुली दहा-बारा वर्षांच्या झाल्या की त्यांना ओणम, विषु किंवा तिरुवादिरा या सणाच्या दिवशी खाली पंचा किंवा चड्डीच्या ऐवजी लुंगी (ओन्नरा) नेसवतात सर्व स्त्रिया वरच्या लुंगीच्या आत ही लुंगी नेसतात. हल्ली ही पद्धत विशेष प्रचलित नाही.

" मग वायफळ बडबड कशाला करतस ! पैशाला हातसुद्धा लावू देत नाहीत. बैला-सारखं रात्रंदिवस काम करावं लागतं. मी सुरुवातीलाच सांगितलं होतं, मला ही जबाबदारी झेपणार नाही. ज्याला गरजेच्या वस्तू मिळवता येत नाहीत त्यानं लग्न कशाला करावं ?... मी वारंवार सांगितलं होतं, मला लग्न करायचं नाही म्हणून."

" ती जबाबदारी तर गेली नं ? "

" जे निघून गेले त्यांना कष्ट करावे लागत नाहीत. या गोष्टीची मला काहीच चिंता नाही, असं समजू नकोस. पण माझ्याकडं फुटकी कवडीसुद्धा नाही. "

थोरल्या मामांनी आपल्या इच्छेनुसार भाच्याचे लग्न लावून दिले होते. नात्या-तल्या एका पाटलाची मुलगी होती... मालूची आई.

मालू आपल्या घरी होती तेव्हा तिने या लग्नाविषयी ऐकले होते. थोरल्या मामांनी बोलावून सांगितले आणि वडिलांनी ते ऐकले. दोन लुंग्या आणि पानसुपारी देऊन वडिलांना त्या घरी पाठवण्यात आले होते. बरोबर दोन-चार माणसेही होती.

आजीने सल्ला दिला, " मामाला सांग. "

" मला नाही सांगता येणार. तुझ्याहून लहान आहेत ते. तूच सांग. "

" तूच सांग कुट्टन. तो काय खाणार आहे का ? "

वडिलांचा आवाज आणखी चढला. " मीच सांगेन. सांगण्याचा निश्चयच केला आहे. "

त्यांच्या बदललेल्या आवाजाने आजी घाबरली.

" काय म्हणालास तू ? "

" मला माहीत आहे. काय अन कसं सांगायचं तेही माहीत आहे. तिकडं गोठ्याची दुरुस्ती होते, सारवणं, रंगरंगोटी होते, त्यासाठी पैसा आहे. ते सगळं..."

आपले वडील बोलताहेत हे मालूला खरेच वाटेना. गुपचूप मान खाली घालून बसणारे आपले वडील हे बोलताहेत ?

" ते सगळं मी घाम गाळून आणि रक्त आटवून कमावलंय. "

" गप्प राहा पाहू. अरे देवा, कुंजी कृष्णन ऐकेल ना सगळं. " आजीने घाबरून त्याच्या डोक्यावर हात ठेवला.

" एकदा मी ऐकणारच आहे. भाच्याला जीभच नाही असं वाटतंय त्यांना. " असे बोलून वडील निघून गेले.

आजी आणि थोरले मामा यांच्यांत हल्ली संभाषण होत नाही. पूर्वी घरात एखादी गोष्ट सांगायची असली म्हणजे थोरले मामा ती आधी आपल्या ' ताईला '

सांगत. आजी थोरल्या मामांहून दहा वर्षांनी मोठी आहे.

मागच्या वर्षी ' तुल्लल'च्या दुसऱ्या दिवसापासून त्यांच्यांत वैमनस्य सुरू झाले. सकाळीच अप्पुण्णीला शिव्या देऊन घालवले होते. त्याच दिवशी संध्याकाळी भांडण झाले.

" त्या मुलाचासुद्धा इथं हक्क आहे. "

थोरले मामा थांबले. कमरेवर हात ठेवून विचारले,

" हक्क ? म्हणजे काय ? "

" तोसुद्धा याच घरातला आहे... "

" म्हातारे, गप्प बस. "

" ताई म्हणणारा ' म्हातारी ' म्हणतोय. "

" कुंजीकृष्ण, तू काळ आहेस, या कुटुंबाचा काळ आहेस. " थोरले मामा गरजले, " मी लाथ मारून..."

यावर आजी काही बोलली नाही. सरळ घरात निघून गेली. खोलीतून म्हणाली, " तू तेसुद्धा करशील. नालायक, गुरुद्रोही ! "

अप्पुण्णी शाळेत जातो हे तिला मालूकडनच कळले.

" खरंच ? "

" खरंच आजी, मी बघितलंय. "

" तुला भ्रम झाला असेल. "

" नाही आजी मी त्याच्याशी बोललेसुद्धा. "

मग तिची खात्री पटली.

" दीर्घायुषी होवो पोरगा. तोच तिचा आधार आहे. "

त्या काळात तिलाही वाटले होते की, पारुक्कुट्टीने कुटुंबाला काळिमा फासला. त्या काळात कुणी तिला पारुक्कुट्टीविषयी विचारले तर म्हणायची, " ती माझ्या पोटी जन्माला आली एवढंच... "

पण काही वर्षे लोटल्यानंतर पारुक्कुट्टीचे कसे काय चालले आहे ते जाणून घ्यावेसे वाटू लागले. विटक्केप्पाट्टपासून तिचे घर अवघ्या दोन मैलांवर होते. पण दोन मैलांचे अंतर माणसांना एकमेकांपासून किती दूर नेऊ शकते हे तिला आता कळत होते. पारुक्कुट्टीची विचारपूस करायला कोणी गेले नाही. कारण कोणी गेले तर परत या घराच्या दारात पाऊल टाकता आले नसते. या आज्ञेचे उल्लंघन करण्याची कुणाचीही प्राज्ञा नव्हती.

पारुक्कुट्टीला मुलगा झाला, ही गोष्ट अगदी गुप्तपणे कळली. चरुमी बायकांपैकी कुणीतरी सांगितले. तेव्हा लगबगीने उठून बाहेर जाऊन आजीने विचारले, " खरं का ग नीली, मुलगा की मुलगी ? "

" मुलगा आहे, बाईसाहेब ! "

" कधी झाला ? फार त्रास नाही ना झाला ? आता मदतीला कोण आहे ?"

" काल रात्री झोपण्यापूर्वीच थोड्या कळा आल्या होत्या. आज सकाळीच मुलगा झाला. मदतीला धोबीण..."

तिचे वाक्य पूर्ण होण्यापूर्वीच आजीची मोठी मुलगी तिथे आली.

" इतकं वाईट वाटतं तर आई, आपल्या मुलीकडं का गेली नाहीस ? "

ती पटकन आपल्या काळोख्या खोलीत जाऊन पलंगावर बसली.

कोंतुण्णी नायरच्या मृत्यूची बातमी कळली तेव्हा आपल्या खोलीत बसून एकटीच रडली. " आता तिला कुणाचा आधार ?"

मोठ्याने काही बोलता येत नाही. स्वयंपाकघराच्या बाजूला चेरुमी किंवा भंगीण एकटी भेटली तर हळूच पारुक्कुट्टीचे क्षेमकुशल विचारून घेते. मोठी मुलगी ऐकेल ही भीती असते ना. मीनाक्षी काहीच म्हणत नाही. तिचा चेहरा पाहिला की वाटते, हिला रडायलासुद्धा फुरसत नाही. हसता तर येतच नाही.

अप्पुण्णीला पाहायची इच्छा होती. तो रोज दोन्ही वेळा फाटकासमोरून जातो. भास्कर आणि कृष्णन कुट्टी ज्या शाळेत शिकतात त्याच शाळेत तोही जातो.

भास्करला काही विचारता येत नाही. मोठ्या मायेने " भास्कर, माझ्या बाळ, इकडं ये बघू ! " असे म्हटल्यावरसुद्धा त्याच्या मनात असले तरच येतो.

संध्याकाळी बागेच्या टोकाला जाऊन उभे राहिले तर त्याला पाहता येईल. पण अंगणात उतरणेही आता कष्टाचे झाले आहे. पाठ सरळ होत नाही.. बागेत जायचे म्हणजे दहा-बारा पायऱ्या उतरायच्या. आणि एक वेळ उतरले तरी परत चढणे मोठे कठीण. पुन्हा तिथे जाऊन अप्पुण्णीशी बोलताना भावाने पाहिले म्हणजे गहजब.

त्याने म्हटले होते, " लाथ मारीन. " ती अजून ते विसरली नव्हती. लहानपणी त्याच्या सगळ्या अंगावर फोड उठले होते तेव्हा तीच औषध लावायची आणि न्हाऊ घालायची. मुलांचे करण्यातून आईला फुरसत मिळत नसे. सकाळी कडेवर घेतले की संध्याकाळी निजवतानाच त्याला खाली ठेवायची. ज्याला असे कडेवर घेऊन, सगळीकडे फिरवून, खाऊ–पिऊ आणि न्हाऊ घालून आपल्याबरोबर झोपवून मोठे केले तोच हा भाऊ कुंजीकृष्णन. गावचा पाटील झाल्यापासून दोन गोष्टी बोलायला-

सुद्धा त्याचा वेळ आणि सोय-सवड पाहावी लागते. शेवटी हेसुद्धा ऐकायला लागले, " लाथ मारीन मी..."

ते आठवले आणि तिचे डोळे भरून आले.

" फळं भोगावी लागतील. ह्या सगळ्याची फळं भोगावी लागतील. "

मालूने दारातून डोकावून विचारले, " आजी कुणाशी बोलते आहेस ? "

" कुणाशी नाही पोरी. तिन्हीसांजा झाल्या, नाही का ग ? "

" हो, आजी. "

" जरा पाहायचं होतं. पण त्या हलकटाला ते खपणार नाही ना. "

" अप्पुण्णी दादाला यायला अजून अवकाश आहे. " मालूला वेळेचा अंदाज असतो. मोगऱ्याच्या झाडाची सावली भांडी घासण्याच्या दगडाला लागून थोडी पुढे जाते तेव्हा अप्पुण्णी दादा येतो.

" काय उपयोग. तो काळ फाटकाशी असणार. "

" थोरले मामा बाहेरगावी गेलेत. "

' काळ ' म्हणजे काय ते मालूला कळले, हे आजीला बरे वाटले नाही.

" तुला कसं ग ठाऊक ? "

" अग, हो आजी, अम्मिणी ताई आणि मामीलासुद्धा बरोबर घेऊन गेले आहेत. आता परवा येतील. "

" त्याच्या येण्या-जाण्याशी मला काय करायचंय. "

मग विचार करू लागली, भाऊ घरात नाही. तर अप्पुण्णीला भेटून विचारपूस का करू नये ?

कुंजिकुट्टी लहानपणी अशी नव्हती. पण तिच्या आवडी-नावडीचा मी कशाला विचार करू ?

कुंजिकुट्टी लहानपणी अशी नव्हती. तीन मुलींमध्ये तीच सर्वांत प्रेमळ होती. नम्पूदिरीशी लग्न झाल्यावर स्वभाव बदलला. तिला ते पसंत नव्हते. आई आणि मामाने आग्रहच धरल्यानंतर तिने विरोध केला नाही. म्हणून आता ताठर-पणा करीत आहे. हं मोठं झाल्यानंतर कुणालाही आपल्याच पदराखाली ठेवणे कठीण आहे-असे स्वतःचे सांत्वन केले.

" मालू. "

मालू स्वयंपाकघरात होती. धावत आली.

" काय आजी ? "

" मोठी आत्या कुठाय ग ?"

" मोठी आत्या आन तंकम ताई तलावाकडे गेल्यात. "

ती धार करून उठली.

" मग तू जरा माझ्याबरोबर चल. आपण जरा तिथपर्यंत जाऊ. "

अप्पुण्णीला पाहायला जाऊ असे सांगायला तिला लाज वाटत होती.

" पायऱ्या उतरता येतील का ग आजी तुला ?"

" हो, उतरेन की. "

आजी मालूच्या मदतीने हळुहळू पायऱ्या उतरली. झाडे लावण्यासाठी खड्डे खणले होते. त्यांच्यामधून चालायला जरा त्रास होत होता.

मालूने शेताच्या त्या टोकापर्यंत नजर टाकली.

"कुणीही दिसले नाही. थोड्या वेळाने दूरवर काहीतरी पांढरे दिसू लागले. जवळ आल्यावर मालू म्हणाली, " अप्पुण्णीदादा ! "

पण अप्पुण्णी तर कुंपणाजवळची सडक सोडून शेतामधल्या बांधावरून चालला होता.

" इकडं बोलाव. त्याला म्हणावं, इथं आजी उभी आहे. "

आजीने घाई केली. मालूला वाटले तिथून बोलावून अप्पुण्णीदादाला ऐकू गेले नाही तर ? एके ठिकाणी कुंपण तुटले होते. तिथून बाहेर पडली आणि धावली.

अप्पुण्णी घामाने चिंब झालाय, बगलेत दप्तर आहे, लुंगी दुहेरी करून खोचली आहे आणि हळुहळू येतोय. जवळ येताच मालूने सांगितले, " अप्पुण्णी, आजी बोलावतेय. "

" मी कुठंही येणार नाही. "

तो वेगाने चालू लागला.

मालू निराश होऊन परत आली. जवळ आली तेव्हा आजीने विचारले, " कुठाय ग तो ? "

" तो आला नाही, आजी. "

" मी बोलावत्येय म्हणून सांगितलं नसशील."

" सांगितलं आजी. पण दादा म्हणाला, ' मी कुठंही येणार नाही ' आणि भर्रकन निघून गेला. "

ती काही वेळ विचार करीत उभी राहिली. मग निःश्वास टाकून म्हणाली, " नाहीच येणार तो ... कसा बरं येईल तो ?"

# चार

दुसऱ्या दिवशी तिरुवादिरा[1] होता. यूसुफच्या दुकानात रोजच्यापेक्षा अधिक गर्दी होती.

पन्नास ग्राम मिरची हवी आहे. इल्लमचे काम संपल्यानंतर तो मिरची घ्यायचा विचार करून सडकेवर आला. वाप्पूचे दुकान नीट चालत नाही. त्यामुळे त्याच्या दुकानात जुना माल असतो. यूसुफच्या दुकानात वस्तू चांगल्या मिळतात.

व्हरांड्यात रोज येणारे रिकामटेकडे लोक येऊन बसले आहेत. शिप्याच्या चारी बाजूंना तीन-चार मुले गोळा झाली आहेत.

तिथे मुलमंकयिलच्या उत्सवाची चर्चा चालली आहे. मागील वर्षीचा उत्सव पाहून आलेला एक इसमही त्यात आहे. कुंजू आणि बाप्पुट्टी आपसांत केळ्याच्या पानांच्या विक्रीचा हिशोब करीत आहेत

शंकरन नायर जवळ आला आणि चर्चा बंद झाली. रावुण्णीने विचारले, " शंकरन नायर तिरुवादिरा कसा काय झाला ?"

" तिरुवादिराचं मला काय ?"

त्या गर्दीत घुसून त्याने पन्नास ग्राम मिरचीचा पुकारा केला.

" का रे शंकरन नायर इतकी कमी का ? " मुसलियारने विचारले.

" उलट एवढी जास्तच झाली. "

वेलप्पन, रावुण्णी आणि अस्सनकुट्टी यांनी तेवढ्यात डोळ्यांनी इशारा केला. अस्सनकुट्टीने विडी पेटवून यूसुफच्या मेजावर आगपेटी फेकून हसत म्हटले, " शंकरन नायरचा खर्च हल्ली जरा वाढलाय. "

यूसुफने विचारले, " असं का बुवा ?"

---

१. पौष महिन्यातला स्त्रियांचा विशेषतः सुवासिनी आणि कुमारिकांचा सण.

" त्यालाच विचार. "

" मूर्ख आहेस तू. तसं काही असलं, तर तो मला खात्रीनं सांगेल. "

" यंदाचा तिरुवादिरा असा साजरा करणं पुरेसं नाही, शंकरन नायर. "

शंकरन नायरच्या पायाच्या अंगठ्यांत कापरं भरल्यासारखं झालं. काही बोलला नाही. अजून मिरची तोलली नव्हती.

बाप्पुट्टी आधी पानांच्या व्यापाराच्या गोष्टी करात होता. आता तो यांच्या गप्पां-मध्ये सामील झाला.

" काय ईसुपकाका शंकरन नायरच काही नवं नातं जुळलंय ? "

" मला माहीत नाही. रावुण्णीला विचारा. त्याला ठाऊक असेल. "

" का रे नायर, आम्हांला सांगितलं नाहीस ? "

शंकरन नायरच्या सहनशक्तीचा अंत झाला होता. तरी हलक्या आवाजात बाप्पुट्टी म्हणाला,

" अरे त्यात काही वाईट नाहीय, नायर. अजून चांगला माल आहे ती. "

खांबाला टेकून डोळे मिटून शंकरन नायर उभा होता. बाप्पुट्टी जिवणी पसरून विडी पीत हसत होता. शंकरन नायरनं वळून बाप्पुट्टीच्या गालावर जोरात थप्पड हाणली.

गप्पा आणि थट्टामस्करी एकदम बंद झाली. अचानक थप्पड बसली होती. सर्व-जण स्तंभित झाले. जिनसा घ्यायला आलेले बाजूला उभे राहिले.

लोकांनी बाप्पुट्टीकडे काही आशेनं पाहिलं. त्याच्या डोळ्यांतून विस्तव बाहेर पडतोय. तो धाडसी आणि बेडर आहे. काहीही करू शकतो. तीन वेळा फौजदारी खटल्यात पकडला गेला आहे तुरुंगात फक्त एकदाच गेला. कण्णूरच्या तुरुंगात जाणे धाडसी लोकांचे काम आहे, अशी त्याची धारणा आहे.

तो उठून उभा राहिला. कमरेत खोचलेला चाकू हातात होता.

" बाप्पुट्टी, काय करतोयस. " यूसुफ छातीवर हात ठेवून किंचाळला. पण त्याच्या हातातला चकाकणारा सुरा पाहून शंकरन नायर विचलित झाला नाही.

सुरा धरलेला हात अचानक वर झाला. तेवढ्यात रागाच्या भरात एका दणकट हाताने त्याला रोखले. पाहिले, सैतालिकुट्टी होता.

" सोड मला सैतालिकुट्टीदादा ! "

" सुरा बंद कर बाप्पुट्टी ! "

" या नायरची आतडी बाहेर काढली नाही, तर माझे नाव अयतुमान नाही. "

" मी सांगतोय, सुरा बंद कर. नाहीतर तुला माझ्या हातचा प्रसाद चाखावा लागेल ... "

बाप्पुट्टीने नाखुषीने हात खाली आणला. त्याची छाती धपापत आहे. सैतालिकुट्टीने त्याच्या हातातून सुरा काढून घेतला आणि आपल्या कमरपट्टीत खोचून म्हटले,

" बाप्पुट्टी कृतघ्न होऊ नकोस. "

त्याचा चेहरा लाल झाला. तो गप्प उभा राहिला.

" नायर जा."

शंकरन नायर तिथून असा निघाला की जणू काही झालेच नव्हते.

सडकेवरून जाताना त्याचे मन असे जळत होते की जणू मधमाश्यांनी डंख केला होता.

" कुत्रे ... तिची बदनामी करतात. "

विचार केल्यावर त्याला वाटायला लागले की, ' चूक माझीच आहे. ही अफवा पसरायला मीच जबाबदार आहे. माझं तिच्या घरी जाणं, गप्पा करणं, सगळ्यावर लोकांनी नजर ठेवली असणार. आपण असं करायला नको होतं. '

' छे, मी काही चूक केली नाही. जिला कुणाचाही आधार नाही तिला मी थोडीबहुत मदत केली. बस एवढंच ! एवढ्यावर तिच्या नावानं ... '

शंकरन नायरचे रक्त उसळू लागले. तो भराभरा चालू लागला. अच्चूमामाच्या दुकानाशी पोचला तेव्हा आवाज आला –

" शंकर. "

" आली का आफत ! " आता त्यांच्याकडे गेल्याशिवाय गत्यंतर नाही.

" जरा इकडं ये. "

शंकरन नायर आत गेला.

अच्चूमामाने विचारले, " काय हो व्यवस्थापक, कसं काय चाललंय ? "

तो गप्प राहिला.

" जरा हे पान कुटून दे. " पान कुटण्याचा छोटा खल पुढे ठेवला. शंकरन नायरला सगळ्या जगाचा राग आला आणि तो जोरजोरात पान कुटू लागला.

" तू तो खल फोडून टाकशील. "

शंकरन नायरने न ऐकल्यासारखे केले. पान कुटून मामान्ना दिले. अच्चूमामा पान खाऊन, पंखा सुरू करीत खुर्चीवर पडले.

" पारुक्कुट्टी अम्माच्या घरची व्यवस्था तू पाहतोस असं ऐकलंय, शंकर. खरंय का हे ? "

शंकरन नायरची वाणी बंद पडली.

" खरं का रे हे ? "

त्याने फक्त मान डोलवली.

उपहासाने हसत मामांनी विचारले, " हे काम केव्हापासून करतोयस ? "

अच्चूमामा विचारताहेत. शंकरन नायरने राग गिळून म्हटले, " थोडेच दिवस झाले. "

" ठीक आहे. ते करायलाच हवं. तिचं कुणी उरलं नाही. "

खिडकीतून बाहेर जोरात थुंकत मामा पुन्हा म्हणाले,

" पण बदनामी होऊ देऊ नकोस. चारचौघांमध्ये ताठ मानेनं वावरता आलं पाहिजे. "

शंकरन नायरला आता तिथे थांबवेना.

" झाडांना पाणी घालायचंय. नंतर येईन मी. " असं म्हणून उत्तराची वाट न पाहता तो निघाला.

त्या रात्री त्याला झोप आली नाही.

मनाशी काही निर्णय झाल्यानंतर तो तिथे गेला. धीराने तो फाटकाच्या आत गेला. ' सर्वांना दिसू दे. ' सूर्य मावळला होता, पण अजून काळोख झाला नव्हता.

अंगणात पोचला तेव्हा पारुक्कुट्टी अम्मा पणती उजळून बाहेर येत असलेली दिसली.

त्या छोट्याश्या पणतीचा मंद प्रकाश तिच्या चेहऱ्यावर पडला आहे. इल्लम-मधल्या उखळ असलेल्या खोलीत आणि आसपास काम करणारी मोलकरीण ती हीच यावर त्याचा विश्वास बसत नाही. स्नान करून ओले केस पाठीवर मोकळे सोडले आहेत. कपाळावर विभूती लावली आहे. त्या चेहऱ्यावर मंद प्रकाश पडतो आहे, तिथे वेदनासुद्धा आहे.

व्हराड्यात येताना त्याचे मन बेचैन झाले. जणू तो काहीतरी अपराध करीत होता. मग धैर्य गोळा करून त्याने विचारले, " दिवे लागणीची वेळ झाली वाटतं ? "

डाव्या हातात पणती घेऊन आणि उजव्या हाताच्या बोटाने वात सारखी करीत पारुक्कुट्टी म्हणाली, " वेळ झाली असं वाटतं. आताच आलात का ? "

" इल्लमहून दुपारीच आलो होतो. थोडं पाणी द्यायचं होतं. "

फरशीवर बसत त्याने विचारले, " अप्पुण्णी कुठंय ? "

" आंघोळीला गेलाय. "

संभाषण थांबले. पणती खाली ठेवून दाराच्या भिंतीशी टेकून पारुक्कुट्टी उभी राहिली.

नायरच्या मनात शब्दांचे जणू वादळ चालले होते. ' सांगायला हवं... सांगायला हवं... ' फाटकातून येताना बरेच काही सांगण्याचे धैर्य होते. पण आता शब्द गळ्यात अडकले होते. मोठ्या कष्टाने मान वर न करता त्याने एक हाक मारली, " पारुक्कुट्टी अम्मा. "

पारुक्कुट्टीने मान वर केली.

" मी इथं येतो-जातो. त्याचा लोक बराच अर्थ लावतात. "

पारुक्कुट्टीने स्थिर स्वरात म्हटले, " लोकांना काय, ते वाटेल तो अर्थ लावतील. "

त्याला धीर आला. "माझ्यामुळं तुमची बदनामी व्हावी असं मला वाटत नाही."

पारुक्कुट्टीने घाबरून त्याच्याकडे पाहिले आणि म्हटले, " मला फक्त तुमचाच आधार आहे. '

शंकरन नायरचा उत्साह आणखी वाढला.

" पारुक्कुट्टी अम्मा, वाईट वाटून घेऊ नका. एक गोष्ट विचारायला आलोय. "

" काय ? "

" तुमच्या मदतीला कोणी नाही. बऱ्याच दिवसांपासून मीही एकटाच आहे. हरकत नसेल ... तर ... लग्न... "

" नाही, शंकरन नायर, ते होणं नाही ! " पारुक्कुट्टीने दृढ स्वरात सांगितले. शंकरन नायरला पुन्हा मान वर करण्याची हिम्मत होईना.

" माझ्या बाबतीत ती वेळ आता निघून गेली आहे. आता तसे काही करण्याचा माझा मुळीच विचार नाही. वाईट वाटून घेऊ नका. ... "

तो गप्प बसला. मन जणू जळत आहे. पायऱ्यांचा आवाज आला. त्याने पाहिले, अप्पुण्णी आहे. इकडे-तिकडे न पाहता तो सरळ आत आला होता.

शंकरन नायर उभा राहिला.

" पारुक्कुट्टी अम्मा... मी जे काही म्हटलं ते विसरून जा. चूक माझी आहे..."

पारक्कुट्टी अम्मा मान खाली घालून उभी राहिली.

" गैरसमज करून घेऊ नका. केव्हाही मी मदत करायला तयार आहे. ही गोष्ट विसरून जा. "

पारुक्कुट्टीचे डोळे पाणावू लागले.

तो हळुहळू निघाला.

खालात चिमणीच्या प्रकाशात अप्पुण्णी अभ्यास करू लागला. नजर पुस्तकावर खिळली आहे. पोटावर पालथा पडलेल्या आपल्या मुलाकडे अनिमिष पहात पारुक्कुट्टी दार धरून उभी आहे.

तो वाढतोय. पंधरा वर्षांच्या मुलांपेक्षाही तो अंगापिंडाने मोठा आहे. जसजसा वाढतोय, तसतसा तो तिच्यापासून अधिक दूर जातोय का ?

पूर्वीसारखे जास्त बोलत नाही. काही विचारले तरच उत्तर देतो. शाळेतून आल्यावर तो फारसा घरात राहत नाही. बागेत किंवा आसपास फिरत राहतो. म्हातारीच्या झोपडीत जाऊन बसतो. तो असा चालत असतो की, जणू त्याचे मन या जगात नाहीच. तो हल्ली चटकन रागावतो. तो बदलतोय का ?

तो जेवणाची वेळ होईपर्यंत वाचीत राहतो. जेवल्यानंतर पुन्हा वाचावे लागते. झोप आली की दिवा मालवून झोपी जातो. ...

त्याला काहीही सांगायचे–विचारायचे नाही का ?

" कसला विचार करतो आहेस, अप्पुण्णी ?"

" काही नाही. "

" उदास वाटतंय का ? "

" काही नाही. "

नेहमी हेच उत्तर : " काही नाही, " पुन्हा पुन्हा तेच उत्तर ऐकून तिची भीती आणखी वाढली.

" हे देवी, माझ्या पोराचं नेहमी कल्याण होऊ दे. "

त्या ठिकाणी नदी नागमोडी वाहते. त्या वळणावर उन्हाळ्यातही पाणी खोल असते. इथे तर नदी एखाद्या रेषेसारखी आहे. वळणावर मात्र शांत पाणीसुद्धा जलावर्ताशी आल्यावर लाटा-लाटांनी उचंबळू लागते.

अप्पुण्णी एका उंचवट्यावर जाऊन बसला.

अय्यप्पन जलावर्ताची शांतता भयानक आहे. छोट्या छोट्या लाटा एकीमागून एक किनाऱ्याकडे जातात आणि किनाऱ्याशी आपटून फुटतात.

आज सुट्टी आहे पण घरात बसावेसे वाटत नाही. खेळायला कोणी सोबती नाही. तो घरून निघाला आणि इथे येऊन पोचला.

अय्यप्पन जलावर्तावर पाणी गरगरा फिरत होते, ते पाहत राहिला. त्या जला-वर्तात सापडणारे परत येत नाहीत. त्यात अय्यप्पनचा महाल आहे, असे लहानपणी

ऐकले होते. पावसाळ्यात त्या जलावर्ताजवळून जाताना काही दुर्घटना होऊ नये म्हणून पाण्यात नाणी टाकतात. जलावर्ताच्या खाली महाल किंवा देव असणे शक्य नाही. या सगळ्या थापा आहेत.

पहिल्याच दिवशी वर्गात रामकृष्णन मास्तरांनी जे सांगितले होते ते आठवले.

" जिथं जिथं काहीतरी आकार दिलेला दगड आहे, तिथं तिथं देव आहे. देवाचे-सुद्धा अनेक वर्ग आहेत. काही देवांना ताडी आणि मांस पुरतं, तर काहींना दूध आणि फळं लागतात. ही अशीच आमच्या देशाची स्थिती आहे."

रामकृष्णन मास्तर नवे होते. छान बोलायचे. त्यांचे शिकवणे म्हणजे एक व्याख्यानच असायचे. कधीकधी त्यांच्या व्याख्यानाचा अभ्यासाशी काही संबंध नसायचा. पण तरीही ते सुश्राव्य असायचे.

सुट्टीचा दिवस म्हणजे एक शाप आहे, असे अप्पुण्णीला वाटले. शाळा असली म्हणजे सकाळी घरातून निघाले की एकदम संध्याकाळी परत यायचे.

घरात बसणे मोठे कठीण काम आहे.

आईला पाहिले की झोपडीवाली आजी त्या दिवशी जे म्हणाली ते आठवते आणि त्याचा पारा चढतो.

तलावाशी तिला पाहिले की लोक कुजबुजतात. तिला पाहिले की छद्मी हसतात. त्याला समजते...

' तो इथं का येतो ? आईशी गप्पा का करतो ? '

लोकांचे टोमणे ऐकले की त्याला चाबकाचे फटकारे मारल्यासारखे होते.

तो म्हणे आईशी लग्न करणार आहे.

आदल्या दिवशी संध्याकाळी इल्लमच्या त्या बाजूच्या मंदिराजवळील तलावावर तो आंघोळीला आला तेव्हा तिथे पुरुषांची गर्दी होती. जवळच हत्तींना स्नान घालण्याचा घाट होता. तिथे पायऱ्या नसल्याने तिथे कोणी आंघोळीला जात नसे. तिथे जाऊन तो आंघोळ करू लागला.

स्त्रियांचा घाट तिथून जवळच आहे. आंघोळ करताना एका बाईने विचारलेले त्याला ऐकू आले,

" कोण ग तो मुलगा ? "

" अग तो तर पारुक्कुट्टीचा मुलगा. "

त्या पुढे बोलू लागल्या आणि त्याचे हृदय धडधडू लागले. त्याला ते ऐकण्याची इच्छा नव्हती, पण ऐकू येतच होते.

" शंकरन नायर नेहमी तिथं ठिय्या देऊन बसलेला असतो."

बुड्या मारून आंघोळ केली आणि अंग पुसले, पण त्याचे चित्त स्वस्थ नव्हते. रागाने थरथरतच तो घरी आला आणि घरी आल्यावर त्याला काय दिसले, तर तोच जमिनीवर बसला आहे. तोच शंकरन नायर. आईशी हळुहळू काहीतरी बोलतोय.

त्याला पिटाळून लावावे असे वाटले. हे त्याचे घर होते, त्याच्या वडिलांचे घर होते; कोंतुण्णी नायरचे घर आन हा इथं येऊन गुलुगुलू गोष्टी करतोय ...

'लोक म्हणतात ते खरंच आहे. तो यापुढेही इथं येईल. छातीएवढ्या पाण्यातून वडिलांनी आईला आणले होते. आणि ते वारल्यानंतर आता शंकरन नायरशी ...

किनाऱ्यावर आपटणाऱ्या लाटा पाहून पाहून तो कंटाळला. गरगरा फिरणाऱ्या जलावर्तात त्याने एक दगड भिरकावला,

'तो माझ्या आईचा नवरा होईल. मग मी त्या घरातला कुणी नाही! '

'मला कुठंच स्वातंत्र्य राहणार नाही! '

'सगळे वैरी आहेत — शंकरन नायर, भास्कर, थोरले मामा, सगळे, सगळे. आता आईसुद्धा त्यांच्याच पक्षात गेली.'

शाळासोबत्यांमध्ये ताठ मानेने उभे राहता येत नाही. इल्लमच्या मोलकरणीचा मुलगा ना!

'आई शंकरन नायरची बायको आहे.'

आणखी एक दगड जलावर्तात फेकला आणि तो उठून उभा राहिला. त्याच गोष्टीचा विचार करीत तो नदीच्या काठाकाठाने चालत होता, तेवढ्यात कोणीतरी हाक मारली, " कोण अप्पुण्णी ना रे ? "

त्याने आवाज ओळखला. तो जवळ आला. बदला घेण्याच्या नजरेने त्याने शंकरन नायरकडे पाहिले.

" काय चाललंय नदीकाठी ? "

" काही नाही. "

" असाच फिरायला निघाला होतास वाटतं ? "

" हो. "

तो पुढे निघाला. झारी खांद्यावर घेऊन शंकरन नायर मागेमागे चालू लागला. जिथे वाट अरुंद होती तिथे तो त्याला खेटून-घसटून चालत होता.

अप्पुण्णीचे मन जळत होते.

'तू माझा कुणी नाहीस.

' मी कोंतुण्णी नायरचा मुलगा आहे. '

' मला तुझ्याबद्दल घृणा वाटते. '

अप्पुणीच्या कपाळावर घाम आला. तो झरझर चालू लागला. शंकरन नायरसुद्धा त्याच्याबरोबर मुकाट्याने चालत होता.

तेवढ्यात समोरून बाप्पुट्टी उपटला. त्याच्या कमरेला लुंगी, अंगात जाळीदार गंजिफ्रॉक आणि डोक्यावर पगडी होती. जवळ आल्यावर तो थांबला. शंकरन नायर सांगत होते, " विसरलो नाही. "

" बाप-लेक कुठं निघालेत ? " एवढंच विचारून तो निघून गेला.

अप्पुण्णीला मेल्याहून मेल्यासारखे झाले. शिताफीने ठार मारून टाकावे या इच्छेने त्याने शंकरन नायरकडे पाहिले. तर तो जमिनीत गाडल्यासारखा उभा होता. स्तब्ध, अचल.

त्याला वाटले, संकटातून वाचलो. मग तो पुढे निघाला.

घरी गेल्यावर एकटे बसून पोटभर रडावे असे वाटले. खोलीत गुंडाळून ठेवलेल्या गोधडीवर तोंड दाबून पडला.

संध्याकाळी आईने हाक मारली, तरी उठला नाही.

स्वयंपाक झाल्यावर पारुक्कुट्टीने जवळ येऊन पुन्हा हाक मारली. विचारले, " डोकं दुखतंय का ?"

उत्तर नाही.

" तुझं पान वाढलंय, अप्पुण्णी. "

तो काहीही बोलला नाही.

वाकून त्याच्या पाठीवर हात ठेवला तर तो एकदम उठून वेड्यासारखा किंचाळला.

" मला शिवू नकोस...शिवू नकोस मला. "

पारुक्कुट्टी स्तंभित झाली. गद्‌गदलेल्या स्वरात विचारले, " माझ्या बाळा, काय झालंय तुला ?"

तरी त्याचा एकच घोशा: " मला शिवू नकोस, शिवू नकोस. "

बाळ जेवला नाही.

आईसुद्धा उपाशी राहिली.

एकमेकांजवळ झोपले. दोघेही काहीही बोलले नाहीत. रात्रीच्या नीरव शांततेत आई हुंदके देत राहिली.

पहाट फुटण्यापूर्वीच तो उठला.

आई चटईवर डोळे मिटून पडली होती. झोपली नव्हती. पटकन शर्ट घातला. तारेवर पडलेला शर्ट आणि धोतर यांची घडी गुंडाळून दप्तरात कोंबली. तो दार ओलांडू लागला तेव्हा आईने डोळे उघडले.

दमली होती. उठून बसली. क्षीण स्वरात विचारले, " इतक्या पहाटे कुठं चाल-लास, अप्पुण्णी ?"

" मी जातोय. "

" बाळ... !" हाक नव्हती ती, एक अस्फुट हुंदका होता.

" कुठं जातोयस बाळा ?"

" कुठंही. "

" ...... "

" आई तुला...शंकरन नायर मिळालाय ना ?"

समोरचे दार उघडून तो अंगणात आला.

" अप्पुण्णी ! ..."

त्याने वळूनही पाहिल नाही.

त्याचे शरीर कापत होते. त्याच्यामागची साद क्षीण होत होती.

टेकडीच्या पाणथळीत झाडीमध्ये उंचवट्यावर तो जाऊन बसला आहे.

सकाळपासूनच तो येऊन बसला आहे. हा शाळेचा रस्ता असता, तर कोणी सोबती भेटला असता, त्याला पाहताच हजार प्रश्न विचारले असते. इथे कुणी पाहायला नाही, की बोलायला नाही.

हा पहाडी प्रदेश निर्जन आहे. दूर झाडीमध्ये वाकड्या शिंगांचा एक बकरा चर-तोय. त्याच्याही पलीकडे चरत असलेल्या गायी आणि म्हशी काळ्या डागांसारख्या दिसताहेत.

कडक ऊन पडले आहे. पाठीवरून आणि छातीवरून घामाच्या धारा वाहत आहेत. घामाने चिंब भिजलेला शर्ट अंगाला चिकटलाय.

एक मजूर डोक्यावर बांबूची मोळी घेऊनच खालच्या अरुंद वाटेने वर आला. मजूर आहे, पण त्याने त्याला विचारले,

" छोटे सरकार, इथं कशाला बसलात ?"

" असाच. "

दुरून काही लोक येताना दिसले. अप्पुण्णी उठून पश्चिमेकडच्या सडकेच्या दिशेने

निघाला. त्या बंद फाटकाचे दार त्याने धक्का मारून उघडले.

वर खणून बनवलेल्या पायऱ्या आहेत. दोन्ही बाजूंना मध्येमध्ये पडझड झालेल्या भिंती. वर उभा असलेला जुना पुराणा नालुकेट्टू. त्याच्यासमोर बिल्व वृक्षाचा चबुतरा आणि दक्षिणंकडे बैठकीची खोली.

क्षणभर तो द्विधा अवस्थेत थबकला. मग पायऱ्या चढून घरासमोर येऊन ठेपला. कोणी दिसत नाही.

थोरले मामा बैठकीच्या खोलीत बसून त्याला पाहत असतील. पाहू दे. ज्याला मारून पिटाळले होते तोच अप्पुण्णी परत आलाय.

व्हरांड्यात आला.

बाहेरच्या दरवाजात कुणाचे तरी डोके दिसले, असे वाटले, पण त्याची नजर जाताच ते डोके लपले.

अप्पुण्णीने पुढच्या खोलीत पाऊल टाकले. जवळच्या बाकावर दप्तर ठेवले.

"कोण आहे?"

"मी आहे."

मन धैर्य गोळा करीत होते. धाडसी बापाचा मुलगा आहे. त्याने निर्भय असायला हवे.

थोरली मावशी, भास्करची आई आली. तिरस्काराने विचारले, "काय आहे?"

चटकन उत्तर सुचले नाही. थोडा विचार करून म्हणाला, "आजीला भेटायचंय."

तेवढ्यात मालू दारात आली आणि डोकावून परत आत गेली.

"अप्पुण्णी..." दक्षिण भागातून आजी येत होती. तो निःसंकोचपणे दार ओलांडून दक्षिणेकडच्या खोलीत गेला.

आजीजवळ उभा राहिला आणि त्याचे हृदय उचंबळून आले. त्याच्या डोक्यावरून आणि खांद्यावरून हात फिरवीत आजी म्हणाली, "तुला भेटायचं खूप दिवस मनात होतं."

अप्पुणी आजीच्या खोलीत गेला. उत्तर भागात उभी राहून तंकमताई त्याच दिशेने पाहत होती. ती अशी का पाहते आहे? उत्सव वगैरे आहे की काय? मावशी दाणदाण पाय आपटीत चालू लागली. ज्याला ऐकायचे असेल त्याने ऐकावे अशा हेतूने ती म्हणाली, "आज थोरले मामा आले की उत्पात होणार आहे."

यावर कोणीच काही बोलले नाही, तेव्हा ती अप्पुण्णीकडे वळून म्हणाली, "मला

तुझ्याविषयी घृणा नाही, पण पूर्वी तुला मारून पिटाळलं होतं ते इतक्या लवकर विसरलास ? "

" आठवतंय. "

" मग तू इथं कशाला आलास ? "

अप्पुणीचा चेहरा उदास दिसू लागला.

" मामा कधी येतील याचा नेम नाही. तू लवकर निघून जा. "

" मी जाणार नाही ! "

" काय म्हणालास ? "

" मी जाणार नाही ! "

केसांना झटका देऊन काहीतरी पुटपुटत मावशी निघून गेली.

अप्पुण्णीने आजीकडे पाहिले. तिचा सुरकुतलेला चेहरा, थकलेले डोळे आणि मायेची नजर पाहून त्याचा स्वर शांत झाला.

" मी इथं राहणार आहे, आजी. "

त्याला वाटले होते, प्रश्नांची सरबत्ती होईल. पण ती फक्त एकच शब्द बोलली. " राहा. "

आजीला मिठी मारून रडावेसे वाटले.

आदल्या दिवसापासून थोरले मामा आपल्या बायकोच्या घरी गेले होते. केव्हाही परत येण्याची शक्यता होती ! घरात सर्वांना याच भीतीने ग्रासले होते.

मालूचे लक्ष कृष्णन कुट्टीकडे होते. थोरले मामा आल्यानंतर तोच हे सांगणार. तो मामाकडे जाऊ शकतो. ' मामांना सांगू नको ' म्हणून कोणी पपई तोडली की बातमी ताबडतोब बैठकीत पोचलीच.

थोड्या वेळाने अप्पुण्णी सावरला. त्याला आत्मविश्वास वाटू लागला. तो सहजासहजी घाबरणारा नव्हता. येऊ दे. मला बोलवून शिव्या देऊ दे. अशातशा पिटाळण्याने मी पळ काढणार नाही.

थोरले मामा अजून का आले नाहीत ?

शेवटी थोरले मामा आले. ते संध्याकाळी आले. बरोबर अम्मिणी ताई होती. थोड्याच वेळाने अप्पुण्णी आल्याचे कळले.

पुढच्या अंगणातून गर्जना झाली...

" कोण आहे रे तिकडं ? "

सर्वजण पुढच्या दाराकडे धावले. आजी, थोरली मावशी, मीनाक्षी मावशी.

तंकमताई, मालू, सर्वजण.

" माझी आज्ञा मोडण्याचं धाडस कुणी केलंय ? "

कोणीही उत्तर दिले नाही.

" कुठं आहे तो ? "

मग अप्पुण्णी हळूच पुढे आला. त्याचे शरीर कापत होते.

त्याला पाहताच खडावा काढून थोरले मामा न्हरांड्यात धावले. "तुला मी...'

थोरले मामा आणि अप्पुण्णी यांच्या मध्ये उभी राहून आजी किंचाळली, " कुंजिकृष्णन ! "

" दूर हो वाटेतून. मी आता लाथ मारून याची आतडी..."

आजीला धक्का मारून ते त्याच्याजवळ पोचेपर्यंत त्याने सगळे धैर्य गोळा करून म्हटले, " मला शिवू नका. "

" काय होईल शिवलो..."

त्याच्या गालावर एका जाडजूड पंजाची सणसणित थप्पड बसली. थोरल्या मामांनी पुन्हा हात उगारताच दक्षिण भागातून उंच स्वरात एक आवाज आला, " त्या मुलाला मारू नका. "

थोरले मामा वळले, आश्चर्यचकित आणि कोपाविष्ट नजरेने पाहिले, भाचा आहे. कुट्टनमामाने पुढे येऊन म्हटले, " मी सांगतो त्या मुलाला मारू नका. "

थोरल्या मामांचा हात खाली आला.

" मला हुकूम करणारा तू कोण ? "

" कुणीही असेन, पण मी सांगतोय, त्याला मारू नका. जर मारलंच, तर..."

थोरले मामा भाच्याकडे वळून थुंकले आणि म्हणाले, " तू कधीपासून एवढा मोठा झालास ? "

" तुम्ही म्हातारे झालात, वगैरे विचार मी करणार नाही. "

थोरले मामा फणा उभारून उभे होते. आता त्यांची मान खाली होती.

थोरली मावशी, मीनाक्षी मावशी आणि तंकमताई यांनी एकमेकींकडे पाहिले.

मामा काही वेळ विचार करीत उभे राहिले. मग अंगणात उतरून म्हणाले, "या तखाट्यात[१] यापूर्वी कधी असं झालं नव्हतं. "

---

१. घराणे

आपल्याशीच बडबडत मामा बैठकीकडे निघून गेले.

संध्याकाळी तो पूर्वेकडच्या व्हरांड्यात जाऊन बसला. पुढच्या बाजूला ठेवलेल य मोठ्या दिव्याचा प्रकाश तिथे पोचत नाही.

एकटाच बसून तो त्या दिवशीच्या घटनांवर विचार करू लागला. एक दिवस एक वर्षाइतका वाटला.

धूसर प्रकाशात एक सावली जवळ आली.

" अप्पुण्णी ! "

त्याने ओळखले. अम्मिणीताई ! त्याने आपल्या गालावर हात फिरवला. अजून दुखत आहे.

" अप्पुण्णी, फार लागलं का रे ? "

त्याचे बिनसले. ' मोठी कुशल विचारायला आलीय. '

" अप्पुण्णी बोलत का नाहीस ? "

तेवढ्यात आतून मोठ्या मावशीची हाक आली, " अम्मिणी "

अम्मिणी ताई चटकन आत पळाली.

कुट्टनमामा, भास्कर, कृष्णन कुट्टी आणि मावसोवा यांची पाने घेतली तेव्हा मालूने त्यालाही जेवायला बोलवले.

मधल्या खोलीत केळीच्या चार मोठ्या पानांजवळ एक पानाचा तुकडा मांडलाय. तो त्याच्यासाठी आहे.

उत्तर भागातल्या एका खोलीतून वर जायला जिना आहे. त्या जिन्याच्या खोलीत त्याला झोपायला चटई मिळाली

घर अंधारात बुडले. सगळीकडे स्तब्धता पसरली. त्या खोलीत एकट्याला झोपायला भीती वाटली. मेलेल्या पूर्वजांची भुते अंधारात नाचताहेत का ? पूजेच्या खोलीतून देवीच्या घुंगुरांचा आणि मेखलेचा आवाज येतोय का ?

विचार करून करून दमला तेव्हा त्याचे डोळे नकळत मिटले.

सकाळी भास्कर आणि कृष्णन कुट्टी पेज प्यायला बसले तेव्हा आजीने त्यालाही बोलावले. एका पायतुटक्या पाटावर तो थाळीसमोर घेऊन बसला.

अप्पुण्णी शाळेत जायला आधीच निघाला. गाडीने जाणाऱ्यांची वाट त्याने पाहिली नाही. जाताना आजीच्या खोलीच्या दाराशी जाऊन म्हणाला, " आजी, शाळेत जातो ग. "

फाटकाशी पोचल्यावर वाटले, बागेतल्या छोट्या रस्त्याने नाला ओलांडून गेलो

तर यज्ञेश्वराच्या देवळाशी लवकर पोचेन. तो रस्ता जवळचा आहे.

संध्याकाळी शाळेतून परतला तेव्हा थोरले मामा अंगणात येरझारा घालीत होते. त्याला पाहिले, पण न पाहिल्यासारखे करून पश्चिमेकडील मैदानाकडे बघत राहिले.

दक्षिणी भागात शिरताना त्याला थोरल्या मामांचे शब्द ऐकू आले, " या घराण्याचा नाश होणार आहे. शिवाशिवीचा काही विचार राहिला नाही. "

पूजेच्या खोलीत देवीची उग्र मूर्ती आहे.

त्या दिवशी मीनाक्षी मावशीने समजावून सांगितले, " शाळेतून येताना उत्तर भागातून यायचं. स्नान केल्याशिवाय पूजेच्या खोलीसमोर जायचं नाही. "

भास्कर आणि कृष्णन कुट्टी रात्री आपल्या खोलीत बसून अभ्यास करतात. फक्त जेवायला खाली उतरतात. त्याने दक्षिण भागाच्या दारात ठेवलेल्या दिव्यासमोर पडल्यापडल्या पुस्तक उघडले, पण पुस्तकात लक्ष लागेना.

कोण कोण काय काय म्हणताहेत ?

सकाळी धान्याचे मोठे पिंप उघडून मोजून धान्य काढण्याचा दिवस होता. घरात वापरण्यासाठी आठवड्यातून एकदा मापून धान्य काढले जाते. नेहमीप्रमाणे मीनाक्षी मावशी टोपली घेऊन धान्याच्या पिंपाकडे गेली तेव्हा थोरले मामा म्हणाले, " इथं बड्या बाता करायला एक माणूस आहेच. तोच धान्यसुद्धा देईल. " मीनाक्षी मावशी बुचकळ्यात पडली. थोरले मामा पुन्हा गरजले,

" एक दाणासुद्धा देणार नाही. तुम्हा सर्वांना धडा शिकवणार आहे. "

आत थोरल्या मावशीने रडायला सुरुवात केली.

कुट्टनमामा आला तेव्हा त्याला हे प्रकरण कळले. मालूनेच वडिलांना सांगितले. कुट्टनमामा सरळ बैठकीच्या खोलीकडे जाऊ लागला, तेव्हा आजीने त्याला अडवले. कुट्टनमामा म्हणाला,

" आजपावेतो मी काही बोललो नाही, आता पाहू दे माझा इथं काही अधिकार आहे की नाही ते. "

बैठकीत भांडण झाले.

" धान्याचं पिंप उघडणार नाही. मला हुकूम देणारा तू कोण ? "

मालू, मोठी मावशी, तंकमताई सर्वजण बाहेर व्हरांड्यात येऊन ऐकायला लागले.

" मी – मीपण या घराचं एक अंग आहे. रात्रंदिवस घाम गाळून आणि रक्त आटवून हे धान्य जमा झालंय. "

नंतर मामीच्या घरच्या लोकांसंबंधी त्याने काहीतरी सांगितले.

थोरल्या मामाने धान्याचे कोठार उघडले नाही.

कुट्टन मामाने कोठाराच्या खालच्या बाजूला बियाण्यासाठी जतन करून ठेवलेले धान्य मापून दिले. मीनाक्षी मावशी ते धान्य घेऊन जायला कचरत होती, म्हणून तो रागावून किंचाळला, " हे धान्य घेऊन जा म्हणून सांगतोय ना मी. "

बियाण्यांचे धान्य तिने मालूच्या मदतीने आत नेले.

बियाण्यांचे धान्य खायची वेळ आली, याचे आजीला फार वाईट वाटले.

कुट्टनमामाने आजीला सांगितले, " एकतर या सर्वांची व्यवस्था हवी, नाहीतर मला माझा वाटा मिळायला हवा. मी निश्चय केलाय. "

हा प्रसंग कधी ना कधी येणार हे कुट्टन नायर जाणून होता. पण तो इतका लवकर येईल असे वाटले नव्हते.

पंधरा सोळा वर्षांचा असल्यापासून तो शेतात काम करीत होता. शेतात खपता खपता त्याने विशी ओलांडली होती. तरीही आज त्याला कमरेला गुंडाळायला एखादी चांगलीशी लुंगी नाही. बाहेर एखादा कप चहा प्यावासा वाटला, तर तेवढे-सुद्धा पैसे नाहीत. शेतावरच्या मजुरांना वर्षाकाठी चार लुंग्या, दोन टॉवेल आणि पाच परा[1] धान्य मिळते. ओणम, विषू, तिरुवादिरा या सणांच्या निमित्ताने कोरी लुंगी, धान्य, नारळ, तेल, भाजी वगैरे मिळते.[2] त्या शेतमजुरांची स्थिती त्याच्यापेक्षा बरी.

रागाच्या भरात कुट्टन नायर जोरात उंबरठ्यावर थुंकला. मालूचा विचार करू लागला, की त्याला फार वाईट वाटते ... दोन-तीन वर्षांनी ती जाणती होईल. तिच्या गळ्यात किंवा कानात घालायला सोन्याचा तुकडासुद्धा नाही. घरात मोल-करणीसारखे काम करीत असते. सकाळ-संध्याकाळ तिला पाण्याच्या जड कळश्या भरून नेताना तो पाहतो. ती इथे राहते, हेसुद्धा ताईला पसंत नाही.

मामाची मुलगीसुद्धा इथेच राहते की. बैठकीच्या खोलीतून खाली उतरतदेखील नाही. ताईचीसुद्धा एक लाडकी मुलगी आहेच. इकडचे पान तिकडे करणे तिला ठाऊक नाही. काम करायला फक्त मीनाक्षी आणि मालू.

---

१. धान्य वगैरे मापण्याचे सुमारे दहा शेरांचे माप.

२. या वस्तू देण्याच्या प्रथेला ' अलव् ' म्हणतात. एखाद्या कुटुंबाकडून एखादा मजूर ' अलव् ' घेऊ लागला की तो त्याच घराण्याचा ताबेदार होतो, दुसऱ्या कुटुंबाकडे काम करायला तो जाऊ शकत नाही. त्याच घराण्याच्या जमिनीत झोपडी करून आपल्या कुटुंबासह राहतो.

हे सगळे उघडचा डोळयांनी पाहत असूनही सहन करीत राहिला. पण शेवटी त्या दिवशी स्फोट झाला. त्याला अप्पुण्णी आल्याचे माहीत नव्हते.

त्याला अप्पुण्णीबद्दल प्रेम नाही की तिरस्कारही नाही. त्याला बाहेर काढले होते तेव्हा त्याला जरा वाईट वाटले होते. लहानगा पोर तर होता तो आणि वटक्केप्पाट्टच्याच रक्ताचा होता. आपले सुखदु:ख ऐकाय. सांगायला कुणी नसेल तर ...

पुन्हा मालूची आठवण झाली. माणसाच्या आयुष्याचे काय सांगावे. आज आपले डोळे मिटले, तर मालूवरही तसाच प्रसंग येईल. तो तिला घरातून हाकलून देईल. तिचा तर या घरात काही हक्कसुद्धा नाही

एके दिवशी संध्याकाळी घरी आला, तर ते दृश्य दिसले. वाटले, आता त्या पोराचे नखसुद्धा वाचणार नाही. आतापर्यंत दाबून ठेवलेला आवाज मग गरजला.

कुट्टन नायरला वाटले, 'संघर्षाला आता नुसती सुरुवात झाली. आता धान्य द्यायचं नाकारतोय. धान्याच्या कोठाराला कुलूप लावून किल्ली कनवटीला अडकवलीय त्याला कळलं की धान्य विकलं जातंय. पहा, घरात खाण्यासाठी साठवलेलं धान्य विकून तर पहा ...'

'वटक्केप्पाट्टवर एकाच व्यक्तीचा अधिकार नाही.'

# पाच

चारपाच दिवस झाले, पाऊस पडत आहे. वारा नाही, ढगांचा गडगडाट नाही. संततधारही नाही. आकाशात एक ढग येतो आणि मुसळधार पाऊस पडतो. तो थांबला की पुन्हा आकाश काळं होऊ लागतं.

अंगणात पाणी साचलंय. त्यात थेंब पडले की बुडबुडे उठतात आणि फुटतात. पारुक्कुट्टी बसल्याबसल्या हे पाहत आहे. इल्लममध्ये काम नाही. धाकट्या मालकिणीने सांगितले होते, पाऊस थांबला की धान्य काढीन

शेतावरून येणाऱ्या गार हवेत पाण्याचे कण आहेत. बाहेर सडकेवर चिखल पसरलाय. पारुक्कुट्टी डोळे फाडून लांब, खूपखूप लांब पाहत राहिली आणि विचार करीत राहिली. अप्पुण्णी आला नाही

तो येणार नाही का ? आता कधीच येणार नाही का ?

त्या दिवशी घरातून निघाला तेव्हा वाटले होते, राग शांत झाला की शाळेतून घरी येईल. संध्याकाळ झाली, तरी आला नाही तेव्हा कितीतरी लोकांना विचारले, पण कोणीही त्याला पाहिले नव्हते. रडत-स्फुंदत इकडेतिकडे धावाधाव केली. खूप लांब जिथे सुपारी फोडतात, जिथे दुकाने आहेत त्याच्याही पलीकडे खूप दूर गेली. कादरखांचा मुलगा अप्पुण्णीच्या वर्गात आहे असे कळले. तिथे विचारले तर कळेल. काळोख होऊ लागला होता. धापा टाकीत इतक्या दूर आली. तिथे विचारल्यावर कळले की, मुहम्मदने त्या दिवशी अप्पुण्णीला वर्गात पाहिले नाही. पारुक्कुट्टीने छातीवर हात मारला आणि रडू लागली, " माझ्या बाळा ... ! "

घरी परतली. दिवा लावला आणि फाटकातच वाट पाहत बसली.

शंकरन नायर आला तर शोधायला पाठवणार होती. पण शंकरन नायर त्या रस्त्याने येत नाही. त्या दिवसानंतर तो त्या घरातही आला नाही, आता तो कधीच येणार नाही. इल्लममध्येही कधी ती त्याच्यासमोर जात नाही.

आपले दुःख कुणाला सांगावे ? म्हातारीही झोपडीत नाही. दिवा जाळीत रात्रभर जागली. आता तो कधीच येणार नाही ?

रात्र कशी सरली कळले नाही.

दुसऱ्या दिवशी म्हातारी आली. तिच्याकडूनच कळले की अप्पुण्णी घरी गेला आहे. म्हातारीला चक्कम्माने सांगितले होते आणि चक्कम्माला सैतालिकुट्टीने.

अप्पुण्णी आता त्या कुटुंबात राहतो. तिथून तर त्याला शिव्या देऊन हाकलले होते. तो तिथे राहणे शक्य नाही !

पारुक्कुट्टी वाट पाहत राहिली. माझा बाळ येईल, नक्की येईल.

इल्लममध्ये कामाला गेली तेव्हा मालकिणीने विचारले—

" मुलगा आला का ग पारुक्कुट्टी ? "

" येईल. " एवढेच उत्तर तिने दिले. तिचा मुलगा रागावून गेला आहे हे लोकांना माहीत होते.

तिन्हीसांजा झाल्या की जास्तच विषण्ण वाटते. पाऊस असला की लवकर काळोख होतो. चारी बाजूंना पाणीच पाणी झाले. विनाकारणच मनात एक अनामिक भीती निर्माण झाली आहे. रात्री सोबतीला म्हातारी येऊन झोपते. ती चटईवर पडताच झोपी जाते. दार बंद करून पडले तरी झोप येत नाही. जरा कुठे चाहूल लागली की ती दचकून जागी होते. अप्पुण्णी रात्री काही येणार नाही. तरीही थोडीशी चाहूल लागली की ती कान लावून ऐकते.

' या अशा पावसात तो शाळेत जातो की नाही ? नदी तर दुथडी वाहतेय असं ऐकलंय. ' अमीना बीबी सांगत होती की तीन दिवस झाले नाव पलीकडे जात नाही. बाजाराला जाऊन आल्यावर ती सांगत होती की आणखी दोन दिवस असाच पाऊस आला तर नक्कीच पूर येणार. नदीच्या काठाकाठानेच सडक जाते. नदीचे पाणी म्हणे सडकेला येऊन भिडले आहे. सांभाळून चालले नाही, तर किनारा ढासळायचा. हे देवा, त्याच रस्त्याने तो शाळेला जातो. अप्पुण्णी जपून चालेल ना ?

" देवी, रक्षा कर ग, माझ्या लेकराची. " पारुक्कुट्टीने साकडे घातले.

तांदूळ संपले. दुपारी अमीनबीबीकडून पावशेर तांदूळ घेतले होते, त्यातले मूठभर उरले. उद्या सकाळपर्यंत तेवढ्यावर भागेल, त्यानंतर ?

हा पाऊस थांबेल असे वाटत नाही. पाऊस सुरू झाला, तेव्हापासून म्हातारी पारुक्कुट्टीच्या घरात आहे. अंगावर कांबळे ओढून पाय दुमडून बसली आहे. मधून मधून पावसाला शिव्याही देते.

या वर्षी अतोनात वृष्टी होणार. हा मुसळधार पाऊसच सांगतोय. थंडगार वारे वाहताहेत. अंग कापू लागले की, म्हातारी तक्रार करणार, " काय मेला हा पाऊस. सगळा नाश होणार आहे. कलियुग ग बाई कलियुग. पारुक्कुट्टी, कलियुगात प्रलय होणार याची लक्षणं आहेत हो ही. "

टोपीवाली छत्री घेऊन अमीना बीबी घराच्या मागच्या बाजूने समोर आली.

" पारुक्कुट्टी अम्मा, काही ऐकलं का ? "

" पावसाच्या आवाजात काही ऐकू येत नाही. "

" पूमान नाल्यापर्यंत पाणी आलंय. देवा रे, काय प्रसंग येणार आहे, कुणास ठाऊक ! "

म्हातारी म्हणाली, " इथं येऊन बसा बीबी. "

छत्री तिरकी धरून, काठावरच्या पाण्यातून स्वतःला सावरत बीबी व्हरांड्यात येऊन उभी राहिली.

" नव्व्याण्णवातला पूर आठवतो ? "

" मला आठवतं ना, आम्ही संतालिकाकांच्या घरात आश्रयाला गेलो होतो. या अल्ला, त्याच दिवशी आमचं जुनं फणसाचं झाड घरावर पडलं. "

त्या पुराच्या कितीतरी आठवणी म्हातारीच्या पोतडीत आहेत. त्याच दिवशी तिच्या झोपडीत पाणी आलं होतं. म्हातारीचं वासरू पाण्यात वाहून गेलं होतं. एक बाई पुरापासून वाचण्यासाठी फणसाच्या झाडावर चढून बसली होती. म्हातारी अशाच गोष्टी सांगत बसली होती.

वटक्केप्पाट्टची जमीन पाण्याखाली गेली होती. सापाच्या पिल्लासारखे पाणी धावत आले होते आणि लवकरच उतरलेही होते.

पारुक्कुट्टीला धूसर स्वप्नासारखी त्या पुराची आठवण आहे. पुरापासून वाचण्यासाठी कितीतरी लोक आपले घरदार सोडून त्यांच्या घरी आले होते. शेताजवळ असूनही त्यांचे घर उंचीवर होते. तिथपर्यंत पाणी चढले नव्हते. लोक व्हरांड्यात आणि खळ्यात दोन-तीन दिवस अन्न शिजवून राहिले. गोठ्याच्या व्हरांड्यात हरिजन होते. तिसऱ्या दिवशी संध्याकाळी पाणी उतरू लागले.

म्हातारी पुराच्या गोष्टी अमीना बीबीला अशा थाटात सांगत होती की जणू ते सगळे तिने स्वतःच पाहिले होते. एक हत्ती कसा पुरात वाहून गेला आणि मग एका मुसलमानाने कण्णूर पुलापाशी दोरखंड टाकून त्याला कसे वाचवले. कुणाला वाहत आलेली तिजोरी मिळाली, तर कुणाला भांडे. पुरात सापडलेल्या घरांमध्ये माणसे

जेव्हा परत गेली, तेव्हा चुलींवर आणि खांबांवर फणा उभारलेले साप वळवळत असलेले दिसले. अमीना बीवी आ वासून अशा गोष्टी ऐकत बसली.

या सबंध प्रदेशातले लोक घाबरून गेले आहेत. काही लोक खरोखर पूर येतोय की नाही हे पहायला नदीच्या काठावरच उभे आहेत. श्रावणात आणि कार्तिकात बहुधा नदी भरते. परंतु तिचे पात्र कधीच रौद्र रूप धारण करीत नसे. गुदस्ता पूमान नाला भरण्यापर्यंत पाणी चढले होते. मग पाणी उतरू लागले आणि ऊन पडले.

शेतांमध्ये पिके पिकली आहेत. सडक तुटली, तर शेते पाण्यात बुडून जातील. आता पाणी लवकर उतरले तरी भाद्रपदात पिके कापण्याच्या वेळेपर्यंत धान्य नीट पिकलेले नसेल. नदीजवळच्या शेतांमध्ये माती भरणार. माती खणून बाहेर काढायला शेत खरेदी करण्याइतकाच पैसा लागणार.

सडकेवर आणि दुकानात लोक भयभीत होऊन बसले आहेत.

दुपारी पावसाचा जोर कमी झाला. आकाशात प्रकाशाची रेषा दिसली. लोकांनी जरा निःश्वास सोडला. दोन दिवस पाऊस आला नाही आणि ऊन पडले तर वाचणार.

पण संध्याकाळी पुन्हा ढगांचा गडगडाट सुरू झाला. थेंब थेंब पडू लागले. त्याबरोबर जोराचा वाराही वाहू लागला.

म्हातारी आडवी झाली आणि स्वतःला धीर देऊ लागली.

" वारा आला, तर बरे. ढग विखुरतील. जोराचा पाऊस येणार नाही."

पण पारुक्कुट्टीला या गोष्टींची चिंता नव्हती.

अप्पुण्णी कुठं झोपत असेल ? देवा, ढग गडगडत असतील, सोसाट्याचा वारा वाहत असेल आणि तो व्हरांड्यात बसला असेल.

पुन्हा ढग गर्जू लागले, जणू रानटी मांजरांचा गुरगुराट चालला होता. शेवटी डोळे दिपवणारा विजेचा लखलखाट सुरू झाला. ढगांचा गडगडाट जोरात सुरू झाला.

" नारायण ... नारायण ..." म्हातारी जप करू लागली. पारुक्कुट्टीने खिडकीवर टांगलेली चटई खाली काढली आणि खिडकी बंद केली.

जोरात पाऊस पडू लागला. जणू पाऊस आणि वारा यांच्यांत चढाओढ लागली होती. छपरावर थेंबांचा होणारा आवाज वाढत गेला.

खिडकीच्या फटीतून पाहिले तर बाहेर नुसता काळोखाचा समुद्र दिसतोय. ढगांचा गडगडाट, पावसाची रपरप आणि केळयांच्या पानांमधून येणारा वादळाचा सूं सूं आवाज ऐकून पारुक्कुट्टीचे हृदय जोराने धडधडू लागले. खिडकीच्या फटीतून बाहेरच्या काळोखात समुद्र पाहताना अचानक वीज लखलखली. काळरात्रीच्या

पहारेकऱ्यांसारखी उभी असलेली झाडांची काळी रूपे क्षणभर उजळून निघाली. पुन्हा काळोख, डोळ्यांच्या तळापर्यंत काळोख ...

" सोसाट्याचा वारा वाहतोय, यंदा वादळाची लक्षणं दिसताहेत." डोळे न उघडता म्हातारी म्हणाली.

पारुक्कुट्टीने चिमणी लावली आणि वाऱ्यापासून ज्योत वाचवून उशाशी ठेवली. म्हातारी डोळे मिटून उताणी पडून भराभरा देवाच्या नावांचा जप करू लागली.

बागेत नारळाच्या झावळ्या पडल्याचा आवाज झाला. थोड्या वेळाने अंगणातले पपयांचे झाड मुळातून उखडून केळ्यांमध्ये पडल्याचा आवाज झाला.

म्हातारीने डोळे उघडले. तिच्या नजरेत भीती होती.

" पारुक्कुट्टी, आपण छपराखाली चिरडून जाणार का ग ? "

" भिऊ नका आजी. "

" नारायण, नारायण, नारायण ... "

खिडकीच्या फटीतून जोरात वारा आला आणि चिमणी विझली. म्हातारी आणखी जोरात जप करू लागली.

बाहेर निसर्गाच्या थयथयाटाशिवाय आणखी एक वेगळा आवाज ऐकू येतोय असे पारुक्कुट्टीला वाटले. आवाज ! तिने कान टवकारले. हो, कुणीतरी बोलावीत आहे. मोठ्या प्रयत्नाने तिने पुन्हा चिमणी लावली. म्हातारीला म्हटले, " बाहेर कुणीतरी हाका मारतंय, आजी. "

म्हातारीने डोळे उघडले, पण ती जप करीत तशीच पडून राहिली. बाहेरच्या सूं सूं करणाऱ्या वादळापेक्षा पारुक्कुट्टीला तिच्या या जपाचेच जास्त भय वाटत होते.

भीत भीत पारुक्कुट्टीने दार उघडले. टोपीवाली छत्री आणि कंदील घेऊन भिज-लेल्या मांजरीसारखी अमीना बीबी बाहेर उभी होती.

" पारुक्कुट्टी अम्मा, संकट आलंय हो. "

" काय झालं बीबी ? "

अमीना बीबीच्या अंगावरून पाण्याचे थेंब व्हरांड्यात निथळताहेत. ती धापा टाकते आहे, रडते आहे.

" आता ' हे ' आले होते ते सांगत होते, आता लवकरच सडक फुटणार, घर लवकर रिकामं करायचंय. "

" कुठं जाणार ? "

" कुठंही टेकाडावर कुणाच्या तरी झोपडीत आश्रय घेऊ. माझी मुलं सामान-

सुमान बांधताहेत. बकऱ्या आणि कोंबड्यांचं काय करावं, कळत नाही."

पारुक्कुट्टीला निश्चल उभी असलेले पाहुन अमीना बीबी घाबरून म्हणाली, "घाई करा, अम्मा, उशीर केला, तर काय होईल, अल्ला जाणे."

"बीबी, मी इथून कुठंही जाणार नाही."

"वेड लागलं की काय तुम्हांला? घाई करा, कुंडंगलच्या पुरुषांनी स्त्रियांना आणि मुलांना सुरक्षित ठिकाणी पोचवलंय आणि आता गायीवासरांना घ्यायला चाललेत."

कुंपणापलीकडे कंदिलांच्या धूसर प्रकाशात पावसात भिजलेली माणसं सामान-सुमान घेऊन चाललेली दिसत होती.

"पारुक्कुट्टी अम्मा, अशा उभ्या काय राहिलात?"

"बीबी, मला जायला कुठंही जागा नाही. तुम्ही जा."

अमीना बीबी बधिर झाल्यासारखी उभी राहिली.

"या अल्ला, काय ऐकतेय मी?"

"मी येत नाही बीबी, तुम्ही जा."

कुंपणाजवळ उभ्या असलेल्या अमीनाच्या मोठ्या मुलाने हाक मारली, "लवकर चल, आई."

"पारुक्कुट्टी अम्मा."

"बीबी, तुम्ही जा म्हातारीलाही सोबत घेऊन जा."

म्हातारी कांबळं पांघरून वाकून चालत व्हरांड्यात आली.

"माझा पानाचा डबा झोपडीत राहून गेलाय, बीबी."

अमीना बीबीला राग आला.

"गप्प बसा, आजी. इथं लोकांचे प्राण चाललेत आणि तुम्हांला आपल्या पानाच्या डब्याचं सुचतंय ..."

वादळाच्या सूंसूं पेक्षाही उंच स्वरात अमीना बीबीच्या नवऱ्याने पलीकडून पुकारले, "बीबी, तू चल पाहू."

"माझी बाय, इथं तुझ्याबरोबर कोण राहील?"

"देव आहे माझ्या सोबतीला, बीबी, तुम्ही जा."

"हे अल्ला ..." बीबी एवढंच बोलू शकली.

अमीना आणि म्हातारी टोपीवाल्या छत्रीखाली उभ्या राहिल्या. पावसाचे थेंब पडल्यामुळे कंदिलाची काच तडकली. आत पाणी गेले असावे, त्यामुळे ज्योतही

विझली. अमीना द्विधा अवस्थेत उभी राहिली, तेवढ्यात पारुक्कुट्टी म्हणाली, " काळजी करू नका बीबी. जगलो–वाचलो तर भेटू पुन्हा. "

काळोखात दोघींनी आपापले डोळे पुसले. पण ते कुणालाच दिसले नाही. त्या दोघींच्या आकृती अंधारात मिसळून जाईपर्यंत पारुक्कुट्टी व्हरांड्यात उभी राहिली. मग आत येऊन तिने दार बंद केले.

आता वेदना आणि भीती उरली नव्हती. तिचे मन सुन्न, बधिर झाले होते. आता काय वाट्टेल ते झाले तरी त्याचा तिच्यावर काही परिणाम होणार नव्हता.

सारे गाव पाण्याखाली बुडाले. वाहत आलेल्या एका फळीला धरून ती बसली आहे. हात सुटला की सगळे संपलेच ... बोटे बधिर होऊ लागली ... भोवऱ्यात फळी गरगरा फिरू लागली आणि हात सुटला. ती खोल गर्तेत बुडू लागली ... अयाई ... ती दचकून उठली. मग उमजले, ते स्वप्न होते.

चटईवर उठून बसली. शरीर अजूनही कापत होते.

दार उघडून बाहेर येऊन पाहिले आणि चक्कर येऊ लागली. पुराचे पाणी आणखी वर चढले. चहूकडे पाणीच पाणी. सभोवार पाण्याशिवाय दुसरे काहीही दिसत नाही. तिला वाटले, ' आपण एका द्वीपावर उभ्या आहोत, या द्वीपाच्या चारी बाजूंना समुद्रच समुद्र अथांग पसरलाय आणि दूरपर्यंत कुठंही किनारा दिसत नाही. काल जे शेत हिरवंगार दिसत होतं ते आज पाण्यानं भरलं आहे. अंगण पार करून पाणी फाटकापर्यंत आलं. काल जिथं पिकलेली धान्याची शेतं होती, तिथं आज नावा चालताहेत. '

आसपासची सगळी घरे ओस पडली. कुणाचाही आवाज येत नाही. कुठेही धूर निघत नाही. दूर पाणी भरलेल्या शेतांमध्ये चाललेल्या होडक्यांमध्ये जे पांढरे ठिपके दिसत आहेत, ती माणसे आहेत.

पाऊस अजून थांबला नाही. रात्री सूं सूं करणारा वादळी वारा आता झोपी गेला असावा. केळीच्या बागेतली सर्व झाडे आडवी झाली आहेत. कुंपणाजवळचे सर्व बांबू आडवे-तिडवे झाले आहेत. दुरून सोसाट्याच्या वाऱ्याबरोबर वाहत आलेल्या आंब्याच्या डहाळ्या अंगणातल्या चिखलात पसरल्या आहेत. म्हातारीच्या झोपडीच्या छपरावर तीन चार झावळ्या उरल्या आहेत.

पावसाचा जोर वाढणार असे दिसत आहे ...

इथून ओरडले तरी कुणाला ऐकू जाणार आहे ? पण पारुक्कुट्टीला भीती वाटत नाही. ती एक शांत वेदना अनुभवीत आहे. असाच अंत होईल असे वाटते.

काल उरलेले मूठभर तांदूळ खोलीत द्रोणात पडले आहेत, पण चूल पेटवून पेज करावी असे तिला वाटत नाही. खूप खूप दूर पसरलेल्या त्या पाण्याकडे टक लावून पाहत ती ओल्या फरशीवर उभी राहिली.

अमीना बीबीच्या बागेत पाणी भरलं आहे. फाटकाशी असलेला बांध फुटण्याचा अवकाश, की अंगणातही पाणी भरणार.

दुरून कुठून तरी एका बकरीचे रडणे ऐकू आले. करुण स्वर ! आपला मृत्यू जवळ आलाय हे त्या मुक्या जनावरालाही कळले आहे.

दूर नावा चालल्यात !

एका कोकराचे रडणे ...

बें- बेंच आहे ना ? की कुणा मुलाने ' माँ ' म्हणून साद घातलीय ?

दुपारी नावांची ये-जा बंद झाली. आता कसलाच आवाज येत नाही. चहूकडे भयानक स्तब्धता पसरली. आता बकरीचा आवाज किंवा मुलाचे रडणे ऐकू येत नाही. ही मृत्युगृहाची तर शांतता नाही ? मृत्यूची वाट पाहत असलेल्या खोलीची शांतता.

बाहेर काहीतरी तुटल्याचा आवाज झाला, फाटकाचा बांध फुटला होता. बांधाला पडलेल्या भगदाडामधून गढूळ पाणी भुकेल्या सापासारखे सुसाट वेगाने अंगणात आले. पाहता पाहता बागेत आणि अंगणात पाणी भरून गेले. पायऱ्यांपर्यंत आले.

आता अंत समीप आला याची तिला खात्री पटली

आत जाऊन बसली. बाहेर पाहण्याचे धैर्य होत नव्हते. पाणी वरवर चढत असणार. काही क्षणातच ...

संध्याकाळी काहीतरी तुटल्याचा – पडल्याचा आवाज आला, दक्षिणेकडून. खिडकीच्या फटीतून पाहिले. म्हातारीची झोपडी मोडून पडली होती.

काळोख होऊ लागला आणि पाणी वर चढायचे थांबले. पाऊस – वाऱ्याचा मुळीच आवाज होत नव्हता. ओले काळे आभाळ ! मधूनमधून भिंतीवर आपटणाऱ्या पाण्याचा आवाज येतोय ...

तिचे मन रात्रीसारखे अंधकारमय आणि सुन्न झाले.

बाहेर भिंतींवर आपटणाऱ्या पाण्याचा आवाज स्पष्ट ऐकू येऊ लागला. जवळ-जवळ येणाऱ्या पावलाची चाहूल लागावी, तसा ...

तिला कसलाही विचार करावासा वाटत नाही. जो मार्ग निश्चित करून आली

आहे, त्या मार्गावर मनावरचा ताबा सुटून दृष्टी जाते ... काही रूपे, काही चित्रे मधूनमधून दिसू लागतात आणि पुन्हा अदृश्य होतात. एक नालुकेट्टू, एक अंगण – ज्यावर उंचउंच खांब पहारा करताहेत, मध्ये केळीची बाग. पान खाऊन लाल झालेले ओठ आणि रुंद छाती असलेल्या एका पुरुषाचे रूप. काळ्याभोर ढगांनी खच्चून भरलेल्या आभाळाखाली, कुणाच्या तरी घामाने थबथबलेल्या खांद्यांवर पडून पुढे जाणारी एक युवती. कुरळे केस आणि स्पष्ट दिसणाऱ्या निळ्या शिरा असलेला एक चेहरा. हे सगळे काही आता दूर दूर चालले आहे. ...

उद्या कदाचित तिचे प्रेत वाहत जाणार असेल. पाणी उतरले की ते प्रेत केवड्याच्या किंवा दुसऱ्या एखाद्या काटेरी झुडपात अडकेल. कदाचित कुणालाही ओळखसुद्धा पटणारा नाही. तिथून ते प्रेत काढून न्यायलाही कदाचित कुणी येणार नाही.

त्याला एकदा पाहून घ्यायचे होते. दुःख सहन करताना कधीही तिचा धीर सुटला नव्हता. त्याला कधी कसले दुःख होऊ नये, एवढीच इच्छा होती ... तिने इल्लमची दासी होऊन राहायला नको होते.

अप्पुण्णी सुखात राहो. तिने पुन्हा प्रार्थना केली, " देवी, त्याचं कल्याण कर. "

तक्क्यावर तोंड दाबून ती चटईवर पालथी पडली. असेच झोपून गेले तर काही कळणारसुद्धा नाही. गार हातासारखा पाण्याचा स्पर्श अंगाला होण्यापूर्वी झोपून जायला हवे. कदाचित झोपतानाच भिजलेल्या भिंती तिच्या अंगावर कोसळतील आणि मग काही क्षणातच ...

लहानपणी झोप येत नसली की आई देवाच्या नावाचा जप करायला सांगायची.

डोळे मिटून पडल्या पडल्या तिनं जप सुरू केला.

नमो शिवाय, नमो शिवाय ...

भिंती भिजल्या आहेत ... गार हातासारखा स्पर्श असलेले पाणी हळूहळू जवळ येत आहे. ...

नमो शिवाय ... नमो शिवाय ...

गात्रे शिथिल पडताहेत असे वाटले. मिटलेल्या डोळ्यांमध्ये रंगीबेरंगी ग्रह प्रकाशमान होत आहेत. ती खोल गर्तेत कोसळत आहे ... तेवढ्यात 'पारुक्कुट्टी अम्मा ! ' असा आवाज ऐकू आला.

शरीर आणि मन थरथरू लागले. माणसाचा आवाज. डोळे उघडत नाहीत. शरीर भिजलेल्या चिंधीसारखे झाले आहे.

" पारुक्कुट्टी अम्मा ... ! "

खूप प्रयत्न करून डोळे उघडले. सावकाश उठली. सगळे शरीर वाऱ्याने उडा-लेल्या पानासारखे कापत आहे. बोलू शकत नाही ... चिमणी कुठे ठेवली, आठवत नाही. तशाच बेभान अवस्थेत दाराकडे गेली थरथरणाऱ्या हातांनी दाराची कडी काढली. कुणी तरी उभे आहे. बाहेर आणि डोळ्यांत काळोख आहे.

"अयाईग...!"

"भिऊ नका, मी शंकरन नायर आहे."

पाय कापू लागले. झाडाचे शेवटचे मूळ तुटावे तशी ती खाली कोसळली.

खाली नाही कोसळली. खाली पडण्याआधीच दोन दणकट हातांनी तिला साव-रून धरले.

"नाव आणली आहे. चला..."

काहीतरी बोलायचे आहे, पण बोलता येत नाही. गात्रे शिथिल होत आहेत.

"तुम्हांला आता सांभाळून नेतो हं."

तिला हातांवर उचलून तो पाण्यात उतरला.

पारुक्कुट्टीने डोळे उघडले तेव्हा तिला वाटले, आपण समुद्राच्या मधोमध आहोत. चहूकडे पाणीच पाणी. या पाण्याला ना आदी, ना अंत. कुठे पडली आहे कळायला थोडा वेळ लागला. नावेत होती ती. लाटा आणि भोवरे यांच्यामधून नाव पुढे काढ-ण्यासाठी तो सगळी शक्ती पणाला लावून वल्ही मारतोय. तिच्या चेहऱ्यावर घामाचे उष्ण बिंदू ठिबकले. तेव्हा कळले की आपण त्याच्या मांडीवर पडलो आहोत. तिल डोके वर करता आले असते, बसता आले असते, पण डोके वर न करता, डोळे मिटूनच तिने विचारले,

"कुठं चाललात ?"

"जिथं पाणी नसेल तिथं."

उंच झाडांच्या पारंब्यांपासून वाचण्यासाठी दुसऱ्या बाजूला जोरात वल्हे मारून धापा टाकीत त्याने उत्तर दिले...

# सहा

शाळेचा म्हातारा शिपाई कोमू वर्गात एक कागद घेऊन आला. रामनाथ अय्यर सरांचा इतिहासाचा तास चाललाय. सरांनी तो कागद वाचला, " वी. अप्पुण्णी ! मुख्याध्यापकांनी बोलावलंय. "

सर्व मुलांनी अप्पुण्णीकडे पाहिले. अप्पुण्णीने आपली भीती लपविण्याची शिकस्त केली. साधारणपणे काहीतरी गुन्हा केलेल्या मुलांनाच असे ऑफिसात बोलावतात. मग हातावर यथेच्छ छड्या मिळतात. क्षुल्लक अपराध असला, तर दम दिला जातो आणि टोक केलेली पेन्सिल हातावर गिरमिटासारखी फिरवली जाते. ही शिक्षा ज्यांनी भोगली आहे त्यांचे असे मत आहे की, बारा छड्यांपेक्षा ही शिक्षा भयानक असते.

' का बोलावलंय, कुणास ठाऊक. काहीही केलं नाही, काही नाही. भास्करनं काहीतरी कागाळी केली असेल ! '

अप्पुण्णी गेला. ऑफिसात शिरताना पाय कापत होते.

मुख्याध्यापकांनी विचारले, " काय, अभ्यास ठीक चाललाय ना ? "

" होय, सर. "

मग मुख्याध्यापकांनी सांगितले की त्याला शिष्यवृत्ती मिळणार आहे, महिन्याला सहा रुपये. सहामाही परीक्षेत पहिला क्रमांक पटकावणाऱ्याला ही शिष्यवृत्ती मिळते.

आता फी द्यावी लागणार नाही.

फीचे चार रुपये तेरा आणे कापून उरलेले एक रुपया तीन आणे त्याला मिळणार.

दरमहा त्याला त्याचे स्वतःचे असे एक रुपया तीन आणे मिळणार !

" इथं सही कर. "

रेव्हेन्यू स्टॅंपवर सही करून तो निघाला, तेव्हा मुख्याध्यापकांनी काही पैसे देऊन सांगितले, " मागच्या आठ महिन्यांची ही शिष्यवृत्ती. "

अठ्ठेचाळीस रुपये !

विश्वास बसेना. पैसे घेताना हात थरथरत होते. सत्तेचाळीस रुपये पंधरा आणे घेऊन बाहेर आला तेव्हा आपण कुणीतरी मोठे झालो आहोत असे त्याला वाटले.

मातुल घराण्यात आल्यापासून तो रोज पूजेच्या खोलीत देवीसमोर उभे राहून प्रार्थना करायचा. देवीची कृपा झाली.

देवी त्या घराण्यातल्या माणसांची आई आहे. पूजेच्या खोलीत तिचा वास आहे. आजी नेहमी सांगायची की जुन्या काळी एकदा देवीने त्या कुटुंबाला अन्न आणून दिले होते.

अर्थात ही जुन्या जमान्याची गोष्ट.

बऱ्याच वर्षांपूर्वीची घटना. त्या वेळी घरात एक स्त्री आणि सहा मुले होती. ती रोज गायीचे दूध काढून मंदिरात घेऊन जायची. मंदिरात जायला नदी पार करावी लागे. मंदिरातून जो नैवेद्य मिळायचा, तेवढ्यावर भागत होते.

एकदा कार्तिकात नदी भरली होती. नावा चालत नव्हत्या. ती दुधाचे भांडे घेऊन नदीच्या ऐल तीरावर खूप वेळ वाट पाहत थांबली. शेवटी हिरमुसली होऊन घरी परतली. मुलांना रात्री खायला घालायला काही नव्हते. अर्ध्या रात्री कुणीतरी पुढच्या दारातून साद घातली. दार उघडले, एक हात पुढे आणि एक मोठे भांडे भरून अन्न घरात आले.

" मुलांना उठवून जेवू घाल. "

रेशमी वस्त्र धारण केलेली एक मूर्ती दार उघडून पूजेच्या खोलीत जाताना दिसली. घुंगरांचा आवाजही आला. नंतर सगळे अदृश्य झाले.

ती देवी होती. या घटनेनंतरच या कुटुंबाची भरभराट झाली.

ती घटना ऐकल्यापासून त्याचा देवीवर आणि इतर देवांवर विश्वास बसला.

फी देण्याचा दिवस जवळ आला की त्याच्या छातीत धडधडू लागायचे. चार रुपये तेरा आणे कोण देणार ?

पण त्या दिवशी वर्गातल्या मुलांमध्ये तो मोठा झाला. खिशात सत्तेचाळीस रुपय पंधरा आणे आहेत. एवढे पैसे त्याने यापूर्वी कधीही पाहिले नव्हते.

घरी पोचला तेव्हा कळले की बातमी त्याच्या आधीच घरी पोचली होती. भास्करने सांगितले असणार.

त्या दिवशी थोरल्या मावशीला थोडा पुळका आला. भास्कर आणि इतर माणसे जेवायला बसली तेव्हा थोरल्या मावशीने त्यालाही बोलावले.

सत्तेचाळीस रुपये पंधरा आण्यांची एवढी किमत असेल हे त्याला ठाऊक नव्हत.

रात्री आजी म्हणाली, " हे पैसे वायफळ गोष्टीत खर्च करू नकोस. मी सांभाळून ठेवीन. "

त्यातल्या थोड्या पैशांतून दोन नवे शर्ट शिवून घेतले गेले. आजीने बकऱ्याचे डोके आणि मालिश करण्यासाठी तेल आणायला थोडे पैसे घेतले. नंतर कळले की उरलेले पसे कुट्टनमामाने आजीकडून उसने घेतले होते.

त्याचे त्याला काही वाटले नाही. त्याला वाटले आपण एकदम श्रीमंत झालो आहोत. कुट्टनमामा आपला देणेकरी आहे, आजीने आपल्या पैशाचा फायदा घेतलाय.

रोज सूप पिताना आजी म्हणते, " म्हातारपणात मला याची मदत झालीय. "

याच सुमाराला वाटणी करण्याच्या गोष्टी सतत बोलल्या जात होत्या.

बरेच दिवस वाटणीच्या गोष्टी चालल्या होत्या, पण अजून निर्णय झाला नव्हता.

वाटण्यांविषयी चर्चा व्हायला लागली तेव्हा थोरली मावशी म्हणाली, " माझा आणि माझ्या मुलांचा भाग वेगळा काढून द्या. "

मीनाक्षी मावशी आणि तिचा नवरा यांना काही मतच नाही. आजीला फार वाईट वाटतेय.

हेसुद्धा पाहण्याचा प्रसंग आला.

समोरच्या व्हरांड्यात गावातली पंचमंडळी एकत्र येऊन याविषयी चर्चा करतात तेव्हा आजी सांगते, " याच भरल्या घरात मरायची इच्छा आहे माझी. "

अप्पुण्णी नावाची कुणी एक व्यक्ती या घरात आहे ही गोष्टच मुळी थोरले मामा विसरले होते. ते त्याच्या दृष्टीला न पडण्याचा प्रयत्न करायचे. त्यांच्या दृष्टीला पडावे अशी त्याचीही इच्छा नव्हती.

त्याला नेहमी एकाच गोष्टीची चिंता वाटायची; घरात बरीच माणसे असूनसुद्धा तो एकटा आहे. कोणीही त्याला मोठ्याने हाक मारीत नाही. सकाळी पेज पिऊन शाळेत जातो आणि संध्याकाळी परत येतो. बागेतल्या तलावातच आंघोळ करतो. दक्षिण भागात अंगणाच्या टोकाला टांगून ठेवलेल्या विभूतीच्या पिशवीतून एक चिमूटभर विभूती घेऊन कपाळाला लावतो. पूजेच्या खोलीसमोर जाऊन हात जोडतो आणि तिथल्या दिव्याच्या प्रकाशात बसून वाचतो. त्याला कुणालाही काहीही विचारायचे नाही आणि काहीही सांगायचे नाही.

तो आपल्या घरी परत जाणार नाही हे थोरल्या मावशीला कळले तेव्हा तिला ती वस्तुस्थिती स्वीकारणे फार जड गेले. स्वतःशीच बडबडू लागली, " नाश होणार

आहे आता. हे घर म्हणजे कुणाही आल्यागेल्या गणागणपांची धर्मशाळा झालीय. "

त्याच्याशी कधीकधी बोलते ती मालू. ती बहुधा वायफळ चांभारचौकशी करीत बसते. तो अभ्यास करीत असला की जवळ येऊन त्याला पाहत बसते. अप्पुणीला हे आवडत नाही. दिवसभर घरात काय काय घडले याचा पाढा मालू संध्याकाळी त्याच्यापुढे वाचते. त्याला ती आवडत नाही, हे त्या काळ्या, अशक्त आणि निमूळत्या चेहऱ्याच्या मालूला ठाऊक नाही. ती भोळीभाबडी आहे, हे त्याला माहीत आहे. पण ती त्याच्यावर प्रेम करू लागली की त्याला राग येतो. स्वयंपाकघरात काही काम नसले की ती त्याच्याकडे येते.

" अप्पुण्णीदादा, काय करतोयस ? अप्पुण्णीदादा काय वाचतोयस ? "

तीसुद्धा या घरात एक मामुली व्यक्ती आहे.

तिला खूप काम असते. नेहमी मळकट परकर आणि झंपर घालून वावरते.

तंकम ताई आणि अम्मिणी ताईकडे रेशमी कपडे आहेत. त्या जवळून गेल्या की एक सुगंध जाणवतो – खास तयार केलेले तेल, अत्तर आणि केवड्याचे फूल यांचा सुगंध. पण मालू जवळून गेली की एक प्रकारचा दुर्गंध येतो.

अम्मिणी ताई क्वचितच आपल्या घरी जाते. गेलीच तर चार-पाच दिवसांत परत येते. थोरल्या मामांकडे कोणी ना कोणी मूल असायला हवे. पूर्वी देवकी ताई होती. तिचे लग्न झाले आणि ती सासरी निघून गेली. तिच्यानंतर अम्मिणी ताई आली. बरेच दिवस झाले, मामी इथे आली तरी जास्त दिवस राहत नाही. मागच्या तिरुवादिरापूर्वी आली आणि एक आठवडा राहून निघून गेली.

एकदा त्याने आपला शर्ट धुवून वाळत घातला होता. तो अंगात काहीही न घालता आत बसला होता. त्याला फक्त गंजिफ्रॉक घालून अंगणात फिरताना पाहून अम्मिणी ताई म्हणाली, " अप्पुण्णी गंजिफ्रॉकमध्ये जास्त छान दिसतो."

तिच्याशी बोलताना अप्पुण्णीला संकोच वाटतो. ती कधीकधी त्याच्याजवळ येते. त्या वेळी तो घाबराघुबरा होतो. तिला पाहतो तेव्हा तेव्हा तिचे प्रत्यक्ष रूप डोळ्यासमोर होते आणि दिव्याच्या प्रकाशात कमरेच्या वर विवस्त्र असलेल्या, हातात सुपारीचे फूल घेऊन डोलणाऱ्या नागकन्येचे तिचे रूप कल्पनेत साकार होते.

संध्याकाळी थोरले मामा फाटकाच्या बाजूला जातात. बैठकीच्या पश्चिमेकडील अंगणात अम्मिणी ताई केस मोकळे सोडून विचरीत उभी असते. तिला नकळत तिला तसी पाहत राहताना खूप आनंद होतो. ती हलली की, निळ्या रेशमी पोलक्याखाली उघड्या भागातले केतकी वर्णाचे पोट दिसते. अर्धवट मिटलेले डोळे दूर कुठेतरी

पाहत असतात. लाल बांगड्यांची किणकिण होते. पूर्वीपेक्षा ती आता किंचित स्थूल झाली आहे.

ती समोर आली की तिच्या चेहऱ्याकडे पाहणे कठीण होऊन बसते. तिच्याकडे नेहमी तिरस्काराने, सूड घेण्याच्या इच्छेने पहावे असे त्याने ठरवलेले असते. थोरल्या मामाची लाडकी लेक आहे. माझा सर्वांत जास्त तिरस्कार करणाऱ्याची सर्वांत धाकटी मुलगी. थोरल्या मामाशी जे वैर आहे, तेच तिच्याशीही असायला हवे. पण ती समोर आली की मान वर होत नाही. लांबून पाहताना आनंद होतो. खांद्यावरून पुढे आलेले कुरळे केस हलले की वाटते, छातीवर काळे नाग सरपटताहेत. अर्धवट मिटलेले डोळे पाहिले की वाटते, ती स्वप्न पाहत चालली आहे.

संध्याकाळी ती पश्चिमेकडील अंगणात उभी राहते तेव्हा नागवनातले नाग फणा उभारून नाचत असावेत. सापांना सुंदर मुली खूप आवडतात.

अम्मिणी ताई एक सुंदर सर्प आहे. फणा उभारून उभ्या राहिलेल्या तिला दुरून पाहताना बरे वाटते. तिच्या जवळ जायला तो घाबरतो.

एकदा संध्याकाळच्या सुमाराला तो आपल्या इंग्रजीच्या पुस्तकाला वेष्टन घालीत होता. अम्मिणी ताई येऊन त्याच्या अगदी मागे उभी राहिली.

" अप्पुण्णी काय करतोयस ? "

वेष्टन घालण्यात गर्क राहून म्हणाला, " काही नाही. "

" तुझं पुस्तक बघू का ? "

ती गुडघे टेकून उकिडवी बसली तेव्हा केळ्याच्या फुलांचा मंद मंद सुवास आला.

त्याने पुस्तक खाली ठेवले. अम्मिणी ताईने पुस्तक उचलले. ती पाचवीपर्यंत शिकली आहे. तिला इंग्रजी नीट वाचता येत नाही. पण आपण मात्र इंग्रजी चांगले लिहू-वाचू शकतो याचा अप्पुण्णीला गर्व आहे.

पाने उलटत अम्मिणी ताईने विचारले, " तुला हे सगळं वाचता येतं ? "

" हो. "

" जरा वाचून दाखव ना. "

हे शक्य नाही ! दुसऱ्याला ऐकविण्यासाठी वाचायचे ? ऐकण्यात एवढा आनंद असतो ? वाचून आपले ज्ञान दाखवावे असे वाटले, पण लाज वाटली.

" हे चित्र कुणाचं ? " एक एक पान उलटून तिने विचारले.

अप्पुण्णीने सांगितले, " लक्ष्मीबाईचं. "

" ही लक्ष्मीबाई कोण ? "

" लक्ष्मीबाई कोण एवढंसुद्धा हिला ठाऊक नाही ? मला तर झाशीच्या राणीची सगळी कथा माहीत आहे. हिला कशाला सांगू ?' एवढेच म्हणाला, " प्राचीन काळातली एक राणी. "

" आणि हे काय ? "

" ही उडणाऱ्या घोड्याची गोष्ट आहे. राजकुमार आणि राजकन्या घोड्यावरून जाताहेत. "

" कुठं चाललेत ते अप्पुण्णी ? "

" राजकुमाराच्या देशाला. "

" मग काय झालं ? "

" मग राजकुमारानं राजकन्येशी लग्न केलं. "

" पुढं काय झालं ? "

" मग...मग ते सुखानं राहिले. "

" पुढं काय झालं ? "

पुढे काय सांगावे याचा विचार करीत तो एकदम गप्प झाला. अम्मिणी ताईला एकदम हसू कोसळले. तोही हसला. पण लवकरच त्याने आपले हसू आवरले. त्याच्या खांद्यावर हाताने जोर देऊन ती उठली. पुन्हा केळ्याच्या फुलांचा सुवास.

" तुला सगळ्या गोष्टी ठाऊक आहेत ? "

" त्या सगळ्या गोष्टींचा आम्हांला अभ्यासच करावा लागतो ना ! "

" मग मला का नाही सांगत गोष्टी ? "

त्या वेळी ती अगदी लहान मुलीसारखी भासली. त्याने काहीच उत्तर दिले नाही.

" माझ्यावर रागावलाहेस अप्पुण्णी ? "

" मी रागावलो नाही. "

तिने काहीतरी विचार केला आणि ती आत निघून गेली.

थोरले मामा आणि कुट्टन मामा यांच्यातली रोजची भांडणे ही आता घरात नित्याची बाब झाली होती. थोरले मामा वाटण्या करायला तयार नाहीत आणि खर्चाला पैसेही देत नाहीत. थोरल्या मावशीचे आणखी जोरजोरात ओरडणे नेहमी ऐकू येऊ लागले.

वार्षिक परीक्षेचा निकाल शाळा उघडण्यापूर्वीच कळला. अप्पुण्णी पास झालाय. मार्क कळले नाहीत. पहिला क्रमांक कदाचित मिळणार नाही, पण दुसरा तर नक्कीच मिळणार ! कृष्णन कुट्टी वारियर पहिला येणार.

पास झाल्याचे कळल्यावर तो घरी आला, तेव्हा अम्मिण्णी ताईने विचारले,

" अप्पुण्णी, पास झालास न ? "

" हो. "

" वा: ! कितवा नंबर आला ? "

" माहीत नाही. "

" तू पहिलाच येणार ! "

येऊ दे. मग आणखी एक बक्षीस मिळेल. मागच्या वार्षिकोत्सवात प्रावीण्याबद्दल पारितोषिक मिळाले होते. सूचना-फलकावर नाव पाहिल्यावरच कळले होते.

उत्सवासाठी जमलेले लोक. पारितोषिकाची वाट पाहत तो बसून राहिला. ध्वनिक्षेपकावर त्याचे नाव केव्हा पुकारले त्याला कळले नाही. वी. अप्पुण्णी. त्याला वाटले ते शब्द साऱ्या दुनियेत दुमदुमून राहिलेत. लोकांच्या मधून तो पारितोषिक घेण्यासाठी पुढे गेला. जाड वेष्टनाचे एक इंग्रजी पुस्तक. एका दाढीवाल्याचे चित्र मुखपृष्ठावर होते.

" अप्पुण्णी मोठा होणार. "

अम्मिणी ताई थट्टा करतेय का ? नाही, त्याला वाटले, तो आशीर्वाद आहे.

" शिकून मोठा ऑफिसर होणार. "

ती पुढे काही बोलली नाही. वर न बघताच त्याला कळले की अम्मिणी ताईची दृष्टी त्याच्यावर खिळली आहे.

श्रावणातली एक काळोखी रात्र. तेल संपल्यामुळे दक्षिणेकडच्या खोलीतला दिवा विझला होता. मीनाक्षी मावशीचे काम संपले असेल तर तिची चिमणी घेता येईल. जेवण आटोपून तो पूर्वेकडच्या व्हरांड्यात येऊन बसला. तिथे बसायला त्याला फार आवडते.

थोरले मामा त्या दिवशी घरी नव्हते. गुरुवायूर मंदिरात[1] दर्शनाला गेले आहेत. बैठकीत मुळीच उजेड नाही.

आजी तिन्हीसांजा होताच जेवून घेते आणि झोपी जाते. पावसाळ्यात तिला वाताचा जरा जास्त त्रास होतो. थोरली मावशी आणि मुले जेवून वरती गेली आहेत.

स्वयंपाकघरात मीनाक्षी मावशी आणि मालू काहीतरी काम करीत आहेत.

शेताकडून गार गार वाऱ्याच्या झुळुका येत आहेत. अप्पुण्णी काळोखाकडे पाहत कसल्या तरी विचार करीत आहे.

---

१. केरळचे सुप्रसिद्ध मंदिर. येथे भारताच्या कोनाकोपऱ्यातून भक्तजन दर्शनाला येतात.

तेवढ्यात अम्मिणी ताई जवळ आली.

" अप्पुण्णी, बसल्याबसल्याच झोपतोयस का रे ? "

तो दचकला. ती जवळ आली हे त्याला कळलेच नव्हते. एकदम तिचा आवाजच आला.

" दिवा मिळाला नाही ? "

" नाही. "

" बाबा नाहीत. बैठकीतला दिवा लावून देऊ का ? "

" नको. "

बैठकीत तो कधीच गेला नाही आणि जाण्याची इच्छाही नाही.

" का नको ? अभ्यास संपवलास काय ?"

विषय टाळण्यासाठी तो म्हणाला, " हो. "

" मग झोपत का नाहीस ? "

" अजून झोप आली नाही. "

" पुस्तकातली एखादी गोष्ट सांग ना, अप्पुण्णी. '

" त्यात गोष्टी नाहीत. "

अम्मिणीताई जवळ बसली.

" खोटं. उडणाऱ्या घोड्यावर बसून जाणाऱ्या राजकुमाराची आणि राजकन्येची गोष्ट आहे ना त्यात ? "

" हो. तेवढी एकच आहे. "

" उडणारा घोडा असता तर बरं झालं असतं, नाही का अप्पुण्णी ? पुराच्या वेळी हवा होता. "

अप्पुण्णीला हसू आले. अम्मिणी ताई, सतरा अठरा वर्षांची आहे. तरी लहान मुलांसारखा विचार करते.

" ते सगळं गोष्टीत असतं. " अप्पुण्णीने सांगितले.

" मला उण्णीची गोष्ट माहीत आहे. तुला ठाऊक आहे ती ? "

" कोण उण्णी ? "

वटक्कनपाट्ट[1] मधल्या उण्णीची कथा अम्मिणी ताईला ठाऊक आहे. कमरेएवढ्या

---

१. केरळच्या मलबार भागातील नायर आणि तिय्यर या दोन जातींतील वीर पुरुष आणि वीरांगना यांच्या शौर्याच्या कृत्यांवर रचलेल्या गीतांचे पुस्तक. या गीतांना वटक्कनपाट्ट म्हणतात. उण्णी किंवा उण्णियार्चा ही त्यात वर्णिलेली एक तिय्यर स्त्री आहे.

पाण्यात उभे राहून उण्णीने एका पुरुषाला आपल्या लांब आणि घनदाट केसांमध्ये लपवले होते. (अम्मिणी ताईसुद्धा लपवू शकेल.) रात्री जेव्हा सगळे भाऊ बाहेर गेले, तेव्हा तो पुरुष उण्णीच्या खोलीत आला. सकाळी वेष पालटून निघून गेला.

ती कथा त्याला आवडली. त्याच्या मल्याळमच्या पुस्तकातील एका कवितेत त्या कथेचा एक भाग आहे.

शेताकडून पुन्हा गार वारा आला. शिंका येऊ लागल्या.

अम्मिणीताई म्हणाली, "केवढा गारवा आहे. शर्ट घातला नाही तर थंडी नाही वाजत ?"

"हो. वाजते."

"अय्यप्पन गोठयाच्या व्हरांडयात थंडीत कसा झोपत असेल ?"

अप्पुण्णीच्या खांद्याला अम्मिणी ताईच्या शरीराचा स्पर्श झाला. तिचा हात गरम आहे.

"अप्पुण्णी तुझं छान आहे – दारं आणि खिडकी बंद केली की जिन्याच्या खोलीत मुळीच थंडी वाजणार नाही."

त्याने थट्टेत म्हटले, "पावसाळा संपेपर्यंत तू छोटया खोलीत झोप."

वरती खिडकी नसलेली एक छोटीशी खोली आहे. फुटकी भांडी, केरसुण्या, फाटलेल्या सतरंज्या वगैरे तिथे ठेवतात. वर्षातून एकदा पूर्वजांची पूजाही त्याच खोलीत होते.

अम्मिणी ताईने हळूच विचारले, "मला भीती नाही वाटणार ?"

"त्यात भ्यायचंय काय ?"

"नारायण मामा आणि सगळे पूर्वज येतील ना."

नारायण मामा आणि अनेक पूर्वज मरण पावले आहेत. त्यांच्याविषयी अनेक कथा सांगतात. नारायण मामांची आठवण आली की तिडिक उठते. त्यांनी एका भाचीला लाथ मारून ठार केले होते. बरेच दिवस झाले त्या गोष्टीला. त्या भाचीच्या प्रेताची आठवण आली आणि स्वतःला निर्भय समजणाऱ्या अप्पुण्णीला भीती वाटू लागली. एकच लाथ–तोंडातून आणि नाकातून रक्त, सोळा वर्षांची मुलगी.

तिचा काय अपराध होता हे त्याने विचारले नव्हते. फार पूर्वीची घटना आहे. म्हणतात की... छे, कसा विश्वास ठेवावा ? भातात केस दिसला म्हणून कुणी लाथ मारील का ? हे कारण नसेल. याहून मोठा अपराध घडला असेल तिच्याकडून.

अम्मिणीताईने विचारले, "जिन्याच्या खोलीत झोपताना भीती नाही वाटत ?"

" मला कसलीही भीती वाटत नाही. "

" मोठा शूर आहेस. रात्री मामाचं भूत येऊन गळा पकडील. "

अप्पुण्णीने तुच्छतेने म्हटले, " नाही पकडणार. "

" एवढं धैर्य आहे ? रात्री मीच भिवडवीन. "

अप्पुण्णी ताईने गळ्याभोवती हात टाकले तेव्हा तो लाजला. तिच्या कपड्याला सुवास येतोय.

हातांनी किंचित गळा दाबून अम्मिणी ताईने विचारले, " काय, भीती नाही वाटत ?"

अप्पुण्णीच्या शरीरावर रोमांच उभे राहिले.

तेवढ्यात उजेड आला. मालू होती.

" अम्मिणी ताई, कुठाय अम्मिणी ताई ?"

तिच्या मागे मीनाक्षी मावशीसुद्धा आहे.

अम्मिण्णी ताईने चटकन त्याचा गळा सोडला आणि उभी राहिली.

" मी आलेच. तू बैठकीचं दार बंद कर. "

मीनाक्षी मावशीने अप्पुण्णीला पाहून विचारले, " तू अजून झोपला नाहीस ?"

अप्पुण्णीने अभ्यासाचा विचार सोडून दिला.

" निघालोच आता. "

" चल लवकर. मला सगळी दारं बंद करून झोपायचंय. "

अप्पुण्णी जिन्याच्या खोलीत गेला. तिथे काळोख आहे. चाचपडत चटई काढली. रोज अंधारात चटई अथरतो. फक्त चटईच आहे. पांघरायला काही नाही.

छोटा दिवा घेऊन अम्मिणीताई जिना चढू लागली. बरोबर मालूही आहे. हल्ली मालू तिच्या सोबतीला असते.

" मालू वरती मोरीत पाणी आहे का ?"

" माहीत नाही. "

" एक पातेलं भरून घेऊन ये. "

मालू पाणी घ्यायला गेली तेव्हा अम्मिणी ताई जिन्याचा कठडा धरून उभी राहिली. छोट्या दिव्याच्या प्रकाशात फक्त तिचा चेहरा नीट दिसतोय. खाली निजलेला अप्पुण्णी खरोखर झोपलाय का ते तिने लक्षपूर्वक पाहिले. अप्पुण्णी डोळे मिटून पडलाय.

" खोटी झोप आहे ना ही ?"

तो जरा हलला.

" रात्री मी भीती दाखवायला येणार आहे."

मालू पाणी घेऊन आली. त्या दोघी जिना चढून वर निघून गेल्या. बरोबर वरच्या खोलीत झोपते. वर पावलांचा आवाज आला, मग मोरीचे दार उघडल्याचा आवाज आला. थोड्या वेळाने पलंगाचा आवाज. छत उंच नसल्यामुळे एकेक आवाज खाली ऐकू येतो.

पुन्हा पलंगाचा आवाज झाला. पलंगावर अम्मिणी ताई असेल आणि खाली मालू.

अप्पुण्णीला झोप आली नाही. उघड्या खिडकीतून गार वारा येत होता. लांब कुठेतरी पाऊस पडत असावा. खिडकीच्या गजांमधून गोठा आणि तिच्यामागच्या झाडांच्या फांद्या सावल्यांसारख्या दिसताहेत. थंडी वाजू लागली म्हणून त्याने उठून खिडकी गच्च लावून घेतली.

आता संपूर्ण काळोख आहे. भीती वाटत नाही. वरच्या खोलीत अम्मिणी ताई आणि मालू आहे. समोरच्या बोळाच्या तिकडच्या टोकाला खोल्यांमध्ये थोरली मावशी आणि मुले आहेत. खाली उत्तरेकडील भागातल्या खोलीतून घोरण्याचा आवाज येतोय.

डोळे मिटून पडून राहिला. काळोख आणि गारवा असला की झोपायला बरे वाटते. पांघरायला काही नाही. पाऊस आला की आई पांघरायला द्यायची. जास्त थंडी असली की त्याला छातीशी कवटाळून झोपायची. ही पूर्वीची गोष्ट.

असे वाटले की ही फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. नकळत आईची आठवण ...रू लागला.

मन अस्वस्थ झाले. झाल्या-गेल्या गोष्टीचा आता विचार करायला नको. त्या... ... घट्ट मिटून घेतले.

...ळुहळू झोप येत आहे.

...च्या पुंजक्यातून वर निघालेला महाल पाहून राजकुमाराने घोड्याचा डावा ...न पिरगाळला. महालाच्या गच्चीवर घोडा उतरला. रेशमी बिछायतीवर बसलेली राजकन्या वीणा वाजवीत आहे.

वाटले, कुणीतरी छातीवर हात ठेवलाय. एकदम दचकला. तरी डोळे उघडले नाहीत. छातीवर एक हात ठेवलेला आहे. ओरडावेसे वाटले. अंगठ्या घातलेली ... ...घावर विसावली

" अप्पुण्णी मी आहे रे. "

एक क्षण ! हां कळलं. घाबरायचं कारण नाही. बांगड्यांचा आवाज... हात गरम आहे.

मग डोळे आपोआप मिटले. गाढ झोप आली. तोंडाजवळ गरम गरम श्वास जाणवला, सावकाश एक आवाज बोलला, " घाबरू नकोस. "

थंडीने संकोचलेल्या शरीराला उष्णता जाणवू लागली. गरम हात शरीरावर पडला. सुगंधी साबणाचा सुवास... सगळे अंग थरथरले...

डोळे उघडण्याची इच्छा झाली.

उडणाऱ्या घोड्यावर स्वार होऊन राजकुमार आणि राजकन्या ढगांमधून चालले आहेत. फुललेल्या रानमोगऱ्याची झाडे ढगांसारखी भासत आहेत. फांद्या आणि वेलींना स्पर्श करून जावे लागते.

फुलाच्या पाकळ्या मानेला लागताहेत. त्या गरम आहेत.

जंगली झाडांच्या मधून घोडा चाललाय. घाबरलेल्या राजकन्येने राजकुमाराला घट्ट धरून ठेवले. तिचा श्वास थांबला की काय ?

तो या क्षणी कुठे आहे ? उडणाऱ्या घोड्यावर राजकन्येबरोबर वसला आहे. रेशमी सदरा आणि फेटा बांधलेला राजकुमार तर मीच आहे की, झाडांच्या पुजक्यातल्या उंच फांद्यांमधून नागमोडी वळणे घेत जातोय. वाऱ्यामुळे राजकुमाराचा लाल रेशमी झब्बा वर उडतो आणि पुन्हा खाली बसतो... अंगास काटे बोचताहेत.

उंच, उंच, राजकुमार आणि राजकन्येला घेऊन तो मायावी घोडा खूप उंच उडतोय.

" अप्पुण्णी दादा ! "

मालूचा आवाज ऐकून जागा झाला.

" किती उशीर झालाय, माहीत आहे ? "

अप्पुण्णी चटकन उठून बसला आणि डोळे चोळू लागला. कपडे सावरून खिडकी उघडली तेव्हा खोलीत उन्हे आली. खूप उशीर झाला आहे. हिवाळ्यातली सकाळ, दूरच्या दृश्यासारखे सगळे अस्पष्ट, अव्यक्त आहे. चटई गुंडाळून ठेवू लागला तेव्हा काहीतरी खाली पडले.

लाल बांगडीचे तुकडे. सोन्याच्या तारेसारखी पिवळी रेषा असलेल्या लाल बांगड्यांचे तुकडे.

मालू गेली की नाही हे आधी पाहिले. ती निघून गेली होती.

ते तुकडे गोळा करून तो सरळ बागेकडे गेला. तलाव काठोकाठ भरलेला आहे. न्हाणीघराच्या खांबाला अडकवलेल्या पिशवीतून दंतमंजन घेऊन तो कपडे धुण्याच्या दगडावर बसला.

त्याने एकेक काचेचा तुकडा खाली तलावात टाकला. फुलपाखराप्रमाणे उडून त्या मातकट गढूळ पाण्यात विलीन होणाऱ्या काचेच्या तुकड्यांकडे तो पाहत राहिला आणि ते पाहता पाहता विचार करू लागला...काही खोलीवर ते लाल तुकडे दिसत होते.

त्याला तिरस्कार वाटला आणि दुःख झाले. पण त्यावरोबरच एक अनामिक, नि गूढ आनंदही झाला. एकटा बसून तिच्याच विषयी विचार करीत राहिला.

तडजोड घडवून आणण्यासाठी खूप लोक आले होते. खूप चर्चा झाली, पण निर्णय झाला नाही.

अंगणात वाटण्या करण्याच्या गोष्टी सुरू झाल्या की आत आजी अस्वस्थ होते. गेली सहासष्ट वर्षे ती या घरात राहत आहे. इथेच पडल्या पडल्या मरण यावे अशी तिची इच्छा आहे. दिवसातून दहा वेळा ती हेच घोकीत असते.

कुट्टन मामा दिसताच आजी म्हणते, " मी गेल्यावर भांड्याकुंड्यांच्या वाटण्या केल्या तर पुरेसं नाही का ? "

कुट्टन मामा काहीच बोलत नाही.

वर्षाकाठी ज्यात तीन पिके काढता येतात ते घाटाजवळचे शेत थोरल्या मावशीला हवे आहे. तिची तक्रार आहे की, " माझं आणि माझ्या मुलांचं नुकसान होणार. आमच्या बाजूनं बोलणारं कुणीच नाही. "

न्यायालयाचा गुमास्ता कुमारन नायर याला लोक वकील म्हणून हाक मारतात. तो आणि कोरुक्कुट्टी पणिक्कर हल्ली रोज येतात. पणिक्करला वाटते की वाटण्या इतक्या लवकर आणि सुरळीतपणे होणार नाहीत. शेत आणि जमीन विखुरलेली आहे. मोजमाप करावे लागेल, बांध घालावे लागतील. कुणाकुणाच्या डोक्यावर कर्जही आहे. शाखा वेगवेगळ्या कराव्या लागतील. हे सगळे करण्यापूर्वी, वाटे कुणाकुणाला द्यायचे हे ठरवावे लागेल.

आपल्याला दोन हिस्से मिळावे असे थोरल्या मामाचे म्हणणे आहे. बऱ्याच वर्षांपासून ते तखाट[1]चे कारणवर[2] म्हणून व्यवस्था पाहत आहेत. पूर्वीच्या

---

१. कुटुंब. २. प्रमुख.

काळी प्रमुखाला दोन हिस्से मिळत. त्यांच्यामुळेच (थोरल्या मामांमुळेच) कुटुंबाची भरभराट झाली आहे.

कुमारन नायरने ही गोष्ट कुट्टन मामाला सांगितली तेव्हा तो तिरस्काराने म्हणाला, " भरभराट या घराची झाली नाही, मामीच्या घराची – पुंतोट्टमची झालीय "

कुट्टन मामा आणि थोरले मामा एकमेकांच्या नजरेला पडत नाहीत. पणिक्कर आणि कुमारन नायर हे दोघे त्यांच्यांत मध्यस्थी करीत आहेत. थोरल्या मामांनी निवाडा देऊन टाकला की, आपल्याला दोन हिस्से मिळणार असतील आणि उत्तरेकडचे शेत म्हणजे आपली वैयक्तिक मालमत्ता म्हणून मानायला तयार असतील तरच आपण वाटण्या करायला तयार आहोत. नाहीतर, " कोण कसा आपला वाटा घेतो, तेच मी पाहतो. "

मग एके दिवशी गावचा अधिकारी समझोता करण्यासाठी आला.

त्या दिवशी अप्पुण्णीला सुट्टी होती. शेवटचे वर्ष आहे, सरकारी परीक्षा आहे. खूप अभ्यास करायचाय. त्याच दिवशी निर्णय होणार असे ऐकले होते. पणिक्कर आणि कुमारन नायर आले तेव्हा तो दक्षिणेकडच्या दारात जाऊन उभा राहिला.

अधिकारी नंतर आला. तो गावाचा प्रमुख आहे. तो फाटकापाशी आलेला दिसताच त्याच्यासाठी वरून आरामखुर्ची मागवण्यात आली. पानाचा डबा आणण्याचीही आज्ञा झाली.

दक्षिण भागात थोरली मावशी आणि मुले होती. प्रथम मंदिराच्या स्वयंपाकघराची दुरुस्ती करण्याच्या गोष्टी थोरले मामा आणि अधिकारी करू लागले. वाटण्यांविषयीची बोलणी अजून सुरू झाली नाहीत, याने कुमारन नायर अस्वस्थ झाल्यासारखा दिसत होता.

" हं, कुंजिकृष्णन नायर, भाच्यानं वाटण्यांचा विषय काढला. बाहेरसुद्धा याचीच चर्चा चालू आहे. "

अधिकारी मुद्यावर आले. थोरले मामा अंगणात उतरले आणि एका बाजूला जाऊन पिंक टाकून आले.

" होऊ द्या वाटण्या. "

अधिकारी मोठ्याने हसून म्हणाला, " नुसतं असं म्हणून काम होणार नाही. "

" वाटण्या करायला मी कशाला हरकत घेऊ ? वाटण्या झाल्या की माझ्या डोक्यावरचं हे ओझं उतरणार आहे. हां, साहेब ! पण एक अट आहे बरं का...!

" मनात असेल ते सांगून टाका. "

" अच्यू मामांच्या काळात या कुटुंबाची जेवढी चांगली स्थिती होती तेवढी नायर समाजात कुणाचीच नव्हती, हे तुम्हांला ठाऊक आहेच. "

" ठाऊक आहे, चांगलं ठाऊक आहे मला. "

" तेच म्हणतो ना, तुम्हांला ठाऊक आहे, पण आजच्या तरुणांना ते माहीत नाही. मागच्या पिढीत वाटण्या झाल्या तेव्हा चौसष्ट खण होते. आपला हिस्सा घेऊन वेगळे झाले, तेव्हा संपत्ती बरीच घटली. पण इथं देवीचा वास आहे. हेसुद्धा तुम्हांला माहीत आहेच. "

अधिकाऱ्याने मान हलवली.

" आणखी ऐकायचंय ? आता फक्त पूर्वीची कीर्ती अन हे पडझड झालेलं नालुकेट्टू उरलंय. मी तर पूर्वजांची ही संपत्ती थोडासुद्धा फेरफार न करता जतन करीत आलोय. मी आहे म्हणून हे सगळं ठीक चाललंय. आपसांत भांडणतंटे करून चमचेपळघासुद्धा वाटून घ्यायला लागलो, तर ... "

थोरले मामा थांबले. मग गंभीर आवाजात म्हणाले, " घराचा नाश व्हायला जास्त वेळ लागणार नाही. "

मग सावकाश एक अपशब्द ऐकू आला.

" एरवीही नाशच होणार आहे. "

अधिकाऱ्याने बघितले, कुट्टन मामा आले होते.

अधिकाऱ्याने दोघांकडे पाहिले.

" कुट्टन नायर, तुमच्यासाठी वर्षाकाठी काहीतरी रकमेची व्यवस्था केली तर चालेल का ? वाटण्या करून काय फायदा होणार आहे ? "

कुट्टन मामांनी ताबडतोब उत्तर दिले नाही. वकील कुमारन नायर अजागळा-सारखे हसून अडखळत म्हणाला, " आधी सांगितल्याप्रमाणे कुट्टन नायरच्या गरजेनुसार ... "

" ठाऊक आहे, मला चांगलं ठाऊक आहे, " अधिकाऱ्याने त्याला वाक्य पुरे करू दिले नाही.

" तुमचा चिंतातुर चेहरा बघून कुणाला वाटेल की तुम्हांलाच हिस्सा मिळणार आहे. "

वकील पुन्हा अजागळासारखे हसला.

" हं, बोला कुट्टन नायर. "

" ही व्यवस्था आधीच करता आली असती."

कुट्टन मामा अंगणातून व्हरांड्याच्या खांबाशी येऊन उभे राहिले. अधिकाऱ्याच्या खुर्चीला धरून ते म्हणाले,

" साहेब, मला जे काही म्हणायचंय, तेसुद्धा ऐकून घ्या. माझं पण आता वय झालंय. चौदा वर्षांच्या एका मुलीचा बाप आहे मी. हे काम करू लागलो त्या वेळी मी लंगोटी नेसून राहायचो. काय मिळालंय मला ? वर्षाकाठी चार लुंग्या आणि पाच परा[1] धान्य. तुम्हीच सांगा, दुसरीकडं कुठं आचाऱ्याचं काम केलं असतं, तर इथल्यापेक्षा जास्त कमाई झाली असती की नाही ? "

अधिकारी पान चघळीत मुकाट्याने ऐकत राहिला.

कुट्टन मामा पुढे म्हणाले, " कुटुंबाच्या संरक्षणाच्या ओझ्याविषयी काहीतरी ऐकलं मी. इथल्या माणसांच्या कल्याणासाठी बरंच काही आणून इथं राशीच लावल्या आहेत जणू त्यांनी ? वाटण्या केल्यानं या कुटुंबाचा काही नाश होणार नाही."

वाटले, आता थोरले मामा रागाने उसळून बोलणार. पण नाही, गप्प बसले. ते असेच गप्प बसून ऐकत आहेत. अप्पुण्णीला आश्चर्य वाटले. कुट्टन मामा आणखी आवेशाने बोलू लागले.

" आणि बरं का साहेब, इकडे वटक्केप्पाट्टमध्ये काय वाट्टेल ते झालं तरी त्याची मामांना काही दादफिर्याद नसते. त्यांना सदैव पुंतोट्टमच्या माणसांच्या कल्याणाचीच काळजी वाटते."

थोरले मामा कुट्टन मामाकडे पाहून ओरडले, " काय वाट्टेल ते बरळतोस ? "

" या गोष्टी लपवून ठेवण्याची काही गरज नाही. मी योग्य व्यक्तीलाच सगळं सांगतोय."

" कृतघ्न ! सांग. तुझ्या बापाची संपत्ती नाही दिली मी. तुझ्या बापा ... "

अधिकाऱ्याने त्यांची समजूत घातली.

" जाऊ द्या, कुंजिकृष्णन नायर. तरुण मंडळी पुरता विचार न करता बोलत असतात. आपल्यासारख्यांनी काणाडोळा करावा त्यांच्या अशा बोलण्यांकडं."

" मला हे सगळं सांगायला मुळीच भीती वाटत नाही. जास्तीत जास्त माल तिकडंच पाठवला जातो. तिकडचं कुणी आलं की माझ्या बहिणींना स्वयंपाक करून सगळं काही बैठकीत आणून द्यावं लागतं. जणू काही इथल्या बायका म्हणजे

---

१. केरळातील एक माप.

पुंतोट्टमवाल्यांच्या मोलकरणीच. पूर्वी कवडीमोलाचीसुद्धा नव्हती ही माणसं... "

आवाज ऐकून दक्षिणेकडच्या खोलीतून बाहेर येत आजी कापऱ्या आवाजात म्हणाली, "कुट्टन, अरे बाबा, लोकांना भिऊन राहावं."

कुट्टन मामाच्या तोंडाचा पट्टा तसाच चालू राहिला. त्यांच्या अंगात जणू भूत संचारलं होतं.

"मजुरासारखं काम करायचं अन तरी पण कुत्र्यासारखी वागणूक मिळणार मी एकटा असलो, तरी माझ्या मेहनतीचा फायदा मिळालाच पाहिजे"

"आपण यातून काहीतरी मार्ग काढू."

थोरले मामा खडावा घालून अंगणात येरझारा घालू लागले. त्याला जे काही सांगायचेच ते सांगू द्या असे त्यांना सुचवायचे होते. कुट्टनमामा गप्प राहिला तेव्हा ते अधिकाऱ्याच्या समोर आले आणि म्हणाले,

"साहेब, आता तुमच्यापुढं जो बरळत होता ना, तो ... तो..." थोरल्या मामांचा श्वास रोखल्यासारखा वाटला. "याचा बाप मेला, तेव्हा हा एवढासा होता. मीच याचं पालनपोषण केलं आणि आता हाच माझ्या विरुद्ध भांडायला उभा राहिलाय. या घराण्यात असं कधी झालं नव्हतं."

थोडा वेळ कुणीच काही बोललं नाही. मग थोरले मामा म्हणाले, "आता यापुढं हे ओझं माझ्या गळ्यात नको. जे काय करायचंय ते तुम्हीच करून टाका."

खोलीत आजीने पदर डोळ्यांना लावला.

"आजपर्यंत सगळा भार मी वाहिला, त्याचं फळ मला मिळालं. म्हणून म्हणतो की, मला दोन हिस्से मिळाले पाहिजेत. आता मला या लोकांचा एक पैसासुद्धा नको. कुटुंबप्रमुखाला एवढा वाटा मिळतो. जुन्या काळापासून अशीच रीत चालत आली आहे."

"हे होणार नाही." कुट्टन मामांचा आवाज चढला.

अधिकारी कुट्टन मामांना सल्ला देऊ लागला, "असं कसं म्हणता, कुट्टन नायर? गावात अशीच पद्धत आहे."

"ती जुन्या काळातील पद्धत आहे."

अप्पुण्णीला पुढचे ऐकता आले नाही. मीनाक्षी मावशीने त्याला आत बोलवले. स्वयंपाकघरावरच्या माळ्यावरून लाकडे काढायची होती. अशा कामात नेहमी त्याला मदतीला बोलावले जाते. मीनाक्षी मावशी शिडी धरून उभी राहते आणि तो वर चढून लाकडे खाली टाकतो.

अंगणात काय चाललंय ? वाद काय चाललाय ?

त्याला त्यात विशेष रस नव्हता. एखादे नाटक पाहिल्यासारखी त्याची करमणूक होते. रंगमंचावर जणू दोघे मामा लढताहेत.

संध्याकाळ झाली तेव्हा अधिकारी निघून गेले.

कुमारन नायर निराश होऊन आत आला तेव्हा थोरल्या मावशीने विचारले, " झाला का काही सोक्षमोक्ष ? "

" प्रमुख अडून बसलेत ना. म्हणतात, उत्तरेकडचे शेतही आपली स्वतःची वैयक्तिक संपत्ती आहे. शिवाय आणखी दोन हिस्सेही पाहिजेत. "

कुमारन नायर कुटुंबाचा हितचिंतक आहे. आजीचा निरोप घ्यायला गेला. आजी म्हणाली, " कुमार, एक काम करशील ? "

" काय आई ? "

" मला काही नको. मला आता फक्त एक आंब्याच झाड हवंय. "

आजीला काय म्हणायचंय ते कुमारन नायरला समजलं नाही.

" मी काय करायला हवं, आई ? "

" इथं पडल्या पडल्या मरण यावं अशी इच्छा आहे. पण तुम्ही सर्वजण ती इच्छा पूर्ण कराल असं वाटत नाही. "

" मी काय करू ? "

" काही करू नकोस. "

तो थोडा वेळ तिथेच उभा राहिला. मग हळूच त्याने तिथून काढता पाय घेतला.

मग काही दिवस त्या विषयावर कुणीच काही बोलले नाही. वाटले, सगळे आता शांत झाले आहे. एवढ्यात एक घटना घडली.

थोरल्या मामांना रजिस्ट्रीची नोटीस मिळाली. अर्जदार कुट्टन मामा होता आणि इतर सर्वजण प्रतिवादी होते.

त्या दिवशी दिवसभर आणि रात्रीसुद्धा थोरले मामा अंगणात येरझारा घालीत राहिले. दिवसभर घरातल्या माणसांना शिव्या देत होते. मधूनच बैठकीच्या खोलीत जायचे. तिथून बाहेर येताना त्यांचा चेहरा फारच लाल व्हायचा.

मध्येच अम्मिणी ताईला बोलावले.

" अम्मिणी कुठाय ? "

अम्मिणी ताई बैठकीतून आली.

" उद्या स्वत:च्या घरी जाण्याची तयारी कर. आता हे तुझ्या बापाचं घर राहिलेलं नाही. "

अम्मिणी ताई गप्प उभी राहिली.

" तुला स्वत:चं घर अन माणसं असताना तू इथं येऊन राहण्याची गरज नाही. '

अम्मिणी ताई हळूच बैठकीकडे निघून गेली

त्या रात्री अप्पुण्णी जिन्याच्या खोलीत डोळे उघडे ठेवून पडून राहिला. सगळे झोपलेत. पहाटेच्या स्वप्नाप्रमाणे एका रात्रीची आठवण मनात उमलत होती.

अम्मिण्णी ताई गेली की पुन्हा कधीच येणार नाही.

पूर्वी अम्मिण्णी ताईला पाहिल्यावर भीती वाटायची. आता लाज वाटते. पण तरीही तिला केस मोकळे सोडलेली पहावीसे वाटते. अंगणात उभे राहून तो तिला संधिप्रकाशात खिडकीतून पाहायचा.

सगळे स्तब्ध आहे. उगीच कान टवकारून पडून राहिला. अम्मिण्णी ताई झोपली असेल. तेवढ्यात जिन्यावर आवाज येतोय असे वाटले.

आवाज येतोय. नक्कीच आवाज येतोय. हृदय धडधडू लागले. कपड्यांची सळसळ. त्याच्या अंगावर हाताचा स्पर्श झाला तेव्हा त्याने तो हात धरला.

काहीही न बोलता तो चटईवर बसला. अम्मिण्णी ताईसुद्धा जवळ बसली. त्याच्या गळ्यात हात टाकून गप्प बसून राहिली. किती वेळ ते तसे बसून राहिले कुणास ठाऊक.

तिने हळूच म्हटले, " अप्पुण्णी ! " तिची बोटे त्याच्या पाठीवर फिरत होती

" उद्या मी जातेय अप्पुण्णी ! "

अप्पुण्णीने तिच्या चेहऱ्याकडे पाहिले पण काहीही दिसले नाही.

केव्हा निघणार ते त्याने विचारले नाही. पण मनात तो प्रश्न होताच. खांद्यावर ठेवलेल्या हातातल्या बांगड्या चाचपडत राहिला.

" अप्पुण्णी, माझ्या घरी येशील ? "

" अंहं. कसा येऊ ? "

" मी आता इथं येणार नाही ! "

" ...... "

" बोलत का नाहीस ? रागावलास माझ्यावर ? "

" छे छे, मुळीच नाही. "

" अप्पुण्णी तू खूप मोठ्ठा होशील. तेव्हा अम्मिणी ताईला विसरू नकोस. नाही न विसरणार ? "

" नाही, विसरणं शक्य नाही ! " जिच्या उघडचा छातीवर दिव्याच्या प्रकाशाचे झोत फिरत होते आणि जी केस मोकळे सोडून हातात सुपारीचे फूल धरून डोलत होती त्या सर्पसुंदरीची प्रतिमा तो कधीच विसरू शकणार नव्हता. . .

" नाही. " तो एवढेच म्हणाला.

" येते मी. झोपायला हवे. तूही झोप आता अप्पुण्णी. "

उठण्यापूर्वी त्याच्या कानाशी ओठ नेऊन अर्ध्या थट्टेखोर आणि अर्ध्या रडव्या सुरात ती म्हणाली, " आता अम्मिण्णी ताई तुला घाबरवायला पुन्हा कधीही येणार नाही. "

मग पुन्हा जिन्यावर पावले वाजली.

डोळे उघडे ठेवून तो एकटा पडला होता. मन खूप अस्वस्थ झाले होते.

दुसऱ्या दिवशी सकाळी अम्मिण्णी ताईने सगळी तयारी केली होती. थोरले मामा रेघारेघांचा पंचा खांद्यावर टाकून, छत्री घेऊन अंगणात आले.

मग अम्मिणी ताई सर्वांचा निरोप घेऊ लागली तेव्हा अप्पुण्णी पश्चिमेकडच्या अंगणात भुश्श्याच्या राशीआड भिंतीवर कसले तरी चित्र रेखाटीत उभा राहिला.

अप्पुण्णीने तिला जाताना पाहिले नाही. तो समोरच्या अंगणात आला तेव्हा फाटकापासून दूर बागेच्या हद्दीपलीकडे निळा रेशमी झंपर हळुहळू दिसेनासा होत होता.

आज अप्पुण्णी रोजच्यापेक्षा उशिरा शाळेत जायला निघाला. सकाळी पेज उशिरा मिळाली. बरेच दिवस झाले, वेळेवर जेवण मिळत नाही. बियाण्यांसाठी ठेवलेले सगळे धान्य संपले आहे. कोठीतले सगळे धान्य थोरल्या मामांनी विकून टाकले होते. धान्याचा विषय कुणी काढला की थोरले मामा अचकटविचकट शिव्या देतात.

थोरले मामा घरात क्वचित असतात. एकदा पुंतोट्टमला गेले की आठ-दहा दिवसांनी परत येतात. सुपारी आणि नारळ तोडल्यानंतर जातात. घरातल्या कोणत्याही खर्चाची आपल्यावर जबाबदारी नाही, हे त्यांना सुचवायचे असते.

कुट्टन मामांनासुद्धा घरच्या खर्चाची काळजी नसते. घरी आल्यावर वेळेवर जेवण मिळाले नाही की ते मीनाक्षी मावशीवर डाफरतात.

शेजारीपाजारी तांदूळ वगैरे धान्य उसने आणायला तीच जाते. कधीकधी म्हणते, " हेच माझ्या नशिबात आहे. "

नारळ, सुपारी वगैरे खरेदी करणाऱ्यांना थोरल्या मामांनी बजावून सांगितले आहे. की, कुट्टन मामांना एक पैसासुद्धा द्यायचा नाही !

कुट्टन मामांनी यातून वेगळा मार्ग काढला. वरच्या नागवनातले आंब्याचे मोठे झाड तोडून कुट्टिहस्सनला विकून टाकले. पोतेभर धान्य खरेदी करून आणले. थोरल्या मावशीने उरलेल्या पैशांचा हिशेब मागितला तेव्हा म्हणाले, " ताई, तू गप्प बस. "

झाड तोडण्यासाठी दोर, कुऱ्हाडी वगैरे घेऊन लाकुडतोडे अंगणातल्याच वाटेने गेले. त्यांच्यापैकी एकजण पाणी प्यायला स्वयंपाकघराजवळ आला तेव्हा आजीला ही गोष्ट कळली.

ती दिवसभर रडत राहिली.

तीन महिन्यांत बाहेरची बाग पूर्णपणे ओसाड झाली. कुट्टिहस्सनच्या लाकूड-तोड्यांनी तीच तोडलेली झाडे चिरून फळ्या बनवल्या.

आता नालुकेट्टूमध्ये अप्पुण्णीचा जीव गुदमरू लागला. दिवसभर रडत राहणारी आजी, सतत वटवट करणारी आणि भराभरा इकडून तिकडे जाणारी थोरली मावशी. पाय कांबळीत लपेटून भितीला टेकून बसून माणसाच्या स्थितीचा विचार करीत राहणारा मावशीचा नवरा, क्षुल्लक गोष्टींवरून भांडण उकरून काढून घरात वादळासारखा घुसणारा कुट्टन मामा – छे:, काय एकेकाच्या तऱ्हा आहेत !

त्याच्या मनात असह्य घृणा भरून राहिली आहे. फक्त मीनाक्षी मावशीकडे पाहिले की वाईट वाटते. एकदा धान्याची टोपली डोक्यावर घेऊन सर्वांच्या नजरा चुकवीत सुपारीच्या बागेतून तिला जाताना झाडावरून पाहिले आणि अप्पुण्णीचे डोळे भरून आले.

देव माणसाला सुखदु:ख देतो म्हणतात. मग तिला देवाने सुख का दिले नाही ?

चालता चालता अप्पुण्णीच्या मनात असे अनेक विचार घोंगावत होते. त्याचे सोबती पुढे निघून गेले आहेत. लाल मातीने भरलेल्या त्या रस्त्यावर बैलगाडीच्या चाकांनी उमटलेल्या रेषा अजून आहेत.

भास्कर मागच्या वर्षी नापास झाला. आता नववीत आहे. घरात काहीही तंटा. बखेडा झाला, तरी भास्कर आणि कृष्णन कुट्टी यांना त्याची मुळीच झळ पोहचत नाही. धनी नम्पूदिरीच्या मुलाला का झळ पोहचावी ?

पाराजवळ कुणीतरी उभे आहे. अप्पुण्णीने लक्ष दिले नाही जवळ आल्यावर

ओझरती नजर टाकली तेव्हा कळले की शंकरन नायर आहे. निखाऱ्यावर पाय दिल्यासारखे वाटले.

" अप्पुण्णी ! "

तो जवळ येतोय. त्याने तोंड वळवले.

" अप्पुण्णी ! "

अप्पुण्णीने वळून पाहिलेसुद्धा नाही. तो भराभरा पावले टाकीत निघाला. थोड्या अंतरावर गेल्यानंतर मागे वळून पाहिले. अंहं, ता मागोमाग येत नव्हता.

पुन्हा रस्त्यात मैत्री जोडायला आलाय, त्यान सगळे काही ऐकले. सर्व सहन केले. त्याला कळले की पूर आला तेव्हापासून आई त्याच्याकडे जाऊन राहू लागली आहे. हे समजल्यावर थोरली मावशी जे काही बोलली ते ऐकवेना. तो अंगणाच्या दिशेने धावत गेला. अंगाचा नुसता तिळपापड होत होता. शंकरन नायरबरोबर...

ज्या दिवशी असे ऐकले त्या दिवशी त्याला असे वाटले की बळजबरीने बांधलेला साखळदंड त्याने तोडून टाकला.

शाळेत पोचला तेव्हा घंटा होऊन दहा मिनिटे झाली होती. शंकरन नारायण अय्यर मास्तरांचा तास होता. पण ते आले नव्हते म्हणून चित्रकलेचे मास्तर तास घ्यायला आले. मुले त्यांचे ऐकत नाहीत. वर्गात गडबड-गोंधळ चालला आहे.

दुसऱ्या तासाला सूचना वाचून दाखविण्यात आली. दहा तारखेपूर्वी सरकारी परीक्षेची फी द्यायची आहे, पंधरा रुपये.

त्या तारखेला आता सहा दिवस उरलेत.

पंधरा रुपये कुठे मिळणार ? त्याला अचानक आठवले की, आपले पैसे आजीला ठेवायला दिले आहेत. त्या पैशांतून कुट्टन मामांना उधार दिलेले पैसे परत मिळाले तरी पुरे होतील.

संध्याकाळी घरी आल्यावर आजीला सांगितले, " परीक्षेची फी द्यायचीय. पंधरा रुपये हवेत. "

" बाळा, कुट्टन मामाला सांग, मा पण सांगेन त्याला. "

कुट्टन मामाला विचारायचे ठरवले.

अद्याप कुट्टन मामाशी तो कधी बोलला नाही, पण तरीही बोलायला काही हरकत नाही. त्याच्या मनात त्या माणसाविषयी थोडासा आदर आहे.

थोरल्या मामांनी मारले होते त्या दिवसाची आठवण आली. त्या दिवशी कुट्टन मामाने वाचवले हाते. आजपर्यंत त्याच्याशी काही बोलणेच झाले नाही. त्याच्या

दृष्टीने थोरले मामा नामक भयंकर व्यक्तीशी सामना करण्याचे धाडस असलेला तोच एक वीर आहे.

कुट्टन मामा क्वचित येत नाही. आज रात्री कदाचित येणार नाही.

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी आंघोळ करून आला, तेव्हा मालूने सांगितले, "आबा आलेत."

पुढच्या दारात बसलेला कुट्टन मामा विडी पीत बसला होता. त्याच्या चेहऱ्यावरचे भाव पाहून तो अस्वस्थ झाला. बऱ्याच दिवसांपासून कुट्टन मामा असाच आहे.

तरीही तो त्याच्याकडे गेला.

त्याला जणू पाहिलेच नाही अशा थाटात कुट्टन मामा बसून राहिला. तरीही तो तिथ तसाच उभा राहिला, तेव्हा त्याने विचारले, "काय आहे?"

"पंधरा तारखेपर्यंत सरकारी परीक्षेची फी द्यायचीय."

"बरं, मग?"

"कुट्टन मामा..."

"कर्जाची वसुली करायला आला आहेस वाटतं?"

"मी काय करू? फी दिली नाही, तर..."

"तुझ्या चार नोटा घेतल्यात म्हणून आला आहेस ना? माझ्याकडे पैसाबिसा काही नाही."

रडू येत होते, पण रडला नाही. दुःख झाले की ते आतल्याआत सहन करायला तो शिकला आहे. तो आत जायला लागला तेव्हा कुट्टन मामा म्हणाला, "आता शिकूनसवरून तुम्ही छोटे साहेब बनून येणार ना!"

हे टोमणेसुद्धा गिळून टाकले. दक्षिणेकडच्या खोलीत गेला तेव्हा मालूने विचारले "भेटले का, अप्पुण्णी दादा?"

मोठी विचारायला आलीय. रागीट नजरेने तिच्याकडे पाहत म्हणाला,"नीघ इथून."

तिच्याकडे न पाहताच तो जिन्याच्या अंधाऱ्या खोलीकडे निघाला.

आजीला वाईट वाटले.

"आजीकडे थोडेफार असते, तर बाळा, तुला काही त्रास झाला नसता."

तो मनात म्हणाला, कुणाकडेही काहीही नसायचेच. या अप्पुण्णीचे कुणीही नाही.

महम्मदला सगळे काही ठाऊक आहे. पैसे जमवण्याची जबाबदारी त्याने घेतली. गुराखण वर्गातल्या मुलांकडे पैसे मागितले, पण मिळाले नाहीत.

"अप्पुण्णी एक काम करशील?"

" काय ? "

" भास्करच्या आईकडं नाही का मागता येणार ? "

" मी तिच्याकड मागणार नाही. "

" तुझी थोरली मावशी आहे ती. "

" हो. पण तरीही मी मागणार नाही. "

" उद्यापर्यंत रक्कम उभी करायचीय बाबा. सगळ्याच गोष्टींचा विचार करीत बसलास, तर ... "

" मला बदनाम व्हायचं नाहीय, मुहम्मद. "

मग मुहम्मदने आग्रह केला नाही.

थोरली मावशी, थोरले मामा असतील मोठे पैसेवाले, पण त्यांच्याकडून फीसाठी पैसे मिळतील, असा विचार करण्यात काही हशील नाही.

रात्रभर झोप लागली नाही. किती कष्ट सोसून त्याने इथपर्यंत मजल मारली आहे ! ते सगळे कष्ट आता फुकट जाणार.

उद्या चार वाजण्यापूर्वी फी द्यायची आहे.

आपल्या आईच्या मदतीने आसपासच्या घरांतून पैसे गोळा करण्याचे प्रयत्न करण्याचे आश्वासन मुहम्मदने दिले. त्याने सांगितले की दुपारपर्यंत तो शाळेत आला नाही तर पैसे मिळाले नाहीत असे समजायचे.

परीक्षेत पास होणार याची अगदी बालंबाल खात्री आहे, पास झालो की कुठे ना कुठे नोकरी मिळेलच. त्यानंतर... ? त्या दिवशी कुणाचीही मदत न घेता मान वर करून वावरू शकेन.

पण सगळे काही केवळ एका गोष्टीवाचून अडले – पंधरा रुपये.

पैसे मिळाले नाहीत, तर फी देता येणार नाही. मनात ठरवले तसे होणार नाही.

सकाळ होण्यापूर्वीच तो उठला. दात घासून तलावाकडून येताना विहिरीपाशी मालू भेटली. तिच्याकडे त्याने लक्षच दिले नाही. तेव्हा तिनेच विचारले, " अप्पुण्णी दादा, आज लवकर का उठलास ? "

तिला उत्तर न देता तो पुढे निघाला.

सर्वजण त्याच्या विरुद्ध आहेत. सर्वजण त्याचा नाश होण्याची वाट पाहत आहेत. सकाळच्या ओलसर धुक्यात लपलेल्या त्या नालुकेट्टूविषयी आणि त्यात राहणाऱ्या सगळ्या माणसांविषयी त्याला तिरस्कार वाटू लागला.

कालचाच सदरा घातला. धुतलेली लुंगी अजून सुकली नव्हती. मळकी लुंगी बदलून

तीच ओलसर लुंगी गुंडाळली. रबराचे पट्टे असलेले दप्तर घेऊन बाहेर जाताना पुन्ह-मानूची गाठ पडली.

" इतक्या लवकर कुठं निघालास ? "

" कुठही ... "

अंगणात येऊन तो द्विधा अवस्थेत उभा राहिला. फाटक उघडून शेतात पोचल्यावर कुठे जायचे याचा विचार करू लागला.

आज चार वाजण्यापूर्वी फी द्यायचीय.

कुणाला भेटावे ? कुणाकडे पैसे मागावेत ?

असाच चालत राहिला. शेतातून निघून सडकेवर आला.

शाळेचा रस्ता दक्षिणेकडे होता. तो सरळ उत्तरेकडे वळला. नदीकाठच्या सडकेवर चहाच्या दुकानात सकाळची गर्दी आहे.

सडकेवरून पुन्हा शेतात आला. गल्लीतून निघून डोंगराच्या पायथ्याशी आला. कुठे जायचे, याचा विचारच केला नव्हता. शेवटी नकळत डोंगरापाशी येऊन पोचला. तेव्हा त्याला आठवले की त्या दिवशी सकाळी घर सोडून तो इथेच येऊन बसला होता. इथेच सैनालिकुट्टी भेटला होता.

डोंगरावर वाळलेल्या गवताचे मैदान आहे. हळूहळू उन्हे पसरताहेत. तो कातळ अजून पूर्वीसारखाच आहे. तो त्या कातळावर बसला. त्याला आठवले, त्या दिवशी सकाळीसुद्धा तो इथेच येऊन बसला होता. हं, दोन वर्षे झाली त्या गोष्टीला.

त्या वेळी डोंगरावर हिरवीगार झाडे होती.

दोन वर्षे उलटून गेली. असे वाटले की ती दोन वर्षे तो पुरेपूर जगला.

तो टोकदार कातळ मोठा झाला होता की काय ? शक्य आहे. वर्गात सामान्य-विज्ञानाच्या शिक्षकांनी सांगितले नव्हते का, " वाढ दोन प्रकारची असते. कातळ बाहेरच्या बाजूला वाढतात, तर जीव आतून वाढतो. "

कातळ बाहेरून वाढत असावा

मनुष्य आणि जीव आतून वाढतात म्हणे.

दोन वर्षांत मी किती मोठा झालो. आरशात पाहिले की वाटते, मी खूप मोठा झालोय. पूर्वीचा शर्ट-चड्डी घालणारा अप्पुण्णी आता राहिला नाही. तो अप्पुण्णी इल्लमचे धान्य कोठारीचा मुलगा होता. माणसांनी गजबजलेल्या या जगात आज मी एकटा आहे. कुणीही माझे नाही. पण मला कुणाचीही भीती वाटत नाही.

ऊन कडक झाले तेव्हा अप्पुण्णीला शाळेची आठवण झाली.

शाळेत जायला हवे. पण पंधरा रुपये ... ?

त्या दिवशी घरातून निघताना पूजेच्या खोलीत नमस्कार केला नाही. तो रोजचा क्रम चुकवायला नको होता. पूर्वी जिने नदी पार करून भुकेल्या मुलांना अन्न दिले होते तिचा वास आहे तिथे.

त्या माऊलीला माझा धावा का ऐकू जात नाही ?

वाळलेल्या गवतावर मागच्या बाजूला त्याची सावली पडली.

अप्पुण्णी उठला. शाळेत जायचे. वर्गशिक्षक किंवा मुख्याध्यापक विचारणारा " काय फी द्यायची नाही वाटतं ? "

त्यांना सांगेन, " नाही द्यायची. "

" आज शेवटचा दिवस आहे, माहीत आहे ना ? "

" माहीत आहे, सर. "

" एक वर्ष फुकट जाईल. ",

" जाऊ द्या, सर. "

" फी का देत नाहीस ?"

" माझ्याकडं पैसे नाहीत. "

" घरात ? "

" मला घर नाही सर. माझं कुणी नाही, कुण्णी कुण्णी नाही. "

" अरेरे ! "

" असं म्हणू नका. माझ्यासाठी कुणीही दुःखी होण्याची आवश्यकता नाही. " मनातल्या मनात त्याने असे दृश्य पाहिले.

शाळेत पोचला तेव्हा तो पार थकून गेला होता. आजूबाजूला मुळीच न पाहता फाटक ओलांडून तो आत निघाला. त्या भल्यामोठ्या इमारतीच्या कोपऱ्यातल्या खोलीच्या दरवाज्याशी तो पोचला.

हिरवा कोट घालणारे आणि मोठा टिळा लावणारे भूगोलाचे मास्तर शिकवीत आहेत. शिकवण्याचा बहाणा करून ते आपल्या उत्तर भारताच्या यात्रेचा आणि कोण्या एका दिवाणाच्या मुलीला आपली शिकवणी होती या गोष्टीचा उल्लेख करीत आहेत. त्यांचे वडील आता हाऊसबोटीसंबंधी माहिती सांगत आहेत.

मान वर करून पाहण्याची हिंमत झाली नाही. दुसरा तास चाललाय

वर्गातल्या सर्व मुलांची नजर त्याच्यावर खिळली होती. मास्तर म्हणाले.

" या. आता सकाळ झाली का तुमची ? "

अप्पुण्णी काही बोलला नाही. फक्त भेदरलेल्या नजरेने पाहिले. पहिल्या रांगेत डावीकडच्या टोकाला जाऊन बसला. मुहम्मद आलाय की नाही हे पाहण्याची इच्छा झाली. हा तास संपल्यावर पाहीन.

घंटा वाजली. मास्तर नकाशा गुंडाळून निघून गेल्यावर त्याने वळून मागच्या बाकावर दृष्टिक्षेप टाकला. मुहम्मद आला नव्हता.

एक वाजल्याची घंटा झाल्यावर जेव्हा तो बाहेर आला तेव्हा घामाने चिंब भिजलेला मुहम्मद फाटकापाशी उभा असलेला दिसला. आताच आलाय. पैसे मिळाले की नाही हे विचारायला त्याची जीभ धजेना. पण त्याच्या ओठांवर आणि डोळ्यांत तोच प्रश्न होता.

महम्मद तिरक्या नजरेने पाहत बावळटासारखे हसला. गळ्यात हात टाकून म्हणाला, " मिळाले, एकदाचे यार. "

मिळाले एकदाचे. त्याने खिशातून घामेजलेल्या ओलसर नोटा काढून दिल्या तेव्हा अप्पुण्णीला वाटले, त्याला मिठीच मारावी.

" कुठून मिळाले ? "

" ते समजून घेऊन काय करणार आहेस ? तू फी देऊन ये. जा. "

" परत कधी करायचे आहेत. "

" कधी असले जवळ, तर दे. "

आणखी काही विचारायला तो थांबला नाही. पटकन शाळेच्या ऑफिसकडे धावला. कारकून कुरूप अजून जेवायला गेले नव्हते. ताबडतोब त्यांना फी देऊन टाकली.

संध्याकाळी शाळेतून परतताना मुहम्मदला म्हटले, " मला वाटलं होतं, पैसे मिळणार नाहीत. "

" मी बऱ्याच लोकांकडे मागितले, पण मिळाले नाही. आई मार्फतही विचारलं. "

" मग कुठून मिळाले ? "

" आई बऱ्याच ठिकाणी जाऊन आली. कुठूनच पैसे मिळेनात तेव्हा हताश होऊन बसली तेवढ्यात एक व्यक्ती पैसे द्यायला आली. "

" कोण होतं ? मुहम्मद, कोण होतं ? "

" होतं कुणीतरी. "

" सांग आधी. तरीच, मला वाटलं..."

अप्पुण्णी कसला तरी विचार करू लागला.

" तुझ्या आईनं पैसे पाठवले. "

आई ! अप्पुण्णी अवाक झाला. ते पैसे घ्यायला नको होते. मुहम्मदचे खांदे जोराने हलवीत तो रागावून म्हणाला, " हे आधी का नाही सांगितलंस ? "

मुहम्मदने वाईट वाटून न घेता हसून विचारले, " का रे बाबा, त्यांच्या रुपयाचे सोळा आणे मिळणार नाहीत की काय ? त्याच पैशांतून फी भागवता येईल. आता गुपचूप बैस. "

तो एकटा उरला तेव्हा त्याचे मन जड झाले.

रात्री खूप उशिरापर्यंत दिव्याची सोबत करावी लागते.

लाल मातीच्या चिमणीतून धूरसुद्धा खूप निघतो. याशिवाय तिचे कार्य पाहून वाटते, तिच्यात जीव आहे. कुठेही ठेवा धूर वळून तोंडावरच येतो.

मालू मागे येऊन उभी राहिली. त्याला कळलेच नाही. तिने चुटकी वाजवली तेव्हा मागे वळून पाहिले. मालूने विचारले, " फी दिलीस का अप्पुण्णी दादा ? "

" होय. "

" कुठून मिळाले पैसे ? "

" कुठूनही मिळाले असतील. "

किती चांभारचौकश्या करतेय ही. चिमणीच्या मिणमिणत्या प्रकाशात खांबावर गाल टेकवलेल्या, तिरप्या नजरेने पाहत उभ्या असलेल्या तिच्याकडे एकदा बघितले. ओल्या केसांची दुर्गंधी येतेय. गळयात दोऱ्याने बांधलेल्या ताइताप्रमाणे तिचे डोळेही चमकताहेत.

ती गप्पागोष्टी करायला जवळ आली की तिच्याबद्दल घृणाही वाटते आणि दुरून पाहिले की कणव येते. देवाने तिला काहीच दिले नाही - दिसायला सुंदर चेहरासुद्धा नाही.

पुस्तकातल्या ओळी डोळयांसमोर नाचू लागल्या. त्याने आठवण्याचा प्रयत्न केला.

इंग्रजीच्या मास्तरांनी त्या ओळींचा जो अर्थ सांगितला होता तोही आठवण्याचा प्रयत्न केला. कवी सुदूर दक्षिण देशात राहणाऱ्या एका युवतीला संदेश पाठवतोय. कवीचे तिच्यावर प्रेम आहे. पक्ष्याला उद्देशून तो म्हणतो,

" Oh, were I then that she might take me in
And lay me on her bosom and her heart
would rock the snowy cradle till I died. "

'मी तुझ्यासारखा असतो तर तिनं मला छातीशी धरलं असतं...' पुन्हा लक्ष उडाले. डोळ्यांसमोरून अक्षरे अदृश्य झाली. चमचमणारा रेशमी निळा ब्लाऊज, काजळ रेखलेले अर्धोन्मीलित डोळे...सुखद सुगंध...

शी: कसले विचार डोक्यात येताहेत !

परीक्षेला अवघे तीन महिने राहिले आहेत. त्याने पुस्तकातल्या कवितेकडे लक्ष वळवले –

" Ligereth she to clothe her heart with love."

Delaying as the tender ours delays

To clothe herself when all the woods are green,

अचानक तो विचार करू लागला, आता अम्मिणी ताई काय करीत असेल ?

झोपी गेली असेल. मुलायम गादीवर कुशीवर वळून, लाल बांगड्या घातलेल्या हातांची उशी धरून झोपली असेल.

जुन्या पुस्तकातल्या झोपलेल्या राजकन्येचे चित्र आठवले.

झोपलेली राजकन्या.

ती गोष्ट आठवीत असताना वाचली होती, नाही का ?

राजकन्या कित्येक वर्षांपूर्वी झोपी गेली होती. त्या दालनात राजकुमार आला. तलम झिरझिरित पडदा बाजूला सारून पलंगाजवळ गुडघे टेकून राजकुमाराने तिच्या गालाचा मुका घेतला.

गालावर ओले ओठ.

उगीच अपराध्यासारखे वाटत होते. पण आठवताना एक गूढ आनंद आणि लाजही वाटत होती.

" आता मला एक चुंबन दे. "

" ...... "

" नाही देणार. "

" एक ! मी किती वेळा चुंबनं दिली ?"

हळुहळू ओठ गालांना लावले. त्याची परतफेड म्हणून ...... मानेवर, गालांवर चुंबनाचा वर्षाव ... छातीवर ओठ दाबून झोपताना सारे शरीर रोमांचित झाले होते.

अम्मिणी ताई अप्पुण्णीला एका अज्ञात कल्पनाविश्वात [illegible] गेली होती

चिमणीचा धूर डोक्यावर आला. चिमणी जरा बा[illegible] [illegible]रकवून तो पुढे वाचू लागला.

" काय रे, अजून तू झोपला नाहीस ?"

काहीतरी कामासाठी थोरली मावशी खाली आली होती.

" अभ्यास करतोय. "

" रात्रभर चिमणी जाळायला तू घासलेटाचा डबाच इथं आणून ठेवलायस की नाही ?"

त्याने ताबडतोब चिमणी विझवली. अंधारात चाचपडत तो आपल्या खोली-कडे गेला.

थोरल्या मामांना पुंतोट्टमला जाऊन एक महिना होऊन गेला. कुट्टन मामाला नारळ विकता येऊ नयेत म्हणून त्यांनी कुंजालूशी सर्व नारळ विकण्याचा करार करून त्याच्याकडून पैसेही आधीच घेतले होते. कुंजालूनेच येऊन ही गोष्ट सांगितली. फक्त स्वयंपाकघराच्या अंगणातले नारळ घरात वापरता येतील, बाकी सर्व नारळ त्याचे.

कुंजालूने ताकीदच दिली, " मी सगळे पैसे आधीच दिलेत. सगळा माल आता माझा आहे. नारळ काढण्यासाठी माझी माणसं येण्याच्या आधीच नारळ काढला तर बरोबर इंगा दाखवीन, हां. "

सर्वांनी ते निमूटपणे ऐकून घेतले.

वटक्केप्पाट्ट कुटुंबाकडूनच थोड्या-बहुत वस्तू घेऊन कुंजालूची आई कसेबसे भागवीत होती. आता तोच कुंजालू त्यांना ताकीद देत होता.

माघातली कापणी व्हायची होती. थोरल्या मामांची परवानगी घेतल्याशिवाय घाटाजवळच्या शेतात कापणी सुरू झाली. दक्षिणेकडच्या अंगणात धान्याचा ढीग उभा राहिला. घरातल्या लोकांना हायसे वाटले. काही दिवस हे धान्य पुरेल.

या वेळचे पीकपाणी चांगले झाले. पुरात ज्या शेतांमध्ये चिखल भरला होता, त्यांत हे घाटाजवळचे शेतही होते. बऱ्याच शेतकऱ्यांचे नुकसान झाले होते. कापणी करणाऱ्यांना मजुरी (धान्याच्या रूपात) दिल्यानंतर पाखडून साफ करून धान्य कोठारात भरून ठेवले. कुलूप लावून कुट्टन मामाने किल्ली आपल्याकडे ठेवून दिली.

दुसऱ्या दिवशी मजूर आले तेव्हा सर्वांनाच आश्चर्य वाटले. धान्याची विक्री चालली होती.

थोरल्या मावशीने पुढे येऊन विचारले, " कुट्टन, हे काय, धान्याची विक्री चालवीय ?"

" हो. मी धान्य विकतोय. "

" मुलांनाही खायला अन्नधान्य लागतं."

" त्यांच्यासाठी राखून ठेवलंय आणि अजून – थोडी कापणी व्हायचीय."

" आपल्याच मनाप्रमाणं वागायला लागलास तर मोठं कठीण आहे."

" ताई मी शेती करतोय. गवत कापायला, कीड मारायला तुमचा पैसा खर्च झाला नाही. मला ठाऊक आहे."

थोरल्या मावशीचा पारा चढला.

" आपल्या मर्जीप्रमाणं विल्हेवाट लावायला ही काही तुझी स्वतःची संपत्ती नाही."

" उत्तरेकडच्या शेताची कापणी करून धान्य जेव्हा पुंतोट्टमला पाठवलं तेव्हा का काहीच बोलली नाहीस ? तेव्हा का दातखिळ बसली होती ?"

थोरली मावशी रागावून आत निघून गेली. आजोने काहीतरी विचारले तर ती तिच्यावर खेकसली. फक्त खाण्यासाठी येणाऱ्या अप्पुण्णीला आणि मालूला शिव्या दिल्या. नवऱ्याने आपली संपत्ती या घरवाल्यांना लिहून दिली, याबद्दलही चिडली.

मजूर पोती भरून अन्नधान्य घेऊन गेले.

घरात कोणी काही म्हटले की ताबडतोब झगडा सुरू होतो. कुणाचाच कुणावर विश्वास नाही.

सर्व भांडण–तंटयांपासून अप्पुण्णी अलिप्त राहिला. त्याला कसल्याही वाद-विवादाचा विषय व्हायचे नव्हते. त्याची तर एकच इच्छा होती की या जळत्या निखाऱ्यासारख्या घरातून कधी एकदा बाहेर पडायला मिळते.

शाळेतून आल्याबरोबर अभ्यासाला बसतो. संध्याकाळच्या अंधारात अक्षरे अस्पष्ट होईपर्यंत वाचीत राहतो. मग जेवणाची वेळ होईपर्यंत कुठल्या तरी काळोख्या कोपऱ्यात जाऊन बसतो. जेवण झाल्यावर घासलेटाच्या दिव्याची वाट पाहत बसतो. घासलेट खूप महाग आहे ना.

भाताचा एक कण पानाबाहेर पडला किंवा पाणी फरशीवर सांडले की झालेच भांडण सुरू.

सकाळी तो लवकर उठतो. बहुधा त्याला विहिरीवर बादलीचा आवाज ऐकूनच जाग येते. मीनाक्षी मावशी पक्ष्यांची किलबिल सुरू होण्याआधीच उठते. हिवाळ्यात तो सकाळी व्हरांड्यातल्या अंधुक उजेडात अभ्यासाला सुरुवात करतो.

पाहता पाहता पंधरा तारीख उजाडली. आज परीक्षा सुरू होणार.

परीक्षेत काही गडबड न होवो म्हणून दिवसभर देवाला प्रार्थना करायचा. एकेक

पेपर संपला की त्याला दिलासा वाटायचा. शुक्रवारी शेवटचा पेपर संपवून येताना डोक्यावरचे केवढे मोठे ओझे उतरल्याचा आनंद झाला.

पण घरी पोचताच त्याच्या आनंदावर विरजण पडले. तिथे थोरली मावशी आणि कुट्टन मामा यांच्यात वाग्युद्ध चालले होते.

त्याची परीक्षा कशी झाली, पेपर कसे गेले, हेसुद्धा कुणी विचारले नाही.

तो पास होईल की नापास याचे कुणालाच सोयरसुतक नव्हते.

आजी कधीमधी आशीर्वाद द्यायची, " तुझं कल्याण होवो "

सुट्टीच्या दिवसांत नेहमीच कुचंबणा होते. आता परीक्षेचा निकाल जाहीर होई-पर्यंत भरपूर सुट्टीच होती. परीक्षेचा निकाल लागल्यानंतर जे होईल ते पाहायचे.

# सात

अचानक रामकृष्णन मास्तरांची फाटकाशी गाठ पडली. वळणावर उगीच उभा होता. तेव्हा दिसले की, मास्तर त्या रस्त्याने येताहेत. अप्पुण्णी जवळ गेला.

"काय रे अप्पुण्णी ?"

"काही नाही, सर."

"घर जवळच आहे वाटतं ?"

"हो, इथंच तर आहे."

त्यानं वटक्केप्पाट्टच्या दिशेने खूण केली.

"निकाल लागायला खूप उशीर आहे. सध्या काय करतोस ?"

"काही नाही सर. इथं वाचायला एखादं पुस्तकही मिळत नाही."

"माझ्या घरी ये. मजकडं खूप पुस्तकं आहेत."

अप्पुण्णीला आनंद झाला.

शाळेजवळच मास्तरांचे घर आहे. मास्तरांना वाचनाचा छंदच आहे. ते कविताही लिहितात, असे ऐकले होते.

तेव्हापासून त्याचा संध्याकाळचा हाच कार्यक्रम ठरून गेला. मास्तरांच्या घरी जातो – तीन मैल दूर. पोस्टऑफिसजवळच त्यांचे घर आहे. तिथे तो वर्तमानपत्रे चाळतो. मास्तर कुठले तरी पुस्तक काढून देतात. त्यांचा स्वभाव फार बोलका आहे.

एकदा घरी आला तेव्हा तिथे थोरल्या मामांचा दुसरा मुलगा गोपी आलेला होता. अप्पुण्णीला तो नुसता गोपी नसून गोपी दादा आहे. त्याला पूर्वी कधी पाहिले नव्हते. आजी आणि थोरली मावशी यांच्याशी तो बोलत आहे.

अप्पुण्णी दिसल्यावर त्याने एक मंद स्मित केले आणि निघून गेला.

"बरं झालं. भलं होवो त्याचं. मुलींच्या माहेरी सोन्याच्या खाणी असल्या तरी सासरच्या सारखं होणार नाही ना ?" आजी म्हणते.

काय चांगलं झालंय ?

गोपी दादा निघून गेल्यावर अप्पुण्णी आजीजवळ गेला.

आजी म्हणाली, " सर्वांना निमंत्रण दिलंय. अप्पुण्णी जाणार का ?"

" कुठं ?"

" पुंतोट्टमला. एकवीस तारखेला मोठ्या थाटामाटात लग्न व्हायचंय. "

" कुणाचं ?"

" अम्मिणीचं. "

त्याने पुढे काहीच विचारले नाही. आजी सांगतच होती. " नवरदेवाचं नाव आहे माधवन नायर, जुन्या वळणाचं पराणं आहे. माधवन नायर बऱ्याच वर्षांपूवी घर सोडून गेला होता. सिलोनमध्ये होता. नुकताच गावी परत आलाय. बराच पैसा-अडका बाळगून आहे. तो सुखी असो. "

" सुखी असो, " मनातल्या मनात अप्पुण्णीही म्हणाला. अम्मिणी ताई सुखासमाधानात राहो.

तरीही एक अनामिक दुःख त्याच्या मनात सलत होते. आता कधीही अम्मिणी ताई भेटली तर माधवन नायरच्या बायकोच्या रूपातच भेटणार.

जिन्याखालच्या खोलीतल्या कितीतरी गारठलेल्या काळोख्या रात्री आठवल्या. माझा जन्म उशिरा झाला. पाच-सहा वर्षे आधी जन्म घेतला असता तर आज मोठा पुरुष असतो. मग ... ?

मन अस्वस्थ झाले.

गावात कुठे लग्न असले की आजीला बोलायला दुसरा विषय लागत नाही.

रोज सकाळी आजी दिवस मोजीत राहते. आज पंधरा तारीख. आज मांडव घालणार.

तंकम ताईला बघून म्हणते, " आजीला आता तुझं लग्न पाहायचंय. पाहीन की नाही देवाला ठाऊक. "

तंकम ताईने मान खाली घालून लाजल्याचा अभिनय केला.

थोरली मावशी म्हणाली, " आई, तू निदान आणखी दहा वर्षं तरी जगणार, मुळीच घाबरू नकोस. "

तंकम ताई अप्पुण्णीहून एक वर्षाने मोठी. आता एकोणीस वर्षांची झाली आहे. कितीतरी वर्षांपासून तिच्यासाठी खोली सजवून ठेवली आहे.

एकवीस तारखेला सकाळी जाग आल्यावर पहिली गोष्ट आठवली ती ही की

आज अम्मिणी ताईचे लग्न आहे.

थोरली मावशी आणि मुले सोहळ्याच्या पहिल्याच दिवशी गेली होती. त्यांच्या-बरोबर मालूही गेली. मीनाक्षी मावशीलाही जायचे होते. पण आजी म्हणाली, " सर्वजण गेलात तर मी खाऊ काय ? "

" सदासर्वकाळ या स्वयंपाकघरातच खितपत पडणं माझ्या नशिबी आहे. " मीनाक्षी मावशीने लग्नाला न जाण्याचा निश्चय केला.

अप्पुण्णी मास्तरांनी दिलेले पुस्तक घेऊन खळ्याच्या व्हरांड्यात जाऊन बसला होता. पुस्तकात लक्ष लागत नव्हते. तिकडे खोलीत गेले तर आजी हैराण करते. एक-एक मिनिटाला विचारते, ' लग्नघरी आता काय चाललं असेल. ' तिला तेवढाच ध्यास लागलाय.

रात्री जेवायला बसताना आजी दाराशी येऊन बसली.

" किती वाजले रे अप्पुण्णी ? "

" आठ-नऊ वाजले असतील. "

तिकडे पंगत घातली असेल.

मग त्याला उपदेश करायला लागली, " तुलाही जाता आलं असतं. मोठी मेजवानी आहे आज तिथं. "

काहीही न बोलता तो मुकाट्याने खात राहिला. मिरची आणि चिंच न घातलेली एक भाजी आहे. बस. त्या जेवणाला कसलीच चव नव्हती.

झोपायला जातानाही आजीची बडबड चालूच होती, " आता जेवणं उरकली असतील. "

तिचे मन लग्नघरी आहे. तिथे जाता आले असते. इथे बसून घडीघडीला तिथल्या गोष्टी कशाला करते ?

जिन्याखालच्या खोलीत अंग टाकल्यावर त्याचेही मन त्या कधी न पाहिलेल्या घराकडे धावले.

मांडव गजबजून गेला असेल. घरातल्या खोल्यांत बायका आणि मुले असतील. गर्दी आणि गडबड उडाली असेल.

आता लोक झोपायला जात असतील. अम्मिणी ताई पण बिछान्यावर पडली असेल. एकटी नाही, तो माणूस जवळ असेल – वीस वर्षे सिलोनमध्ये राहिलेला.

हातावर गोंदवून घेतलेला, गालाची हाडे दिसत असलेला, मिश्या असलेला, यमा-सारखे रूप असलेल्या अशा त्या माणसाचे चित्र त्याने मनात रेखाटले. कोण आहे

तो ? कुणी का असेना, अप्पुण्णीला त्याचा तिरस्कार वाटतोय. कारण काही नाही. पण तरीही, तिरस्काराच्या भावनेशिवाय तो त्याचा विचार करूच शकत नाही.

मऊ मऊ बिछान्यावर त्या काळ्या माणसाशेजारी अम्मिणी ताई झोपली आहे– गोरीपान, सुंदर अम्मिणी ताई !

हा कसला विचार करतोय मी !

अप्पुण्णी उठला आणि खिडकी पूर्ण उघडली. बाहेर वारा आहे, चांदणे पडले आहे. पण त्याला उकडत आहे.

गोठ्याच्या मागे केळ्यांच्या पानांवर चांदणे ठिबकत आहे. टिप्पूर चांदणे पडले आहे. फणसाच्या रूक्ष झाडाची पाच डोकी असलेल्या राक्षसासारखी पडलेली सावली निश्चल आहे. ज्यात प्रकाश आणि छाया मिसळून गेले आहेत अशा त्या निसर्ग-दृश्याचे सौंदर्य भयानक होते.

चांदणे कमी होईपर्यंत तो डोळे उघडे ठेवून पडून राहिला. पहाटेचा गार वारा खिडकीतून आत आला तेव्हा त्याला झोप लागली.

निकाल लागला. अप्पुण्णी पास झाला. जूनमध्ये निकाल लागणार असे समजून निश्चित बसला होता. एके दिवशी मास्तरांच्या घरी गेला तेव्हा मास्तरांनी त्याला वर्तमानपत्र देत म्हटले, " पेढे काढ, अप्पुण्णी ! "

" कशाबद्दल सर ? "

" तू पास झालास. यात नंबर आहे तुझा. "

वर्तमानपत्रात नंबरांचा समुद्रच पसरला होता. तरीही त्यातून आपला नंबर शोधून काढणे कठीण नव्हते. मास्तरांनी त्याच्या नंबरावर खूण करून ठेवली होती.

वर्तमानपत्रात छापून आलेला आपला नंबर खूप वेळा बघूनसुद्धा समाधान होत नव्हते. उत्कंठा ओसरल्यावर मुहम्मदचा नंबर पाहिला. नाही, मुहम्मद पास झाला नव्हता. इतर कुणाचे नंबर त्याला ठाऊक नव्हते.

केवड्याच्या झाडांमधून जाणाऱ्या सडकेवरून परत येताना त्याला साऱ्या जगाला ओरडून सांगावेसे वाटत होते, ' अप्पुण्णी पास झाला ! ' तो ताठ मानेने चालू लागला.

घरी जाऊन ही बातमी ऐकविण्याची इच्छा झालेली नसूनही ती सगळ्यांना सांगण्याचा निर्णय घेऊन तो फाटकातून आत आला. पायऱ्या चढतानाच थोरल्या मामांचा आवाज ऐकू आला. बऱ्याच दिवसांनी आले आहेत.

सगळा उत्साह मावळला.

जणू काहीही झालेच नव्हते, अशा प्रकारे तो सरळ आत निघून गेला. शर्ट काढला, धुवून धुवून विरलेला टॉवेल घेऊन खांद्यावर टाकला. आंघोळ करायची होती. या भांडणतंट्यांपासून काही वेळ अलिप्त राहणे फार आवश्यक आहे. केस अगदी कोरडे झाले आहेत. तेल लावून महिने होऊन गेले आहेत.

नदीला पुलाखाली पुरेसे पाणी दिसत आहे. तिथे बरे पडेल. नदीत उतरला. नदी सुकून गेलीय. वाळूच्या अथांग मैदानाच्या काठाने एखाद्या रेघेसारखी नदी वाहत आहे. याच नदीने काही वर्षांपूर्वी सभोवतालचा सगळा प्रदेश बुडवला होता हे आठवून अप्पुण्णीला हसू आले. हल्ली माणसे इकडे-तिकडे खड्डे शोधून त्यात आंघोळ करतात.

वाळूच्या मैदानातून तो चालला होता. पुलाखाली पोचायला चार फर्लांग चालून जायचे होते.

पुलापासून पुढे थोड्या अंतरावर भारतप्पूषे[1]ला एक सखी येऊन मिळते. त्यामुळे उन्हाळ्यातही पुलाखाली पाणी असते. वर रेल्वेचे लांबच लांब रूळ आहेत. त्यांखाली दोन कुंभारणी आंघोळ करीत आहेत.

काठावर छोटे छोटे कातळ आहेत. तो पाण्यात उतरून बराच वेळ एका खडकावर बसून राहिला. डोक्यावरून धाडधाड आवाज करीत गाडी निघून गेली. पूल आणि जमीन थरथरत आहेत असे वाटले. गाडीच्या दारा-खिडक्यांमध्ये खूप माणसे होती – ज्यांना तो ओळखत नाही अशी तऱ्हेतऱ्हेची माणसे – ती कुठून तरी येतात आणि कुठे तरी निघून जातात.

अप्पुण्णीने विचार केला, ही गाडी मद्रासला जात असेल की कोइंबतूरला ?

त्याने अद्याप रेल्वेच्या गाडीत पाय ठेवलेला नाही. त्याने गावाच्या आसपासचा थोडासा भाग आणि शाळा यांशिवाय काहीही पाहिले नाही. मोठी शहरे कशी असतील याची त्याला कल्पनासुद्धा करता येत नाही.

त्याने त्या लोखंडी पुलाच्या प्रचंड खांबांपैकी एकावर एक दगड फेकला. लोखंडाचा घुमणारा आवाज ! लोखंडाचे हे खांब पाहिले की भीती वाटते. गावात अशी अफवा आहे की यांपैकी एका खांबात एक माणूस चिणला गेला आहे.

पूल बांधला जात होता तेव्हा खांब टिकत नव्हते. इंग्रज एंजीनियराने सर्व उपाय करून पाहिले, पण व्यर्थ. शेवटी ज्योतिष्याला विचारून कंत्राटदाराने सांगितले की

---

१. केरळची एक प्रसिद्ध नदी.

नरबळी द्यावा लागेल. एक मजूर टोपलीत माती भरून खालून जात होता. अचानक त्याच्याच अंगावर कितीतरी ढीगभर दगड लोटून दिले. तो मजूर त्यातून बाहेर आलाच नाही. पूल टिकला. ही गोष्ट सत्य असेल, तर तो मजूर श्वास कोंडून मेला असेल. कोणत्या तरी लोखंडी खांबाच्या आत एका माणसाचा आत्मा कैद केलेला आहे.

वर आभाळ निळसर आहे. सूर्यास्त होऊन गेलाय. पश्चिमेकडे लाल-काळे ढग उगीच इकडून तिकडे जात आहेत. मंद लाल किरणे अजून पाण्यावर तरंगत आहेत.

तो आंघोळीसाठी पाण्यात उतरला.

पूर्ण काळोख झाल्यावर तो पाण्यातून बाहेर आला. लोखंडाचा तो पूल ज्याचे पाय एका ओळीत आहेत अशा प्रचंड किड्यासारखा भासला. लोखंडी खांबांच्या चारी बाजूंनी वाहणाऱ्या पाण्याचा आवाज येतोय. काळोखात दूरच्या सिग्नलचा प्रकाश खुनशी डोळ्यांसारखा चमकतोय. अप्पुण्णीला ते एकांत वातावरण सोडून निघवेना.

एका आठवड्यातच प्रमाणपत्र मिळाले. शिवाय निळ्या पुठ्ठ्याचे एक पुस्तक. सरकारी परीक्षांचे मार्क तांबड्या शाईत लिहिले होते. सहा विषयांमध्ये एकूण चारशे वीस मार्क आहेत.

ते मार्क पाहून रामकृष्णन मास्तरांना खूप आश्चर्य वाटले. इंग्रजीत एक्काहत्तर, गणितात नव्वद. अप्पुण्णीने पुढे शिकायला हवे.

अप्पुण्णी व्याकुळ होऊन हसला.

इंग्रजी वर्तमानपत्रांतल्या नोकरीच्या जाहिराती पाहण्यासाठी तो रोज मास्तरांच्या घरी जाऊ लागला.

जिथे अर्ज करावा, अशी एक चांगलीशी जाहिरात त्याला महिन्यानंतर आढळली. रेल्वेत कारकुनांची निवड व्हायची होती. मास्तर म्हणाले, " तू अर्ज करून टाक. तुला चांगले मार्क आहेत, नोकरी नक्की मिळेल. " अर्जाचा फॉर्म घ्यायला एक रुपया लागतो आणि रजिस्टरसाठी केले तर अधिक आठ आणे लागतील. हा दीड रुपया कुठून मिळणार ?

पंधरा तारखेपर्यंत अर्ज पाठवायचा आहे. म्हणजे वीस दिवस आहेत. पण एवढ्या मोठ्या अवधीने अप्पुण्णीला धीर आला नाही. दोन-तीन दिवसांपासून तो त्या दीड रुपयाचाच विचार करतोय. हे देवा ! दीड रुपया म्हणजे कितीसे मोठे धन आहे ?

आंघोळ करून मान खाली घालून विचार करीत पुलाखालून तो चालला होता. सडकेवर आल्यावर एक मुलगा मागून धावत आला आणि म्हणाला, "तुम्हांला बोलावताहेत."

"कोण ?"

"सैतालिकुट्टी दादा. त्या बागेपलीकडच्या चबुतऱ्याजवळ उभे आहेत."

कपाळावर आलेले केस बाजूला सारून अप्पुणी चबुतऱ्याकडे निघाला. तिथे लाल डोळ्यांचा सैतालिकुट्टी विडी ओढीत उभा आहे. तो जवळ गेल्यावर सैतालिकुट्टी म्हणाला,

"तू आता खूप मोठा झालास ?"

अप्पुण्णी हसला.

"घरचं आयतं खायला बरं वाटतं, असं दिसतंय."

त्याच्या बोलण्याकडे लक्ष न देता अप्पुण्णीने विचारले, "तुम्ही केव्हा आलात?"

"काल संध्याकाळी."

"हल्ली कुठं असता ?"

"वयनाट[1] मध्ये आहे. आणखी कुठं जाणार ? बरं तुझं नवलविशेष काय ?"

"असंच चाललंय."

"आता कितव्या इयत्तेत आहेस ?"

"अभ्यास संपला. मी पास झालो."

"दहावी पास झालास का ?"

"हो, पास झालो."

"आता काय करणार आहेस ? "

"आता...आता एखादी नोकरी करायची आहे. इथं राहण्यापेक्षा आता..."

"नोकरी शोधायची आहे ना ?"

"शोधायची तर आहेच. त्यासाठी..."

दीड रुपयाचा प्रश्न मनात उभा राहिला. सांगू का ? स्वाभिमानाने तो प्रश्न विचारू दिला नाही.

"तू काळजी करू नकोस. नोकरी मिळेल."

"नोकरी मिळवायची म्हणजे आपली शिफारस करणारा पाहिजे. पैसाही हवा.

---

१. उत्तर मलबारकडील एक डोंगराळ प्रदेश

माझ्याकडे यांपैकी एकही गोष्ट नाही. मी एक मामुली इसम आहे."

सैतालिकुट्टी विडीचे झुरके घेत ऐकत होता. तो कसला तरी विचार करीत होता. विषय बदलण्यासाठी म्हणाला, "खटल्याचं काय झालं?"

अप्पुण्णीने विरक्तीने म्हटले, "त्याविषयी काही न बोललेलंच बरं. दुसरीकडं कुठं जाता येत नाही म्हणून तिथं राहतोय झालं."

"हे पहा बाळा, देवाला विसरू नकोस. वाईट वाटून घेऊ नकोस. अल्ला काही तरी मार्ग दाखवील."

अप्पुण्णीने मान हलवली.

"जा आता तू. दोन दिवसांनी मी जातोय. जमलं तर भेटेन."

ओल्या टॉवेलाने तोंड आणि मान पुसून अप्पुण्णी जाऊ लागला. दोन पावले गेल्यावर पुन्हा सैतालिकुट्टी म्हणाला, "हे बघ, आतापर्यंत जशी कळ सोसलीस, तशीच आणखी थोडी कळ सोस. अल्ला काहीतरी मार्ग नक्कीच दाखवील."

सडकेने वळणावर आला तेव्हा अप्पुण्णी थट्टेने स्वतःशीच म्हणाला की 'ईश्वर मार्ग दाखवणार असता, तर अवघ्या दीड रुपयासाठी एवढी चिंता कशाला करावी लागली असती!'

अप्पुण्णीला वाटले, देवाची लीला अगाध आहे खरी.

त्याला पत्र लिहिणारे कोणी नाही. म्हणूनच पेन्सिलीने पत्ता लिहिलेला तो लिफाफा त्याने कुतूहलाने उघडला. वर 'बी' हे अक्षर स्पष्ट लिहिले होते. खाली लिहिले होते. "प्रिय अप्पुण्णी नायर यास—" अप्पुण्णी नायर! अप्पुण्णी आता 'अप्पुण्णी नायर' झाला तर!

> प्रिय अप्पुण्णी नायरला सैतालिकुट्टी लिहितोय की, तुझ्याबद्दल मी एस्टेटच्या मॅनेजरला बोललोय. तुला नोकरी देण्याचे त्याने कबूल केले आहे. ताबडतोब इकडे निघून ये. तुझी सर्टिफिकिटे वगैरे घेऊनच ये. कोषिकोट्टहून मानंतवाटीला जाणारी बस पकड. इथे उतरलास की बाजारात कुणालाही विचारलेस तरी तो तुला माझे दुकान दाखवील. इथे कधी येतो आहेस हे आधी कळवलेस तर मी किंवा माझा मुलगा बस स्टँडवर तुला घ्यायला येईल. अल्ला तुझे भले करो. तुझा स्नेही
> सैतालिकुट्टी.

सैतालिकुट्टी हाच अल्ला आहे असे त्याला वाटले

निदान जिन्याखालच्या त्या काळोख्या खोलीतून तरी त्याची सुटका होईल. सैतालिकुट्टीने जे काही लिहिले आहे ते खरे आहे का ? कुठेही थारा नसताना एका अशा माणसानं मदतीचा हात पुढे केलाय की ज्याच्याकडून कधीच असली अपेक्षा केली नव्हती.

त्याला आता सगळे विसरायला हवे. लवकरात लवकर वयनाटला पोचायला हवे. त्यासाठीसुद्धा पैसे पाहिजेत. पल्लिपुरमहून कोषिकोट्टपर्यंतचे रेल्वेचे भाडे. त्यापुढे बसचे भाडे. वाटेत खायलाही काहीतरी हवे. कुणाकडे मागू ?

सरळ मास्तरांकडे गेला. ते बागेत काहीतरी काम करीत होते. त्याचा त्यांच्यावर नितांत विश्वास होता. म्हणून त्याने सगळे काही इत्थंभूत सांगितले.

" यात काय मोठी अडचण आहे ?"

मास्तरांना ते सगळे ऐकून खूप आनंद झाला होता.

" बैस, अप्पुण्णी, मी आलोच एवढ्यात."

मास्तरांनी शर्ट अंगात अडकवला आणि बाहेर निघाले. थोड्या वेळाने आले आणि म्हणाले, " अप्पुण्णी तुझं नशीब चांगलं आहे. हे घे दहा रुपये."

कृतज्ञतेने अप्पुण्णीचे डोळे पाणावले. शब्द गळ्यात अडकले. मोठ्या कष्टाने तो एवढेच म्हणाला, " मी आता जाऊ सर ?"

" जा. तुझं कल्याण होवो."

अप्पुण्णीला वाटले, चारी बाजूंना पसरलेल्या या वातावरणात आपण विरघळून जात आहोत.

वादळी वाऱ्यासारखा तो निघाला.

" तुझं कल्याण होवो."

" वुइश यू गुड लक..."

'उद्या शुक्रवार. मुहम्मदला भेटून त्याचा निरोप घ्यायचाय. परवा इथून निघायचं. मग या गावात पुन्हा कधी यायचं नाही. आता त्या जिन्याखालच्या खोलीत झोपण्याचा प्रसंग येणार नाही.'

मुहम्मदचा निरोप घ्यायचाय. फक्त मुहम्मदचाच निरोप घ्यायचाय का ? नाही, नाही. सगळे आता जवळजवळ मिटले आहे, फक्त आठवणी उरल्यात...

रात्री कुणालाही काहीही सांगितले नाही.

सकाळी मुहम्मदच्या घरी निघाला. त्याची आई घरात होती. मुहम्मद आणि त्याचा धाकटा भाऊ त्याच्या विवाहित बहिणीकडे गेले होते.

" बीबी, मुहम्मदला सांगा, मी आलो होतो."

" कोण ?"

" त्याच्या वर्गातला अप्पुण्णी नावाचा एक मुलगा आला होता, एवढंच सांगा."

" पारुक्कुट्टी अम्माचा मुलगा – अप्पुण्णी का रे तू ?"

अप्पुण्णीने मुकाट्याने मान हलवली.

" तुला भेटायला सांगेन मी त्याला !"

" मी उद्या जातो."

" कुठं जातोयस बाळ ?"

" हे गाव सोडून जातोय. नोकरी शोधण्यासाठी. मुहम्मदला सांगा सगळं."

" सांगेन बरं."

तो जायला वळला तेव्हा बीबी म्हणाली, " बिचारीचा पोरगा दीर्घायू होवो.

विशेष तयारी करायची नव्हती. प्रवासात घालण्यासाठी एक शर्ट आणि लुंगी ठेवली. दुसरे दोन शर्ट आणि दोन लुंग्या पिशवीत टाकल्या. मळका टॉवेल, सर्टिफिकेट, मुख्याध्यापकांकडून मिळालेले चारित्र्याचे प्रमाणपत्र वगैरे सगळे त्या पिशवीत टाकले. सकाळी साडेनऊ वाजता पल्लिपुरमहून गाडी सुटते. पिशवी घेऊन आजीच्या खोलीत आला.

" काय रे अप्पुण्णी ?"

" मी जातोय आजी."

" कुठं रे ?"

" मला नोकरी मिळतेय."

" खरं की काय ? माझ्या पोराचं कल्याण होवो."

आजी उठून उभी राहिली.

" नोकरी कुठं मिळतेय ?"

" वयनाटला ... गावाचं नाव आहे हे."

" तुझे वाईट दिवस संपले आता."

पुन्हा एकदा जिन्याखालच्या खोलीत गेला. काही विसरला तर नाहीना हे पाहायला. विसरण्यासारखे आहेच काय म्हणा. तरीही शंका होती. समोर गेल्यावर दक्षिणेकडच्या खोलीतून थोरल्या मावशीने हाक मारून म्हटले, " अप्पुण्णी, थांब."

" न सांगता चाललास ?" थोरल्या मावशीला प्रेमाचा पान्हा फुटला होता. " पेज तयार आहे. पिऊन जा."

त्याने बेपर्वाईने म्हटले, " नको. "

" प्रवासखर्चासाठी हवे असले तर ..."

हे औदार्य पाहून आश्चर्य वाटले नाही. ही तर सुरुवात आहे ... वळून न पाहता म्हणाला, " काही नको. "

अंगणातून फाटकापर्यंत गेला आणि मागे वळून पाहिले. दारात एक काळी मूर्ती दिसली – मालू.

तिचा निरोप घ्यायला काही हरकत नव्हती.

बंद फाटक उघडून बाहेर आला तेव्हा कुटून मामा येत होता. त्याच्याकडे न पाहता एका बाजूला उभा राहिला.

पाठीच्या कण्यासारख्या शेतामधून जाणाऱ्या बांधावरून अप्पुण्णी झरझर चालू लागला.

# आठ

बस चढण चढत आहे. एका बाजूला उंच उंच कडे आणि दुसरीकडे झाडाझुड-पांनी भरलेली दरी. एक-एक चढण चढत बस हळुहळू पुढे चालली होती. अप्पुण्णीने बाहेर पाहिले. दूर हिरवीगार घनदाट जंगले आहेत, त्यांवर दुपारच्या सूर्याची प्रखर किरणे चमचमत होती. जवळच कडे आहेत त्यांवर जंगली केळीची झाडे आहेत.

पल्लिपुरमला तो गाडीत बसला तेव्हा त्याला वाटले, ' मी आता एकदम बद-लून गेलोय. मी पूर्वीचा अप्पुण्णी राहिलो नाही. मी आता उमदा तरुण पुरुष झालोय. '

बसमध्ये बरीच गर्दी आहे. जवळ एक म्हातारा बसला आहे. त्याने दुपारच्या या उन्हातसुद्धा गळ्याभोवती लोकरी मफलर गुंडाळला होता. त्याच्या कानात मोठ-मोठे वाळे आहेत. पुढच्या दोन सीटांवर बायका आणि मुले आहेत. त्यांतली एक बाई बाहेर डोके काढून ओकत ओकतच प्रवास करीत आहे. चढण संपवून बस वर पोचली तेव्हा अप्पुण्णीने डोके बाहेर काढून खाली पाहिले. डोंगराला चहूबाजूंनी वेढे घातलेली नागमोडी सडक दिसत आहे. खालून वर येत असलेले ट्रक जंगली मुंग्यांसारखे सरपटत येत होते. खाली पाहिल्यावर कळते की किती उंच चढून आलो-आता डाव्या बाजूला काटेरी झुडपे, वाळलेली पाने आणि जमिनीला झाकून टाक-णारी घनदाट झाडे आहेत. वरच्या अंगाला झाडे तोडून साफ केलेली जमीन आहे. जळलेल्या झाडांची खोडे इकडे-तिकडे दिसताहेत. लाल मातीचा तो भाग पाहून म्हाताऱ्याने तांबड्या दाढीवाल्याला काहीतरी विचारले.

" रबराचा मळा होणार आहे इथं. आमच्या कोयक्कुट्टी हाजीच्या पोरांनी ही सगळी जमीन घेतलीय. "

उन्हे कलल्यावर गार वाऱ्याच्या सुखद झुळका बसमध्ये येऊ लागल्या. रांगेने लागलेल्या दुकानांच्या स्टॉपवर आल्यावर कंडक्टरने बस थांबवली. बस थांबली.

" हं, इथंच. "

" इथंच का ? "

अप्पुण्णीने पुन्हा एकदा विचारले. कंडक्टरने मान हलविली. तो पिशवी घेऊन खाली उतरला.

एका टेकडीजवळ छपराची काही दुकाने आहेत. कौलारू दुकाने दोनच आहेत. त्या एकाकी डोंगराळ भागात लोकांनी बाजार मांडलाय. निघण्यापूर्वी त्याने सैतालिकुट्टीला पत्र लिहिले नव्हते. बस निघून गेल्यावर अप्पुण्णीला एक अनामिक भीती वाटली. पहिल्या दुकानात जाऊन त्याने विचारले, " सैतालिकुट्टीचं दुकान कुठाय ?"

तिथं पुड्या बांधणाऱ्या मुलाला सैतालिकुट्टी माहीत नव्हता. तिथून अप्पुण्णी दुसऱ्या दुकानापाशी आला. त्याच्या मिश्या लांब आणि पांढऱ्या होत्या. त्याच्या छातीवर लोखंडाचा क्रॉस लटकत होता.

त्याने सांगितले, " पत्र्याच्या दुकानाच्या पलीकडच्या बाजूला आहे. "

ते ऐकल्यावर अप्पुण्णीचा जीव भांड्यात पडला.

छपराचे दुकान आहे. मागे दगडी भिंतीचे छोटेसे घर आहे. दुकानात एकही गिऱ्हाईक नाही.

नऊ-दहा वर्षांचा एक मुलगा एका पेटीसमोर बसलाय. अप्पुण्णीला पुन्हा जरा शंका वाटली. त्याची द्विधा अवस्था झालेली पाहून त्या मुलाने अशा नजरेने पाहिले, की जणू, त्याला म्हणायचे होते, " मी इथं आहे तेवढा पुरेसा नाही का ?"

" सैतालिकुट्टीचं दुकान कुठलं ?"

" हेच. काय हवंय ? "

" सैतालिकुट्टी आहे का ?"

त्या मुलाला हा प्रश्न आवडला नाही.

" आपल्याला काय हवंय ते सांगा. "

" सैतालिकुट्टीला भेटायचंय. "

मुलानं बसल्याबसल्याच ओरडून म्हटले, " बाबा, तुम्हांला कुणीतरी भेटायला आलंय. "

" कोण आहे रे ?"

अरेच्या ! सैतालिकुट्टीचा आवाज.

" माहीत नाही. "

दुकानाच्या मागील बाजूस टांगलेला गोणपाटाचा पडदा बाजूला सारून सैतालिकुट्टी बाहेर आला.

" अल्ला, नायर आलाय ! "

अप्पुण्णी हसला.

" आत ये, बैस ना. बेटा, ते स्टूल घे इकडं. "

कपाळावरचा घाम पुशीत अप्पुण्णी दुकानात आला.

" फार हुशार आहेस हो. एक कार्ड टाकायला काय झालं होतं ? "

" तावडतोबच निघालो. "

" बरं केलंस बाबा. रस्त्यानं काही त्रास तर नाही ना झाला ?"

" मुळीच नाही. "

" घरापासून प्रथमच इतकं दूर आलास ना ?"

तेवढ्यात सैतालिक्कुट्टी आत निघून गेला आणि चटकन पुन्हा बाहेर आला.

मग सैतालिक्कुट्टीने त्याला त्या ठिकाणची सविस्तर माहिती सांगितली. तिरुवितांकुरहून आलेले बरेचसे खिरस्ती इथे स्थायिक झाले आहेत. या जागी पूर्वी जंगल होते. आतल्या अंगाला गोऱ्या लोकांचे चहाचे मळे आहेत. बाजारातली दुकाने बहुतेक खिरस्त्यांची आहेत. एका नायरचेही दुकान आहे. अयतूमान दादाचे सुक्या मासळीचे दुकान आहे.

या डोंगराळ भागातल्या दुकानात कोणी गिऱ्हाईक फिरकत असेल का, अशी शंका अप्पुण्णीच्या मनात डोकावून गेली.

भोवताली सुमारे पाचशे लोक राहतात. त्यांना याच बाजारातून सर्व वस्तू खरेदी कराव्या लागतात. मळ्यात स्टोअर उघडण्यापूर्वी चांगली विक्री व्हायची. आता कसेवसे भागते.

सैतालिकुट्टी खाद्य पदार्थांचा व्यापार करतो. त्याच पदार्थांचे आणखी एक दुकान आहे. त्यामुळे सैतालिकुट्टीचे दुकान तोटयात चालले होते. त्याला इथ येऊन तेरा वर्षे होऊन गेली. आधी मळ्यात कामाला होता. मग सुकी मासळी विकावयाचा. चांगले उत्पन्न व्हायला लागले तेव्हा त्याने हे दुकान उघडले. पोटापुरते मिळते. दुकान आणि घर स्वत:चे नाही. आठ रुपये भाडे द्यावे लागते. पैसा जमवून दुकान आणि घर विकत घ्यायची इच्छा आहे ... पण ते जमेल असे वाटत नाही.

सैतालिकुट्टीने त्याला सर्व काही सांगितले. अप्पुण्णी ऐकत राहिला. तेवढ्यात

गोणपाटाच्या पडद्यामागील खोलीतून एक आवाज आला, " ऐकलं का ?"
संतालिकुट्टी उठून म्हणाला, " चला पाणी पिऊ या."

संतालिकुट्टी आत गेला. अप्पुण्णी द्विधावस्थेत उभा होता, तेवढ्यात संतालिकुट्टी म्हणाला, " आत ये. इथं सगळी आपलीच आहेत."

अनिच्छेने तो आत गेला.

दारापलीकडे एक छोटीशी खोली होती. चहाचे दोन पेले ठेवले होते. एका पेल्याजवळ पानावर तळलेले केळे आणि पिकलेली केळी ठेवली होती.

" बैस ... " पाटाकडे खूण करून संतालिकुट्टी म्हणाला, " गाडी आणि बसनं आला आहेस. दमला असशील. चहा पिऊन घे."

अप्पुण्णी बसला. ग्लास ओठाला लावून त्याने एक घोट चहा घेतला.

तेवढ्यात आतल्या बाजूच्या दारात काळी लुंगी गुंडाळलेली एक मुसलमान स्त्री येऊन उभी राहिली.

" पात्तुम्मा[1], ओळखलंस का याला ?"

" कोण ?"

" अग आपल्याच गावचा आहे हा मुलगा !"

" खरंच ? मी नाही ओळखलं."

कोंतुण्णी नायर आठवतो ना ? त्याचा मुलगा हा."

अप्पुण्णीने मान वर केली आणि हसून संतालिकुट्टीच्या बायकोकडे पाहिले.

" हाय अल्ला, काय सांगताय तुम्ही ! मी या पोराला पाहिलं तेव्हा हा एवढासा होता."

पात्तुम्माने कोंबडीच्या पिलाएवढा हाताचा आकार करून दाखवला. संतालि-कुट्टीला हसू आले.

" तो एवढासा होता ना, तेव्हा पात्तुम्मा, तूसुद्धा एवढी म्हातारी नव्हतीस.

एवढ्यात मुलगासुद्धा त्यांच्या गोष्टी ऐकायला आत आला.

संतालिकुट्टी त्याला म्हणाला, " बाहेर जाऊन बैस. गिऱ्हाइकांची यायची वेळ झालीय."

तो निघून गेला तेव्हा संतालिकुट्टी म्हणाला, " याला दुकानदारी शिकवतोय."

दुकानात बत्ती पेटली. खिडकीत संधिप्रकाश दिसू लागला. निर्जन डोंगराच्या

---

१. बोली भाषेत प्रचलित असलेले ' फातिमा'चे भ्रष्ट रूप.

दरीतून प्रकाश नाहीसा झाला आणि काळोख दाटू लागला.

सैतालिकुट्टीने पायाने ग्लास भिंतीजवळ सरकावीत म्हटले, " दोन-तीन माणसं येणार आहेत. तू बंस, मी आताच आलो. "

सैतालिकुट्टी दुकानात गेला.

पात्तुम्मा त्याला गावाकडच्या गोष्टी विचारू लागली. तिने आणि मुलांनी दोन वर्षांपूर्वी घर सोडले. तिथे कर्ज झाले होते. घर विकून कर्ज फेडले होते. तिने नवऱ्याला सांगितले होते की, " गावात आपल्या मालकीची जमीन आणि घर झाल्यावरच तिथं जायचं. "

" केवढा मोठा झाला आहेस आता. खूप वर्षांपूर्वी आमच्या घरी आला होतास, त्या वेळी दूध पिणारं बाळ होतास. "

अप्पुण्णी भिंतीला टेकून बसला आणि विचार करू लागला.

मोठा झालोय आणि आणखी मोठा होणार आहे.

" पारुक्कुट्टी अम्मा बरी आहे नं ? "

मान खाली घालून अप्पुण्णी म्हणाला, " हो. "

त्याने मनातल्या मनात म्हटले, हिने आणखी काही विचारू नये.

तेवढ्यात पात्तुम्माच्या मागून बघत असलेले दोन विशाल काळे डोळे अप्पुण्णीला दिसले. पात्तुम्मा वळली तेव्हा तो तिला नीट बघू शकला. पांढरी लुंगी, शर्ट आणि ओढणी घातलेली एक कृश गोरी मुलगी आहे. तिच्या चेहऱ्यावर आश्चर्यमिश्र हसू आहे.

" अशी काय बघत राहिलीस ! कूटल्लूरचा आहे. "

ती मुलगी लाजली. आई म्हणाली, " ही नबीसा, आमची मोठी मुलगी. ती म्हणते, इथल्यापेक्षा गावच चांगलं होतं. "

अप्पुण्णीने घरात चारी बाजूंना दृष्टी फिरवली. छत नाही. वर छप्पर आहे. प्लॅस्टर नसलेल्या भिंती. आत दोन खोल्यांमध्ये जायला दारे आहेत. पलीकडे कमरेएवढ्या उंचीचा ओटा आहे. त्यावर एक चिमणी जळत आहे. तिथून नबीसाला स्वयंपाकघराकडे जातायेताना अप्पुण्णीने पाहिले. प्रकाशात चालताना तिच्या गळ्यातली माळ चकाकत आहे. संध्याकाळी काळोख पडण्यापूर्वी पुलाखाली कातळावर बसून आकाशाकडे पाहताना ढगांमधून अर्धवट दिसणारे चंद्राचे रूप त्याला आठवले.

सैतालिकुट्टी येईपर्यंत पात्तुम्मा दारात बसल्याबसल्याच गप्पा करीत राहिली.

दोघे असे बोलत होते की जणू, अनेक वर्षांपासून एकमेकांचा परिचय होता.

सैतालिकुट्टीने म्हटले, " इथं आराम कमी मिळेल. पण तरीही इथंच राहायचं, काय नायर ? "

अप्पुण्णी हसला. तो इथं राहण्यासाठी आला नव्हता ...

" आंघोळ करायचीय का ? "

अप्पुण्णी गप्प राहिला.

" काही अडचण होणार नाही. थोडं दूर एक नाला आहे. पाणी अगदी चांगलं आहे. "

" आंघोळ करावी म्हणतो. "

" थंड पाण्यानं आंघोळ कर, म्हणजे दिवसभराच्या श्रमांची मरगळ निघून जाईल. ताजं वाटेल. शर्ट काढ. "

अप्पुण्णीने शर्ट काढला आणि पिशवीतून टॉवेल काढून खांद्यावर टाकला.

" पात्तुम्मा, तिळाचं तेल असलं तर द्या थोडंसं. "

पात्तुम्माने अप्पुण्णीच्या तळहातावर तेल टाकले. अप्पुण्णीने आपल्या कोरड्या केसांना तेल लावले.

" नबीसा, बाबांचा टॉर्च घे पाहू. "

नबीसा स्वयंपाकघरात होती. शेजारच्या खोलीत जाऊन टॉर्च घेऊन बाहेर आली. तिने कुतूहलाने टॉर्च आपल्या चेहऱ्यावर रोखून लावला. चेहऱ्यावर प्रकाश पडताच ती हसली तेव्हा तिचे छोटे-छोटे शुभ्र दात दिसले. तिने टॉर्च बाबांना दिला.

पुढे सैतालिकुट्टी आणि मागे अप्पुण्णी. सडक सोडून वाळूच्या मैदानातून दोघे काही अंतर चालले. टेकडीवरून उतरल्यावर खडकांवर आदळणाऱ्या पाण्याचा आवाज कानावर आला.

वर स्वच्छ आकाश. दूरवर मिट्ट काळोखात लपलेला घनदाट झाडांच्या राईत हजारो काजव्यांचे थवे चमचमत होते आणि लपत होते. अपूर्व दृश्य होते. डोंगराळ भागातून वाहणाऱ्या त्या नाल्याच्या काठाशी उभे राहून अप्पुण्णीने काळोख आणि स्तब्ध डोंगराळ प्रदेश यांचे गांभीर्य अनुभवले.

चांगलाच गारठा आहे. सरळ पाण्यात उतरण्याची इच्छा होत नव्हती. एका खडकावर बसला. खाली नाल्याच्या काठावर पुळणीत सैतालिकुट्टी बसला आहे.

अप्पुण्णी नोकरीचा विचार करू लागला.

" उद्या आपण मेनोनला भेटू या. "

" कोण मेनोन ? "

" एस्टेटचा मॅनेजर. गोरा साहेब इंग्लंडला गेलाय. त्यामुळं आता मेनोनच सगळं बघतो. "

" नोकरी मिळेल का ? "

" मिळणार नसती, तर मी तुला बोलावलं असतं का ? मला तुझी अडचण ठाऊक आहे. " सैतालिकुट्टी खालून उठला आणि अप्पुण्णीच्या समोरच्या दुसऱ्या बाकावर येऊन बसला. कनवटीतून विडी काढून ती पेटवीत तो म्हणाला, " तो ऐकेल माझं. त्याचं घरसुद्धा आमच्या गावाजवळच आहे. "

मग सैतालिकुट्टी शंकर मेनोनची माहिती सांगू लागला. त्याचे घर कूटल्लूरपासून पाच-सहा मैलांवर आहे. सैतालिकुट्टी गावात राहत असूनही त्याला ओळखत होता. त्याला चांगली मासळी दिली आहे. त्याच्यासाठी बरेच काही केले होते.

तरीही अप्पुण्णीला शंका वाटत होती. ' बडी माणसं कधी कुणाला मदत करतात का ? '

त्याच्या मनातली काळजी ओळखून सैतालिकुट्टी म्हणाला, " तो सैतालिकुट्टीला कधीच विसरायचा नाही. "

सैतालिकुट्टीचा स्वर गंभीर झाला. कारण विचारावे लागले नाही. तोच म्हणाला, " ती एक मोठी कथाच आहे. "

सैतालकुट्टी गाव सोडून आला तेव्हा प्रथम वयनाटमध्ये माश्या मारीत बसायचा. शंकर मेनोन आनामला[1]च्या चहाच्या मळयातून बदली होऊन इथे आला होता.

सैतालिकुट्टी त्याला भेटला. त्याने पाच रुपये हातावर ठेवले. पैशापेक्षा नोकरीची गरज होती. गावात दिलेल्या मासळीची मेनोनला आठवण नव्हती.

सैतालिकुट्टीने अनुभवाचे बोल ऐकवले, " माणसाची भरभराट झाली की त्याची स्मरणशक्ती कमी होते. "

त्यानंतर सैतालिकुट्टी त्याला खूप वेळा भेटला. त्याला मळयात मजुरीची नोकरी लावून दिली. एक रुपया रोजगार. त्या वेळी मेनोन सहायक मॅनेजर होता. राहायला एस्टेटचा मोठा वाडा होता. वाडयाच्या स्वयंपाकघराच्या व्हरांडयात सैतालिकुट्टी झोपायचा.

त्या वेळी मेनोनचे लग्न झाले नव्हते. मजुरांमध्ये त्याविषयी बरेच काही बोलले

---

१. एक डोंगराळ जिल्हा.

आयचे. मिस्त्री कुंजिकृष्णनची जी खास सोय करण्यात आली होती, त्यामागेही एक कथा होती. सैतालिकुट्टीने आधी या गोष्टींवर विश्वास ठेवला नाही. पण जेव्हा कुठूनतरी एक मोलकरीण येऊन तिथेच राहायला लागली तेव्हा त्याला पण आपले मत बदलावे लागले. स्वयंपाक करायला गोपाळ होता. बाहेरची कामे करायला एस्टेटचे सगळे नोकर होते. मेनोन तर एकटाच होता.

ती तरुण मुलगी होती. मला वाटते, नायर जातीची नव्हती.

मोलकरीण असून तिला कसलेच काम नव्हते. ती मेनोनचे जेवण टेबलावर वाढून ठेवायची. वर एकच खोली होती. दुपारी आणि संध्याकाळी ती वरच रहायची.

नोकरांनी इकडे लक्ष दिले नाही. ती जेव्हा अधिकार गाजवू लागली तेव्हा मात्र गोपाळ काय वाट्टेल ते बरळू लागला. दरम्यान सैतालिकुट्टी वेगळा राहू लागला. नंतर काही दिवसांनी ती मोलकरीण खाली उतरेनाशी झाली.

काही महिन्यांनी एकदा एका रात्री गोपाळ आला आणि त्याने सैतालिकुट्टीला झोपेतून उठवले. कशासाठी बोलावले म्हणून विचारले, तर गोपाळला काहीच सांगता आले नाही. रात्रीचे दहा वाजून गेले होते. तो त्याच्याबरोबर निघाला. मेनोन सिगरेटचे झुरके घेत येरझारा घालीत होता. त्याने गोपाळला दार बंद करून झोपायला सांगितले. फक्त ते दोघेच उरले तेव्हा मेनोनने सैतालिकुट्टीला खोलीत बोलावले.

" सैतालिकुट्टी ! "

नेहमीप्रमाणे स्वरात कठोरपणा नव्हता.

" तुझ्याकडं एक काम आहे. "

" काय ? "

" सांगतो. बस जरा. "

सैतालिकुट्टी खोलीतल्या शेकोटीपाशी जाऊन हात शेकू लागला. त्याला आश्चर्य आणि भीतीही वाटली. गोपाळ झोपला असेल. सैतालिकुट्टी बैठकीच्या खोलीत बसलाय. भिंतीतल्या कपाटात ठेवलेल्या पुस्तकांकडे आणि पेटलेल्या शेकोटीकडे तो आळीपाळीने पाहत राहिला.

अशाच स्थितीत किती वेळ निघून गेला ते कळले नाही.

अचानक मेनोनचा आवाज ऐकून तो उभा राहिला.

मेनोनने फक्त एवढेच म्हटले, " ये. " तो जिन्याच्या पायऱ्या चढू लागला. सैतालिकुट्टी भीत भीत मागे गेला.

वरच्या खोलीतला दिवा मिणमिण जळत होता. मेनोनने वात सारून तो मोठा केला. मंद प्रकाश पसरला. पलंगावर डोळे मिटून पांढरी चादर ओढून मोलकरीण पडली होती. ती मधूनमधून कण्हत होती. तेवढ्यात सैतालिकुट्टीच्या लक्षात आले की फरशीवर आणि मोरीत रक्त सांडले आहे. हाय अल्ला, सैतालिकुट्टी घाबरला.

दुसऱ्या पलंगावर पडलेल्या एका पांढऱ्या गाठोड्याकडे बोट दाखवून मेनोन म्हणाला, " ते घेऊन जा आणि गाडून टाक. "

तरीसुद्धा सैतालिकुट्टी घाबरून दूर उभा होता.

" खोल गाडून टाक. दूर कुठंतरी. तिसऱ्या माणसाला अजिबात कळता कामा नये. "

सैतालिकुट्टीने त्या गाठोड्याला स्पर्श केला. हात सुन्न झाले. आत काहीतरी गार आणि मऊमऊ होते. हळूच कापडाचा एक कोपरा सारून पाहिले, एक नुकतेच जन्मलेले मूल होते. ते हालचालही करीत नव्हते.

" लाकडं ठेवतो त्या खोलीत कुदळ असेल. चल. झटपट झालं पाहिजे. "

गाठोड्यातली ती वस्तू सैतालिकुट्टीने उचलली.

" ... त्या जागी आता झाड उभे आहे, मेनोनच्या घरी जाऊ तेव्हा दाखवीन. आता ती गोष्ट तिसऱ्या व्यक्तीला कळली आहे. "

नाल्याचे पाणी बर्फासारखे गार आहे. आंघोळीची इच्छा उरलेली नाही. सैतालिकुट्टी आंघोळ करू लागला तेव्हा त्यानेसुद्धा उतरून आंघोळ केली.

परतताना वयनाट, नोकरी, सैतालिकुट्टी– सर्व विसरून गेला. त्या सर्व गोष्टी मनातून पार निघून गेल्या होत्या. मनात फक्त एक झाड उरले होते.

प्रथमच परक्याच्या घरी जेवतोय. एके काळी मुसलमानाचे पाणीसुद्धा पिऊ नये असे वाटायचे. आता त्याच्या एका बाजूला सैतालिकुट्टी बसला आणि दुसऱ्या बाजूला मुहम्मद कुट्टी. समोर न सडलेल्या तांदळाचा गरम गरम भात आणि तांबडी भाजी आणि हे वाढायला पात्तुम्मा.

वटक्केप्पाट्ट नालुकेट्टूमध्ये बाहेरून आल्यानंतर आत जाण्यापूर्वी आंघोळ करायला लागायची. हरिजन तर त्यांच्या विहिरीजवळसुद्धा जाऊ शकत नव्हते.

पण पात्तुम्माने शिजवलेला भात आणि भाजी खाताना अप्पुण्णीला काही वावगे वाटले नाही. मनातून घृणेची भावना टाकून देताना एक प्रकारचा आनंद झाला.

अप्पुण्णीच्या झोपण्यासाठी एक चटई आंथरली गेली. एक जुनीपानी ओढणी उशीवर लावली गेली. त्यातून अत्तराचा मंदमंद सुवास येत होता.

सैतालिकुट्टी म्हणाला, " जरूर वाटेल तेव्हा हाक मार. टॉर्च उशाशीच ठेवलाय. बाहेर जायचं असलं तर हाक मार. "

" बरं. "

" एकट्याला भीती तर नाही ना वाटत ? "

" छे, छे. "

" आणि आता भीती वाटून कसं चालेल ? आता तू लहान राहिला नाहीस - मोठा तरुण झालाहेस. "

असे म्हणून सैतालिकुट्टी हसला.

तो खूप दमला होता. हवेत गारवा होता. उशीवर डोके टेकून पडल्यापडल्या अप्पुण्णी विचार करू लागला. एके काळी मी ज्याला माझा कट्टर वैरी समजत होतो, त्याच्याकडे मी आज पाहुणा आहे.

# नऊ

तिरुओणमला आता पाचच दिवस राहिले आहेत. ओणमच्या दिवसांत फुलांनी लहडलेल्या झाडांनी सजलेला गावाजवळचा डोंगराळ प्रदेश आठवला. गाव सोडून पाच वर्षे नाही, पन्नास वर्षे झाली असावी असे वाटते. नदी, करुण्णूरचा पूल, शेते, केवड्याचे वन, डोंगराळ भाग – या सर्व आता भूतकाळातल्या नुसत्या आठवणी. त्याने सगळे विसरण्याचा प्रयत्न केला.

दिवसासुद्धा त्याला जिन्याखालच्या त्या छोट्या काळोख्या खोलीचे चित्र स्पष्ट आठवत होते. एका कोपऱ्यात गुंडाळून ठेवलेली चटईसुद्धा अजून आठवत होती

आज पुन्हा पाच वर्षांपलीकडे पाहण्याची इच्छा होत होती. त्या काळात आयुष्यातली सारी कटुता अनुभवली होती. भास्कर नंबियार, कुरूप, जोमफ हे सर्व मित्र आपापल्या बालपणच्या कितीतरी गोष्टी सांगत असतात. शाळेतल्या गमती सांगतात. तो सर्वांच्या गोष्टी गुपचूप ऐकत राहायचा. तो स्वतः काहीच सांगत नसे.

तो इथे आला तेव्हा एक गोणपाटाची मोठी पिशवी, कपड्यांचे दोन जोड, एक टॉवेल, एवढीच त्याची मालमत्ता होती.

विचार करता करता सैतालिकुट्टीची आठवण आली.

सैतालिकुट्टीनेच सगळे केले. त्या दिवशी संध्याकाळी एस्टेट मॅनेजरच्या वाड्यावर गेला आणि सैतालिकुट्टी तिथून आश्वासन घेऊनच परतला.

आठवडाभर वाट पाहावी लागली. फील्ड रायटरची जागा आहे असे कळताच अर्ज दाखल करून टाकला.

सुरुवातीला पगार एकशे पंचेचाळीस रुपये होता. एकशे पंचेचाळीस रुपये ! शिवाय राहण्यासाठी फुकट क्वार्टर.

सर्वांत आधी ओळख झाली भास्कर नंबियारशी. त्याच्या सोबत्याचे लग्न झाल्या-

मुळे अलीकडे तो एकटाच होता.

क्वार्टर अविवाहितांसाठी होता. अप्पुण्णीला त्यातच जागा मिळाली.

महिन्याला एकशे पंचेचाळीस रुपये! आयुष्यात कधी शंभराची नोट पाहिली नव्हती.

भास्कर नंबियार म्हणाला, "चांगलं आहे, वर्षाकाठी पाच-सहा महिन्यांचा बोनसही मिळेल."

एक वर्ष काम केल्यावर पाच-सहा महिन्यांचा वेगळा जादा पगार मिळतो

नंतर अब्राहम जोसफशी ओळख झाली. स्वतःची ओळख करून देताना त्याला नेहमीच अवघडल्यासारखे होते.

"तुम्ही कुठले?"

गावाचे नाव सांगितले.

"घरी कोण कोण असतं?"

मोठा कठीण प्रश्न होता.

"विशष कोणी नाही."

"वडील?"

"ते वारले."

"आई?"

प्रथम जिभेवर उत्तर आले, "मला आई नाही." पण मग त्याला वाटले आपण स्वतःलाच अडचणीत टाकीत आहोत. अशा गोष्टी नंतर मनाला फार क्लेश देतात. पुढे अशा खोट्या गोष्टी निभावून नेणे फार कठीण होऊन बसते.

"भावंडं नाहीत?"

"नाही."

भास्कर नंबियार म्हणाला, "फार भाग्यवान आहात. मला सगळे नातेवाईक आहेत. पण सर्वांना पैसा पाहिजे. हैराण झालोय अगदी."

हातात मोजून एकशे पंचेचाळीस रुपये मिळाले तेव्हा त्याला जाणवले की ते सर्व पैसे त्याचे स्वतःचे – फक्त त्याचे आहेत. पण एवढ्या पैशांचे काय करावे ते सुचेना. क्वार्टरचा खर्च फक्त चाळीस रुपये. नवे जीवन सुरू झाले होते. सर्वांशी मिळून मिसळून वागत होता.

गडी कृष्णन कुट्टी आला आणि म्हणाला, "पाणी तापलंय. आंघोळ करून येणार का?"

" थांब जरा. "

" बरं. "

" थोड्या वेळाने आंघोळ करीन. "

बाहेर पलीकडे चहाची झाडे अंधारात लपली आहेत. कपडे बदलायचे आहेत, आंघोळ करायची आहे, जेवायचंय. पण आरामखुर्चीवर पडल्यापडल्या विचार करीत राहणे त्याला खूप आवडते.

पहिल्या महिन्याचा पगार घेऊन तो दुसऱ्याच दिवशी सैतालिकुट्टीला भेटायला गेला. तो दिवस त्याला अजून आठवतो.

त्या दिवशी सुट्टी होती.

सैतालिकुट्टीच्या समोर नोटांचे बंडल धरले तेव्हा तो म्हणाला, " याची काही गरज नाही, बेटा. अनाठायी खर्च करू नकोस. पैसे साठव. प्रसंगाला कामास येतील. "

पैसे साठवायचे हे तर त्याने अगदी सुरुवातीलाच ठरवले होते. गरजेपुरताच त्याने पैसा खर्च केला.

गावाकडून काहीच वर्तमान कळले नव्हते. नोकरी मिळाली त्याच दिवशी रामकृष्णन मास्तरांना पत्र लिहिले होते. त्यांचे उत्तरही आले होते. पण नंतर दुसऱ्या पत्राचे उत्तर मात्र आले नाही. तिसऱ्या पत्राचेही उत्तर आले नाही तेव्हा त्याला वाटले, कदाचित मास्तरांची बदली होऊन ते दुसऱ्या गावी गेले असतील.

एकदा गावी जाऊन यायला हवे असे गेल्या कित्येक दिवसांपासून घोकतोय. काही खास काम आहे, असे नाही, पण सहज जाऊन यावे असे वाटत होते. तसे पाहिले, तर आता त्याचा त्या गावाशी कसलाही संबंध राहिलेला नाही. कुणी प्रियजन तिथे त्याची वाट पाहत बसले असेही कधी वाटले नाही. तरीही एकदा गावी जाऊन यायचे आहे. वटक्केप्पाट्टलाही जाऊन यायला हवे. त्यांच्या लेखी मामुली, फालतू असलेला अप्पुण्णी आता एक मोठा माणूस झालाय, हे एकदा सर्वांना कळायला हवे. सर्वांच्या लेखी मामुली असलेला अप्पुण्णी आज कोणाच्याही मदतीशिवाय मानाने जगतोय.

रजा घेतोय, हे मित्रांना सांगितले तर त्यांना आश्चर्य वाटेल, तो कधीच रजा घेत नाही अशी त्याची सर्व मित्रांमध्ये ख्याती आहे. आपले म्हणावे असे त्याला जवळचे कुणी नाही, असा त्यांचा समज आहे.

एकदा शेताच्या मधल्या त्या उंच बांधावरून ताठ मानेने चालण्याची त्याची इच्छा आहे. पहा म्हणावे, अप्पुण्णी आला आहे.

जाण्यापूर्वी सैंतालिकुट्टीला भेटायचे होते. त्याला भेटून आठ-नऊ महिने होऊन गेले. सुरुवातीला तो आठवड्यातून निदान एकदा तरी त्याच्या दुकानात जायचा. कधी सैंतालिकुट्टी इकडे यायचा.

सैंतालिकुट्टीला पाहिले की जुन्या गोष्टी आठवतात.

पुन्हा गडी आला आणि म्हणाला, " पाणी थंड होतंय. "

तो उठून आत गेला. डोक्यात विचारचक्र चालूच होते.

एस्टेटची सडक बसच्या मार्गाला जाऊन मिळते. वळणावर एस्टेटच्या नावाची पाटी लावली आहे. अप्पुण्णी सडकेवरून जात असताना समोरून सुपरवायझर फिलीप येताना दिसला. त्याच्याशी हसून तो पुढे जाऊ लागला तेव्हा त्याने विचारले, " कुठं निघालात ?"

" असाच, सहज फिरायला ?"

सैंतालिकुट्टीच्या दुकानाशी आला तेव्हा दुकानात बाहेर कुणीच नव्हते. एक मिनिट तसाच उभा राहिला. तेवढ्यात मुहम्मद कुट्टी बाहेर आला.

दुकानात जाऊन त्याने विचारले,

" बाबा घरात नाहीत का रे, मुहम्मद कुट्टी "

" निजलेत, या ना आत. "

" निजलेत ? का रे, काय झालंय बाबांना ?"

" तब्येत बरी नाही त्यांची. "

बाहेरचा आवाज ऐकून सैंतालिकुट्टीने आतून विचारले, " कोण आहे रे ?"

" अप्पुण्णी नायर आहेत. "

" त्याला आत यायला सांग. "

गोणपाटाचा पडदा सारून अप्पुण्णी आत गेला. एका चटईवर सैंतालिकुट्टी पडला आहे. पूर्वीचा सैंतालिकुट्टी राहिलेला नाही. शरीर फार खंगले होते. चेहऱ्याची हाडे वर आली होती. गालफडे आत गेली होती. अप्पुण्णीकडे पाहून क्षीण हसून म्हणाला, " तब्येत ठीक नाही, बेटा. "

" काय झालंय सैंतालिकुट्टी ?"

" अर्धांगवायू. उठता येत नाही. डावा हात, डावा पाय हलवता येत नाही. "

पात्तुम्मा जवळ येऊन उभी राहिली. डोळे पुशीत म्हणाली, " गेले तीन महिने असे पडून आहेत. वैद्यानं सांगितलंय की पक्षाघात आहे. "

" त्याला बसायला पाट टाक. "

अप्पुण्णी " नको " म्हणाला आणि चटईवरच सैतालिकुट्टीजवळ बसला.

अपराधी स्वरात म्हणाला, " मला हे कधी कळलंच नाही. "

पात्तुम्मा पुन्हा डोळे पुशीत म्हणाली, " अल्लाची करामत आहे ही. तुला कळवायला मुहम्मदला पाठवायला हवं, असं बरेच दिवस म्हणत होते. "

पात्तुम्माच्या चेहऱ्यावर पूर्वीचे तेज राहिलेले नाही. नबीसा दारात येऊन उभी राहिली. तिच्याही डोळयात विषाद आहे. काळया फरशीवर नजर रोखून तो थोडा वेळ गप्प बसून राहिला.

" आता कधीच उठता येणार नाही असं दिसतंय. ही पोरं अनाथ होतील. " सैतालिकुट्टीचा आवाज कापत होता.

पात्तुम्माने मग सगळे सांगितले. " धंद्यात मंदी आहे. गेल्या पाच महिन्यांचं घरभाडं थकलंय, त्यामुळं मालक केव्हा घरातून हुसकावून लावील ते सांगता येत नाही काय काय भोगायचं बाकी आहे, अल्ला जाणे. " यावर कुणीच काही बोलले नाही. सैतालिकुट्टीच्या चटईवर अप्पुण्णी बसून राहिला. नबीसाने कंदील पेटवला आणि उशाशी असलेल्या एका पत्र्याच्या थाळीत ठेवला.

" पात्तुम्मा प्यायला काही आहे का ? "

अप्पुण्णी तावडतोब मध्येच म्हणाला, " मला काही नको. "

पात्तुम्मा आत गेली. खोलीत सैतालिकुट्टी आणि अप्पुण्णी राहिले.

" बेटा, अल्ला शिक्षा करीत आहे. जे केलं त्याची फळं भोगतोय. "

अप्पुण्णीला सैतालिकुट्टीकडे पाहवले नाही.

" तू मार्गाला लागलास ... बरं झालं. "

पुन्हा स्तब्धता.

" बऱ्या-वाइटांचा विचार न करता सैतालिकुट्टीने एक अपराध केला होता. अल्लाने त्या अपराधाला क्षमा केली नाही. "

अप्पुण्णीला अवघडल्यासारखे झाले. तो अस्वस्थ झाला.

" तुझे वडील आणि मी एका ताटात जेवायचो ... "

अप्पुण्णीचा चेहरा लाल झाला. सैतालिकुट्टीची नजर चुकवून तो म्हणाला, " जाऊ द्या, आता विसरून जा त्या गोष्टी. "

" तुला माहीत नाही बेटा. तुला कळलं, तर ... "

" मी सगळं ऐकलंय आन विसरूनही गेलोय. "

तेवढ्यात सैतालिकुट्टीच्या उशाशी असलेली आगकाड्यांची पेटी घ्यायला नबीसा तिथे आली.

सैतालिकुट्टी काहीतरी बोलणार होता. अचानक थांबला.

"अल्ला विसरत नाही. मी डोळे मिटल्यावर ... पोरगी वयात आलीय. मुलाचं काहीच धड नाही. अल्ला, सगळ्यांची काळजी घेतो."

अप्पुण्णी कसंबसं म्हणाला,

"सैतालिकुट्टी, काळजी करू नका."

पात्तुम्माने एका पेल्यात चहा आणून ठेवला. अप्पुण्णा हळूहळू चहा पिऊ लागला. मग मध्येच म्हणाला, "मी उद्या गावाला जातोय."

सैतालिकुट्टीला आश्चर्य वाटले.

"ठीक आहे. जाऊन ये."

थोडा वेळ तसाच बसला. मग उठून आतल्या दाराकडे गेला.

पात्तुम्मा भितीला टेकून उभी आहे. तिच्यामागे सावलीसारखी नबीसाही आहे.

"सैतालिकुट्टीची नीट काळजी घ्या. उद्याच मी भाडं चुकतं करतो. उद्या सकाळीच मुहम्मद कुट्टीला माझ्याकडं पाठवा."

अंधुक प्रकाशात त्याने पात्तुम्माच्या डोळ्यांतून वाहणारे अश्रू पाहिले. अप्पुण्णी आणखी खंबीरपणे म्हणाला,

"कसलीही काळजी करू नका. मी तुम्हाला मुळीच त्रास होऊ देणार नाही."

पात्तुम्माच्या मागून हुंदके ऐकू आले. तो हळूच मागे फिरला. सैतालिकुट्टीच्या चटईजवळ येऊन त्याने पुन्हा एकदा त्याचा निरोप घेतला. गावाहून परत आल्यावर पुन्हा भेटायला येण्याचे आश्वासन दिले.

"बेटा," तो जायला निघाला तेव्हा सैतालिकुट्टीने हाक मारली.

अप्पुण्णी थांबला.

"बऱ्याच दिवसांपासून एक गोष्ट तुला सांगायची होती."

"काय ?"

"आईला विसरू नकोस. तिला आता तुझ्याशिवाय कोण आहे ?

अप्पुण्णीच्या कपाळाला घाम फुटला.

"पुन्हा भेटू सैतालिकुट्टी."

तो घाईघाईने बाहेर पडला.

रस्त्यावरचे दिवे दुतर्फा अंधुक प्रकाश देत आहेत. बाजारात संध्याकाळची गर्दी

उसळली आहे. गेल्या पाच वर्षांत बाजारात फारसा बदल झालेला नाहा. इथेच तो प्रथम उतरला होता. जुना शर्ट आणि लुंगी पिशवीत घेऊन काहीसे भांबावून उतरला होता इथे ...

दुसऱ्या दिवशी संध्याकाळी तो पल्लिप्पुरम स्टेशनवर उतरला.

हमालाच्या डोक्यावर मोठी सूटकेस आणि वळकटी टाकून तो निघाला. स्टेशनाच्या परिसरात कोणी परिचित माणूस दिसते का त्याने पाहिले. ते पाहून काय करायचे म्हणा. दरवाजाशी तिकिट देऊन तो हमालाबरोबर रेल्वेच्या रुळांच्या बाजूने चालू लागला. पाऊण मैल चालल्यावर करुण्णूरचा पूल आला.

खाली आल्यावर पुलाकडे एक दृष्टिक्षेप टाकला. काळे, उंच खांब अर्धे अधिक पाण्यात बुडलेले आहेत. नदीचे गढूळ पाणी जोरात वाहात होते. नदीच्या काठाने चालत केळीची बाग पार करून तो मुख्य घाटाजवळ पोहचला. रिकाम्या टोपल्या घेऊन तीन-चार माणसे तिथे बसली होती. त्यांनी त्याच्याकडे कुतूहलाने पाहिले. त्यांच्याकडे लक्ष न देता तो वाळूच्या मैदानात आला. पाण्याच्या जवळ आला. काठाशी फेस सुकलेला होता. नदीचे गढूळ पाणी परकराच्या लाल किनारीसारखे मैदानाला स्पर्श करून वाहत होते.

नाव जवळ आली. गवताच्या मोळ्या आणि टोपीवाल्या छत्र्या घेऊन बऱ्याच हरिजन स्त्रिया नावेत बसल्या होत्या. लुंगीविक्या आणि त्याचे गाठोडेही आहे.

चप्पल काढून आणि लुंगी वर घेऊन तोही नावेत चढला. नाववाल्याने तोंडाने शिट्टी वाजवली. वाळूच्या मैदानात दूरवर दोन माणसे धावत इकडे येत होती. ती आता आणखी जोरात धावू लागली.

हमालाने कातडी बॅग आणि वळकटी खाली ठेवली आणि नावेजवळ उभा राहिला.

जुना नावाडी नव्हता. तो उंच, किडकिडित तरुण होता. हा तर दाढीवाला म्हातारा आहे.

नाववाल्याचे सगळे लक्ष त्या बॅगेवर, वळकटीवर आणि नदीकडे पाहात सिगारेट ओढणाऱ्या अप्पुण्णीकडे होते. ते दुसरे दोन प्रवासीसुद्धा येऊन नावेत चढले तेव्हा त्याने खाली उतरून नावेला धक्का मारून पाण्यात लोटले. नाव खाल पाण्यात शिरल्यावर तो नावेत चढला आणि वल्हवू लागला.

अप्पुण्णीला वाटले की समोर बसलेल्या दोन व्यक्तींची नजर त्याच्यावर खिळली आहे. त्याने पाण्यावर स्थिर केलेली दृष्टी तशीच ठेवली. एकाने अप्पुण्णीच्या हमालाला विचारले, " कुठं जायचंय ? "

" पलीकडच्या तीराला. "

मग जरा खालच्या स्वरात त्याने पुन्हा विचारले, " हे कोण ? "

" माहीत नाही का ? गाडीनं आलेत ते. "

दुसऱ्याने तितक्याच खालच्या स्वरात म्हटले. " कलम[1]ला जात असतील. "

पलीकडच्या तीराला उतरल्यावर सर्वांत आधी अप्पुण्णी उतरला. दुसरे दोघे उतारू मागे हटले व एका बाजूला उभे राहिले.

त्याने नाववाल्याच्या दिशेने एक अधेली फेकली.

" मोड नाहीय, मालक. "

" ठीक आहे. असू दे तुझ्याकडंच. "

म्हाताऱ्याने डोळे फाडून त्याच्याकडे पाहिले.

दोन्ही माणसांच्या डोळ्यांत आश्चर्य आणि आदराचा भाव होता. अप्पुण्णी सडकेच्या दिशेने निघाला.

घाटात आणि आसपास काहीही फरक झालेला नाही. पलीकडे लाल दगडांच्या भिंतींची एक नवी मशीद उभी राहिली आहे. आजूबाजूला न पाहता अप्पुण्णी ताठ मानेने चालला होता.

मोठ्या बांधाशी आल्यावर त्याने एक नवी सिगरेट पेटवली. समोर एक म्हातारा आला आणि त्याला पाहताच रस्ता सोडून शेतात उतरून उभा राहिला.

दुरूनच बंद फाटक दिसत होते. तो झरझर चालू लागला. जोरात फाटक उघडून, पायऱ्या चढून तो अंगणात आला. बाहेर कोणी नाही. काय करावे हे न कळून तो तिथेच थोडा वेळ उभा राहिला. वरच्या अंगणातही कोणी नाही. व्हरांड्यातून तो मोठ्याने म्हणाला,

" इथं कुणी नाही का ? "

त्याला उत्तर मिळाले नाही. जवळ जाऊन पाहिले तर दाराला कुलूप लागलेले होते.

पुन्हा अंगणात आला. बैठकीचे घर आणि नालुकेट्टूचे अंगण यांच्यामध्ये एक बांबूचे कुंपण उभे राहिलेले दिसले.

हमालाच्या डोक्यावर बॅग आणि वळकटी आहे आणि तो हैराण झालाय.

अप्पुण्णी पश्चिमेकडच्या अंगणाकडे निघाला. तिथे तसेच दुसरे कुंपण दिसले. हे

---

१. गावातील एका श्रीमंत कुटुंबाचे नाव.

कुंपण बैठक आणि खळे यांच्यामध्ये आहे. खळ्यासमोर एक स्त्री काम करीत बसली आहे. इकडे पाठ करून ती बसली आहे. पांढरा झंपर घातलेली एक काळी किड-किडित स्त्री.

अप्पुण्णी खाकरला. त्या स्त्रीने वळून पाहिले. मीनाक्षी मावशी.

सूप खाली ठेवून ती उभी राहिली. ती घाबरलेली दिसत होती. तिने त्याला चटकन ओळखले नाही.

" मला ओळखलं नाहीस, मीनाक्षी मावशी ? "

" कोण अप्पुण्णी ? "

तिच्या रूक्ष चेहऱ्यावर आश्चर्य प्रकटले. तो कुंपणाजवळ आला.

" मीनाक्षी मावशी, आता तरी ओळखलंस का ? "

" तू खूप मोठा झालास बाबा. "

नालुकेट्टूकडे बोट दाखवून त्याने विचारले, " इथं कुणी नाही का ? "

नालुकेट्टू तर आता मामाचं आहे. कधीकधी येतात. "

" अन इथं ? "

" वाटण्या झाल्यावर कुट्टन दादा आणि मालू इथं एक वर्षभर राहिले. नंतर सिंगापूरहून आलेल्या राघवन नायरला घर विकून टाकलं. आता कुणी राहत नाही. "

नालुकेट्टू थोरल्या मामाचे, बैठक कुट्टन मामाची, मीनाक्षी मावशीचे खळे.

" आणि थोरली मावशी ? "

" ताई आणि तिची मुलं त्यांच्या स्वतःच्या घरी असतात. "

कोठाराकडे बोट दाखवून मीनाक्षी मावशी म्हणाली, " आता हे माझं घर. "

अप्पुण्णीला आता सगळं कळलं.

कुंपण ओलांडून तो कोठाराच्या समोर आला. हमालाच्या डोक्यावरून वळकटी आणि बॅग उतरवून पायरीवर ठेवले. त्याला पैसे देऊन मोकळे केले.

मीनाक्षी मावशी पायऱ्या चढू लागली. तोही तिच्या मागोमाग गेला.

खळे म्हणजे कुडाची लांबट खोली आहे. जुन्या काळात पावसाळ्यात पीक कापून इथेच ठेवीत आणि इथेच ... आता आत मातीची भिंत उभारून तीन भाग केले आहेत.

" कोण आहे ? "

एक क्षीण आवाज !

" कोण आहे ? " अप्पुण्णीने विचारले.

" आजी. "

त्या भिंतीच्या बाजूला असलेल्या वाटेने तो पलीकडे गेला. तिथे एका कोपऱ्यात एका जुन्या फाटक्या चादरीखाली ती पडली होती.

" कोण आहे ग, मीनाक्षी ? "

तो चटईजवळ उकिडवा बसत म्हणाला, " आजी मी आहे – अप्पुण्णी. "

मोठ्या कष्टाने आजी बसली, अप्पुण्णीने तिचे रूक्ष हात आणि चेहरा पाहिला. केस अगदी बारीक केले आहेत. त्याच्या अंगावर हात फिरवीत आजी म्हणाली, " माझ्या बाळा, आलास तू ! "

अप्पुण्णी गप्प राहिला.

आजीला दिसत नाही की चालता येत नाही. यापूर्वीच एखाद्या दिवशी इहलोकातून निघून गेली असती तर बरे झाले असते.

तेवढ्यात त्याने तिच्या डोळ्यांकडे पाहिले. पिवळे पिवळे डोळे.

डोके, मान, सबंध अंगभर एकदा हात फिरवून ती म्हणाली, " बाळा, तू तर खूप मोठा झालास की रे ! "

" चार-पाच वर्षं झाली ना ! "

तिथून स्वयंपाकघर दिसत होते. स्वयंपाकघरात काजळी चढलेल्या चार-पाच मातीच्या घागरी, दोन पितळेची ताटे, एक घासलेटाचा कंदील दिसतोय.

अप्पुण्णी उठून बाहेरच्या खोलीत आला. तिथे खिडकीला धरून मिनाक्षी मावशी उभी होती.

" सगळ्या नशिबाच्या गोष्टी आहेत. रात्री इथं राहायला एक माणूस होता, तोही निघून गेला." थोड्या वेळाने जरा सावरून म्हणाली, " जे इथून निघून गेले, त्यांना कष्ट पडले नाहीत."

" कुट्टन मामा आणि मालू कुठं आहे ?"

" वटक्कुम्मुरीत."

पडकी भिंत, शेणानं सारवलेली जमीन आणि तारेवर लोंबकळणारे कपडे यांच्याकडे अप्पुण्णीची दृष्टी गेली.

त्याने खिडकीतून बाहेर पाहिले.

वटक्केप्पाट्टचे नालुकेट्टू बंद आहे

मिनाक्षी मावशीने विचारले, " अप्पुण्णी, तू रजा घेऊन आला आहेस का ?"

" हो."

" इथं तर बसायलासुद्धा जागा नाही. ताईकडं जायचंय का ?"

" मी इथंच राहीन. माझ्यामुळं तुला कसलाही त्रास होणार नाही."

मीनाक्षी मावशी निरपेक्ष भावनेने म्हणाली, " मला कसला त्रास आहे त्यात ?"

त्याने शर्ट काढला आणि भिंतीवरच्या खुंटीवर टांगला. बॅग एका कोपऱ्यात ठेवली. वळकटी पसरली आणि तिच्या एका टोकावर बसून बॅग उघडून एक दहाची नोट काढली व ती नोट मीनाक्षी मावशीला दिली आणि म्हणाला, " आता लागतील त्या सगळ्या जिनसा घेऊन ये."

चांदणी रात्र आहे. आश्विनातले चांदणे आहे. जेवण आटपून अप्पुण्णी कोठाराच्या अंगणात शतपावली करतोय.

कोठाराच्या मागे सर्पबन आहे. त्या बनाच्या मधोमध असलेले उंच झाड चांदण्यात भयानक वाटले.

चांदण्या रात्री साप फणा उभारून उभे राहतात असे लहानपणी ऐकले होते ते आठवले. चारी बाजूंना मृत्यूचा सागर पसरलाय. एखाद्या अव्यक्त गीतासारखी विषादाची एक लहर नकळत त्याच्या हृदयातून वाहू लागली.

इथे येताना जो उत्साह होता, तो आता मावळलाय.

पाच वर्षांनंतर अप्पुण्णी घरी परत आलाय ही बातमी दुसऱ्याच दिवशी सबंध गावभर पसरली.

आता तो पूर्वीचा अप्पुण्णी नाही ! चहाच्या मळ्याचा ऑफिसर आहे. भरपूर पैसा बाळगून आहे. मीनाक्षी अम्मा रोज किराणा सामान खरेदी करण्यासाठी मुलाला दहाची नोट देते. असेही सगळीकडे पसरले. मीनाक्षी मावशीला आता कसे चांगले दिवस आलेत, याचीच जो तो चर्चा करू लागला.

तिसऱ्या दिवशी सकाळी भेटायला एक स्त्री आली. एक वयस्क स्त्री.

अप्पुण्णीने विचारले, " कोण आहे ?"

मीनाक्षी मावशीने सांगितले, " दूरच्या नात्यातली आहे."

" अस्सं."

अप्पुण्णीच्या जवळ येऊन ती हसली.

ती काहीतरी सांगू लागली, तेव्हा अप्पुण्णीने शांतपणे विचारले,

" काय ?"

" कोण आहे ? किती बदलला आहेस ?

अप्पुण्णी काहीही बोलला नाही.

"तुम्हांला कुणाला आठवत नसेल. तुम्ही सगळे तर..."

"मी काहीही विसरलो नाही.

"तू आलास असं कळलं, म्हणून भेटायला आले."

"कशाला ?"

अप्पुण्णीने जराही सहानुभूती दाखविली नव्हती.

"हल्ली तब्येत ठीक नसते. आता मला तुमचाच आधार आहे. पान विकत घ्यायलाही पैसा नाही. काहीतरी दिलंत तर बरं होईल."

तिच्या शब्दांत माया होती आणि अधिकारही.

अप्पुण्णीने शांतपणे विचारले.

"तुम्ही मला लहानपणापासून पाहिलंय ?"

"असं का विचारतोस ?"

"तुम्ही मला पाहिलंय ? माझ्याशी बोलला आहात ? आपलं दोघांचं कसलं नातं आहे ?"

तिच्या चेहऱ्यावरचे हास्य मावळलं.

"आपण सगळे एकाच वंशातले. रक्ताचं नातं तोडू म्हटल्यानं तुटत नाही."

"हे नातं कालच आठवलं ना ? निघा इथून. माझ्याकडून काहीही मिळणार नाही."

मग ती तिथे थांबली नाही. मीनाक्षी मावशी आणि आजीचा निरोप न घेता ती निघून गेली तेव्हा अप्पुण्णी पुटपुटला, "म्हणे रक्ताच्या नात्याचा अधिकार."

कृष्णन कुट्टीही त्याच दिवशी आला. लाल चड्डी घालणारा कृष्णन कुट्टी आता मोठा झालाय.

"काय कृष्णन कुट्टी ?"

"सहज आलो होतो."

"ठीक चाललंय ना ?"

"हो."

बोलणे इथेच संपले. कृष्णन कुट्टी थोडा वेळ बोटे मोडीत तिथेच घुटमळला. मग आत जाऊन आजीला भेटला आणि दोन मिनिटांनी बाहेर आला. जवळ येऊन अप्पुण्णीला सांगू लागला.

"अप्पुण्णी दादा, आईनं बोलावलंय."

"काय आहे रे ?"

"विशेष काही नाही. इथं अडचण असेल तर तिथं येऊन राहायला सांगितलंय."

"मी इथं अगदी आरामात आहे."

कृष्णन कुट्टी जरा थांबून म्हणाला, "आईला तुला भेटायचंय" सिगारेटचे थोटूक खाली टाकून पायाखाली दाबून अप्पुण्णी म्हणाला, "आईला म्हणावं भेटायची इच्छा असेल तर इथं ये."

कृष्णन कुट्टीचा चेहरा उतरला. त्याच्या चेहऱ्यावर ओशाळवाणं हसू उमटले. त्याला घाम फुटला.

"मी खूप पाहिलंय."

मग दोन दिवस कोणी भेटायला आले नाही. घाटावरचा अबूबकर एक मासा घेऊन भेटायला आला. त्याला त्याचे पैसे द्यायला अप्पुण्णीने मीनाक्षी मावशीला सांगितले.

दिवसभर खळ्यात बसून तो काहीतरी वाचीत रहातो. संध्याकाळी खूप उशिरापर्यंत अंगणात येरझारा घालीत राहातो.

रात्री जेवण झाल्यावर पुन्हा बराच वेळ शतपावली करीत राहतो. अंगणात एका कोपऱ्यात फणसाच्या झाडाचे खोड आहे. त्यावर बसून काळोखात बुडालेल्या सर्पवनाकडे पाहत राहतो.

तिथे साप फणा उभारून डोलत असतील का ?

मग दिव्याच्या प्रकाशात डोलणाऱ्या एका अर्धनग्न मुलीचे चित्र त्याच्या मनात उमटू लागते. तिच्याबद्दल चौकशी करावी असे वाटले होते. विचारले असते तर काही कळलेही असतं, पण विचारले नाही.

एके दिवशी गल्ली ओलांडून टेकडीवर जाऊन मीनाक्षी मावशीला वाटणीत काय मिळाले ते जाणून घेतले. तिला तिथल्या नाल्यापासून चातप्पनच्या झोपडीपर्यंतची विस्तृत टेकडी मिळाली होती.

त्या खडकाळ जमिनीत मध्ये कुठेकुठे जंगली झाडे होती. तो परिसर म्हणजे शून्यतेचे साम्राज्य आहे.

मीनाक्षी मावशीच्या गप्पागोष्टीतून मधूनमधून वाटणीसंबंधीच्या गोष्टी कळल्या. उत्तरेकडची सगळी शेतजमीन थोरल्या मामांच्या वैयक्तिक मालकीची आहे. थोरली मावशी आणि मन्ने यांना चार भाग मिळाले. त्यांना घाटाजवळचे शेत आणि दुसऱ्या

एका शेताचा मोठा भाग मिळाला. सगळी जमीन त्यांनी कुळांना कसायला दिली आहे. बैठक कुट्टन मामाच्या वाटयाला आली.

ज्यांची बाजू घ्यायला कुणी नव्हते त्यांना निरुपयोगी जमीन आणि घर मिळाले. दगड, वाळू आणि जंगली झाडे असलेली टेकडीवरची जमीन अप्पुण्णीला मिळाली. तिथल्या तांबडया मातीत गेल्या कित्येक शतकांत काहीही पेरले गेले नव्हते. मध्य-भागी उभे राहून त्याने मनातल्या मनात हिरव्यागार शेताचे चित्र रेखाटले.

दूर नदीच्या पलीकडे क्षितिजाकडे दृष्टी लावून तो खूप वेळ उभा राहिला.

घाटावरून टोपीवाली छत्री घेतलेला एक माणूस वर आला. जवळ आल्यावर कळले, कुट्टन मामा आहे. चेहऱ्यावर पूर्वीसारखा रूक्ष भाव नाही. हमत जवळ आला. जवळ येऊन छत्री बंद करीत तो म्हणाला, " अप्पुण्णी, कधी आलास ? "

" चार दिवस झाले. "

" मीनाक्षीनं सांगितलं की, तू आला आहेस. तिथं तर काही मोकळेपणानं बोलता येत नाही. "

" काही विशेष बोलायचं होतं ? "

" जरा भेटायचं होतं. "

त्याच्या मनात आले, सांगावे, भेटलात ना, आता जाऊ शकता. पण संयम केला.

" वाटण्या झाल्यापासून परिस्थिती बरी नाही. "

" कुणाचीच परिस्थिती बरी नाही. "

" मी आणि मालू वटक्कुम्मुरीत कुट्टण्णूच्या घरात राहतो. "

" ठाऊक आहे मला. "

" पूर्वीसारखी मेहनत करता येत नाही आता. मला तर आता त्या पोरीची काळजी लागून राहिलीय. "

अप्पुण्णी काहीही बोलला नाही.

" तू तिचा प्राण आहेस..."

कुट्टन मामाला पुढे बोलण्याचे धैर्य झाले नाही.

" मी काय करू ? "

" तिला तुझाच आधार आहे. "

अप्पुण्णीच्या मनात जुन्या आठवणी एकदम जाग्या झाल्या. तो थंडपणे म्हणाला, " अजून मी छोटा साहेब तर झालेलो नाही. "

कुट्टन मामाचा चेहरा खर्रकन उतरला.

" असं का म्हणतोस, अप्पुण्णी ? "

" मला आणखी बोलायला लावू नका. "

छत्री मिटून तो खाली उतरला. अप्पुणीला एक प्रकारचा क्रूर आनंद झाला दूर नदीकडे पाहत तो बसून राहिला

मालूची आठवण झाली आणि वाईट वाटले. ती बिचारी भोळी आहे. पण...

विचार करता करता त्याला सर्वांचीच घृणा वाटू लागली. सूड घेऊ पाहणाऱ्या स्वत:चीही घृणा वाटू लागली.

मालू आता मोठी झाली असेल. अनेक वर्षांपूर्वी प्रथमच जेव्हा तो त्या कुटुंबात आला होता आणि पूर्वेकडच्या व्हरांड्यात येऊन बसला होता, त्या वेळी त्याच्या-जवळ येऊन त्याच्याशी बोलणाऱ्या त्या काळ्या, किडकिडित, निमूळत्या चेहऱ्याच्या मुलीचे चित्र अजून मनात आहे. तिच्याविषयी त्याला सहानुभूती वाटते. पण तो तिला याहून अधिक काहीही देऊ शकला नाही.

ढगांमधून चंद्र वर आला तेव्हा तो घरी परतला.

रात्री झोपायला पडला तेव्हा आणखी अनेक चेहरे मनात आले. काजळ घातलेले, मिटलेले डोळे आणि काळ्या नागासारखे चमकणारे दाट केस असलेल्या एका मुलीचा चेहरा, आश्चर्य आणि वेदना व्यक्त करणारे डोळे असलेला काळा – निस्तेज चेहरा. संध्याकाळी पश्चिमेकडील आकाशात ढगाआड अर्धवट लपलेल्या चंद्राची आठवण करून देणारा दुसरा चेहरा. काही स्पष्ट, तर काही अस्पष्ट अशी ती चित्रे पाहत तो झोपी गेला.

गावी आल्यावर सातव्या दिवशी सकाळीच थोरल्या मामांची गाठ पडली. तो अंगणात सिगारेट ओढीत येरझरा घालीत होता, तेवढ्यात नालुकेट्टूच्या समोरून खडावांचा आवाज आला. त्याने आपल्या फेऱ्या चालू ठेवल्या.

" अप्पुण्णी ! "

थोरल्या मामांनी प्रथमच त्याचे नाव उच्चारले असावे. तो बेचैन झाला, जणू त्याला कुणीतरी मारीत होते.

" अप्पुण्णी, जरा इकडं ये. "

" काय आहे ? "

" इकडं समोर ये. " शांत स्वरात निमंत्रण मिळाले. ढगांसारखे गरजणारे हेच का ते थोरले मामा ?

" इथं ठीक आहे. "

कुंपणाच्या अलीकडे – पलीकडे दोघे उभे राहिले. अप्पुण्णीच्या सबंध शरीराची आग होत होती. आपली बेचैनी लपवण्यासाठी तो उगीच बोटे मोडीत राहिला.

" तीन–चार दिवसांपासून यायचा विचार करीत होतो. "

" हूं. "

थोरल्या मामांचा जर्जर चेहरा पाहून त्याला त्यांचे पूर्वीचे चित्र आठवले.

त्या दिवशी ज्याने त्याला मान पकडून बाहेर हाकलले होते आणि लूत भरल्या कुत्र्याला बोलावे तसे त्याला म्हटले होते की, " फाटकाच्या आत पाऊल टाकलं तर तंगडी मोडून टाकीन. " – तोच इसम आज त्याच्यासमोर शांतपणे उभा आहे.

" मी एका कामासाठी आलोय. "

" सांगा. "

" वाटणीमध्ये मला हे घर मिळालंय. या घरात देवाचा वास आहे. ते दुसऱ्याच्या हाती पडू नये म्हणूनच मी घेतलंय. "

" चांगलं केलंत. "

" पाचशे रुपयांसाठी हे गहाण पडलंय. खटला चालू आहे. "

अप्पुण्णी मुकाट्याने लक्षपूर्वक ऐकत राहिला. थोडा वेळ थोरल्या मामांचे मन द्विधा झाले. मग ते पुढे म्हणाले, " दहा तारखेपर्यंत कर्ज फेडलं नाही तर हे घर दुसऱ्याचं होईल. शेवटी घराणं तर आपलं सर्वांचं आहे ना ! "

अप्पुण्णी काहीही बोलला नाही.

ख्रिस्ती माणसं घर विकत घ्यायला तयार आहेत. पण जिथं देवीचा वास आहे ते घर ख्रिस्त्यांना कसं देऊ ? "

सहनशक्तीची हद्द झाली. अप्पुण्णीने आवाज चढवून विचारले, " मग या प्रकरणात मी काय करू ? "

" तुझ्याकडं पैसा आहे असं ऐकलंय, फक्त पाचशे रुपये पुरेत. प्रॉमिसरी नोट वगैरे काय हवं असेल ते लिहून देईन तुला. "

कुंपणाला धरून उभ्या असलेल्या त्या म्हाताऱ्याचे रूप पुन्हा लोप पावले. व्हरांड्यात उडी घेऊन हात उगारून आपल्या अंगावर धावून येणाऱ्या माणसाचे रूप त्या जागी दिसू लागले.

मनाचा तोल ढळू न देता अप्पुण्णी म्हणाला, " हे नालुकेट्ट जतन करावं असं मला वाटत नाही. "

" अप्पुण्णी, हे काय बोलतोयस तू ? "

" पुन्हा एकदा सांगतो, हे नालुकेट्टू सुरक्षित ठेवण्यात मला मुळीच स्वारस्य नाही. इथून मला लाथ मारून हाकलण्याच्या गोष्टी तुम्ही विसरला असाल, पण मी त्या विसरू शकलो नाही. "

दोघांमध्ये एक अभेद्य मौन पसरले. कापणाऱ्या स्वरात थोरले मामा म्हणाले, " चूक झाली होती माझ्या हातून, मला वाईट वाटतंय आता. जे काही झालं गेलं, ते आता विसरून जा, अप्पुण्णी ! "

" ते विसरणं इतकं सोपं नाही. "

" काय करावं काही कळत नव्हतं, एवढ्यात कळलं, की तू आला आहेस. वाड-वडिलांचं घर आहे हे. "

" माझ्याकडं पैसे आहेत, पण मी ते देऊ शकत नाही. "

कुंपणाच्या खांबाला धरून थोरले मामा मान खाली घालून उभे होते. अप्पुण्णीची दृष्टीही जमिनीवर खिळली होती.

थोरले मामा संथ पावले टाकीत परतू लागले तेव्हा अप्पुण्णीने त्यांना हाक मारून म्हटले,

" थांबा. "

थोरले मामा वळून थांबले.

" ख्रिस्त्यांना विकायचं नाही एवढंच ना ? मी विकत घेतलं तर ? "

थोरले मामा चपापले. थोडा वेळ आश्चर्यचकित होऊन उभे राहिले आणि मग म्हणाले, " विचार करीन. "

" विचार करून काही उपयोग नाही. आता, या क्षणी काय तो निर्णय घ्या. मी विकत घेऊ शकतो की नाही, पाहू या. जमिनीचे आणि घराचे किती पैसे हवेत ? "

थोरल्या मामांच्या मनात चलबिचल झाली.

" बोला. साधा, सरळ व्यापार आहे हा. किंमत पटली तर मी विकत घेईन. "

थोरल्या मामांचे मन पुन्हा द्विधा झाल्याचे पाहून अप्पुण्णीला राग आला.

" का ? अप्पुण्णीच्या पैशांची किंमत नाही वाटतं ? "

" नाही, तसं नाही. "

" मग बोला. उजाड झालेल्या नालुकेट्टूची किंमत सांगतोय एवढं मात्र लक्षात असू द्या. "

" पोक्कर हाजीनं चार हजार रुपये सांगितलेत. "

अप्पुण्णी विचार करू लागला.

" या घरात हवा आणि प्रकाश येऊ शकत नाही. माणसांनी राहण्यासारखं ते नाही. तरीही मी चार हजार रुपये द्यायला तयार आहे. मान्य असेल, तर खरेदीखत करण्याची व्यवस्था करा.

थोरल्या मामांची मान आणखी खाली झाली.

" मग, काय ठरलं ? "

मोठ्या कष्टाने मामा म्हणाले, " मान्य आहे. "

" कागदपत्र तयार करण्याची व्यवस्था करा. "

हळूहळू दूर जाणाऱ्या खडावांचा आवाज ऐकत तो तिथेच उभा राहिला.

कोठारात आला तेव्हा मीनाक्षी मावशीने विचारले,

" गेले ? "

" हो गेले. "

" सगळीकडून मामांना वाईट दिवस आलेत. "

अप्पुण्णीला हे सहानुभूतीचे बोलणे आवडले नाही.

" पुंतोट्टमची संपत्ती तर आहे ना ? "

" त्याबद्दल म्हणत नाही मी. "

" चांगली नात होती, तीही गेली. "

" कशानं. "

" तुला माहीत नाही ? पहिल्या मुलाच्या जन्माच्या वेळी. "

" काय झालं मीनाक्षी मावशी ? "

" मागच्या ज्येष्ठात अम्मिणी कुट्टी वारली. "

तो पुढे काहीही बोलला नाही. हळूच उठून खळ्याच्या दाराशी आला. थरथरणाऱ्या बोटांनी दार धरून तो डोळे मिटून उभा राहिला. तेवढ्यात मीनाक्षी मावशीचे शब्द ऐकू आले, " बिचारी किती प्रेमळ मुलगी होती ! "

अंगणाकडचे बंद दार अप्पुण्णीने उघडले. दक्षिण भाग काळोखात बुडला आहे. खिडकी उघडताच आत उजेड आला. तिथे उकडते. बंद असलेले दार उघडल्यावरही कोपऱ्याकोपऱ्यात काळोख लपलेला आहे. अंगणात केरकचरा पडला होता. खांबांवर कोळिष्टके लागली होती.

उत्तर भागातून उत्तरेच्या दालनात प्रवेश करून तो उभा राहिला. तिथेच आहे ती जिन्याखालची खोली.

त्या खोलीत त्याने तीन वर्षे काढली होती. तिथली फरशी आपल्या आसवांनी

ओली झाली आहे, असे त्याला वाटले.

तिथे उभा राहिला तेव्हा त्याला वाटले की त्या धुरकट काळोखात काचेच्या बांगड्या किणकिणत आहेत. हवेत मोगऱ्याच्या फुलांचा सुगंधही दरवळत आहे काय ?

दुःख नाही, मनात एक प्रकारची शून्यता भरून राहिली आहे.

जिना चढून तो वर गेला. पण बंद असलेली खोली त्याने उघडली नाही.

तंकम ताईच्या भावी नवरदेवासाठी सुसज्ज करून ठेवलेल्या खोलीत उंदीर खुडबूड करताहेत.

तंकम ताईचे लग्न झाले म्हणे. मीनाक्षी मावशीकडूनच कळले. नंतर त्याने तंकम ताईला घटस्फोट दिला. त्या घरातसुद्धा आता एक सुसज्जित खोली असेल.

पडक्या भिंती आणि ओलसर जमीन असलेल्या त्या नालुकेट्टूमध्ये वावरताना दिवसासुद्धा भीती वाटत होती. या काळोख्या खोल्यांमध्ये कित्येक पिढ्या आल्या आणि गेल्या. नारायण मामा वगैरे पूर्वजांचे आत्मे इथे घोटाळत असतील. मामांनी ज्या मुलीची लाथ मारून हत्या केली, तिचीही आठवण आली.

जुन्या आठवणींशी निगडित असलेले नालुकेट्टू आता त्याचे झाले होते. पाच वर्षे कष्ट करून जे मिळवले होते ते सगळे इथे घातले. पण तरीही मनात एक आगळीच तृप्ती आहे. इथूनच तो एके दिवशी कसाबसा जीव वाचवून पळाला होता. त्या दिवशी इथले सगळे काही त्याला वर्ज्य होते. का ? कारण एका युवतीने आपल्याला आवडलेल्या तरुणाशी लग्न केले होते.

मनात चिंतेची चक्रे फिरताहेत असे वाटले. ती स्त्री आता कसे आयुष्य कंठीत असेल ?

इच्छा नसताना ती एके दिवशी या घरातून बाहेर पडली होती. त्याचे प्रायश्चित्त म्हणून तिला आयुष्यभर कष्ट उपसावे लागले. कुणी तिची विचारपूससुद्धा केली नाही. तिचे श्राद्ध उरकून घरातले शुद्ध झाले. एक कलंक धुवून काढल्याचे समाधान त्यांना लाभले असेल.

त्या स्त्रीचा मुलगा आता या नालुकेट्टूचा मालक आहे. त्याला तिची आठवण आली. ती स्त्री इथल्या मालकाची आई आहे.

तो तिला विसरत होता.

वडिलांच्या मृत्यूनंतर तिनेच त्याचे पालनपोषण केले. इल्लमच्या खळ्यात धान्य कांडून त्याला खाऊपिऊ घातले. त्या सर्व गोष्टी तो विसरून गेला होता,

आधार देणारे कुणीही उरले नाही तेव्हा एकजण तिला मदत करण्यासाठी जवळ आला. तिने त्याला झिडकारले नाही. ती शिथिल होऊन खाली पडली असेल तेव्हाच तो हात तिने धरला असेल. त्याने स्वतःलाच विचारले, "काय चूक केली होती तिनं ?"

काय चूक होती ?

तिला या नालुकेट्टूमधून बाहेर काढले गेले ही काय तिची चूक होती ? मग...? अप्पुण्णीला गुदमरल्यासारखे झाले.

घामाने डबडबलेल्या अंगाने तो बाहेर अंगणात आला. दुपारचे कडकडित ऊन पडले होते. मुळीच वारा नाही. एक पानसुद्धा हलत नव्हते.

आपल्याला कुणी नाही असे आजवर तो उगीच समजून चालला होता. या जगात मी एकटा आहे, असे सांगण्यात त्याला एक प्रकारचा गर्व वाटत होता. पण खरे म्हणजे त्याला सर्व नात्याची माणसे होती. त्यालाच भ्रम झाला होता.

काही शृंखलांनी अजून त्याचे मन बांधलेले आहे. दूर वयनाटच्या घाटातली एक झोपडी त्याला आठवली. तिथल्या बाजारातील दुकानात पेटी उघडून पैसे मोजणाऱ्या एका मुसलमान तरुणाचे चित्रही डोळ्यांपुढे तरळले. वर्गात मुलांशी हितगुज करणाऱ्या एका शिक्षकाचा चेहराही मनात तरळून गेला.

तो पूर्ण शांत झाला. व्हरांड्यातल्या वाळवीने खाल्लेल्या खांबाला टेकून तो बसला.

काय मिळवले आणि काय गमावले यांचा जमाखर्च मांडण्याचा व्यर्थ प्रयत्न त्याचे मन करीत होते.

# दहा

अंगणाच्या पायऱ्यांशी येऊन तो तरुण थबकला. मागाहून येणाऱ्या स्त्रीला त्याने म्हटले, " आई ! वर ये ! "

तिचे मन द्विधा झालेले पाहून तो म्हणाला, " वर यायला घाबरायचं मुळीच कारण नाही. "

ती अशक्त, कृश स्त्री व्हरांड्यात पोचली. तिचे काही केस पांढरे झाले होते.

अजून तो वयस्क इसम बावरून अंगणातच उभा होता. तो तरुण त्याला म्हणाला, " या. "

आईच्या पाठोपाठ तो पुरुष मोठ्या कष्टाने पायऱ्या चढला, जणू काही एखाद्या निषिद्ध ठिकाणी प्रवेश करतोय.

आत येऊन ती स्त्री म्हणाली, " केवढा काळोख आहे इथं, अप्पुण्णी. "

" दिवसासुद्धा इथं काळोख असतो, आई ! दिवसासुद्धा पूर्वजांची भुतं इथं वावरतात. "

आईने चकित होऊन त्याच्याकडे पाहिलं.

" आई, घाबरू नकोस. हे नालुकेट्टू पाडण्याची व्यवस्था करावी लागेल. इथं एक छोटंसं टुमदार आणि हवेशीर घर बांधायला हवं. घरात भरपूर प्रकाश यायला हवा. "

" हे घर पाडणार ? इथं तर देवीचा वास आहे ? "

तो मोठ्याने हसला. त्याच्या हसण्याचा आवाज पडक्या भिंती, गंजलेले लोखंडी खांब आणि काळोख असलेले कोपरे यांच्यावर आपटून प्रतिध्वनित झाला.

अजून तो वयस्क इसम घाबरून, मान खाली घालून उभा होता.

●

लान्सर प्रेस, ए 3/1 मायापुरी फेज I, नयी दिल्ली-110064 द्वारा मुद्रित